# जग कुठें आहे ?

आवृत्ति १ ली

ऑगस्ट १९४१

किंमत १॥ रुपया.







जग कुठें आहे ?



लेखनारंभ १० ऑक्टोबर १९४१

लेखनसमाप्ती ११ एप्रिल १९४१

छापण्यास आरंभ ११ एप्रिल १९४१

प्रसिद्धि दिन, ता. १७ ऑगस्ट १९४१

# नमस्ते ! नमस्ते !



आमचे कांहीं श्रीमान् मित्र, आमच्या पुस्तकारंभींचीं कळकळीचीं नेहमींचीं निवेदनें वाचून, थोड्या चेष्टेनें पण पुष्कळशा उपहास बुद्धीनें आम्हांला म्हणत असतात, कीं तुमचें जेव्हां तेव्हां हें असें आश्रयदात्यांच्यापुढें, नी आम्हां श्रीमंतांच्यासमोर रडगाणें कां असतें ? व हें असेंच आणखी किती काळपर्यंत आपलें रडगाणें आम्हांला ऐकविणार ?

धनिकांपुढें आम्हीं रडगाणें गात आलों ही गोष्ट अगदीं खरी आहे ! तसेंच धनिक आम्हांला त्याबद्दल विचारून उपहास करतात, हें त्यांचें करणें-ही फारसें चूक नाहीं. परंतु आम्हीं रडगाणीं कां गात आलों, याकडे मात्र कोणीही धनिकांनीं डोळे उघडून पाहिलें नाहीं. ही गोष्ट तितकीच खरी आहे!

असो; झालें तें गेलें. वाहिली ती गंगा आणि उरलें तें तीर्थ समजून व तेंच 'माले'च्या नव्या वर्षाच्या आरंभीं प्राशन करून आम्हीं आमचें रडगाणें आजच संयमपूर्वक आंवरतें घेतों. आणि यापुढें आम्हांला कधींही रडगाणें गाण्याची वेळ येऊं नये म्हणून, किंवा सहाय्य करूं इच्छिणाऱ्या धनिकांना तें कर्णकटू रडगाणें ऐकायला येऊं नये म्हणून, 'माले'च्या उत्कर्षासाठीं आवश्यक असणाऱ्या भांडवलाकरितां त्याच धनिक–जनतेपुढें एक योजना ठेवीत आहोंत! आम्हीं आमच्या मित्रांच्या विचारें आंखलेली योजना पुढील-प्रमाणें आहे.

## आमची नवी योजना

( १ ) दहा हजार रुपयांची एक ठोकळ रक्कम जमविणें.

( २ ) प्रत्येकीं दोनशें रुपये एक रकमीं देणाऱ्या पन्नास व्यक्तींनीं वरील-प्रमाणें रकमेचा भरणा करणें.

( ३ ) सदर सद्‌गृहस्थांस पांच वर्षें मालेचीं निघणारीं पुस्तकें विना-मूल्य देण्यांत यावीं.

( ४ ) पांच वर्षांअखेर सवडीसवडीनें मालेचे ग्रंथ खपून साहजिकच जी

रक्कम गोळा होईल तिच्यांतून वरील सद्गृहस्थांची रक्कम फेडण्याचा कसोशीनें प्रयत्न केला जाईल.

( ५ ) सदर दहा हजारांची रक्कम ऑगस्ट १९४१ पासून डिसेंबर १९४१ मध्यें हातीं आल्यानंतर जानेवारी १९४२ पासून मालेचें कार्य जोमानें, नियमित, उत्कर्षाच्या मार्गाला निश्चित लावतां येईलच येईल.

ही थोडक्यांत अशी योजना असून, ती आम्हीं धारवाड, हुबळी, बेळगांव, पुणें, कोल्हापूर, सांगली, मुंबई, हैद्राबाद, नाशिक येथील अनेक मित्रांच्या व हितचिंतकांच्या सल्ल्यानेंच तयार केलेली आहे.

आमचें रडगाणें संपवून, हंसत, आनंदानें, मालेला वैभवाच्या शिखरावर नेण्याचें बळ व उत्साह, आमच्यांत आणणें हें महाराष्ट्रांतील थोर धनिकांकडे आहे. वरील योजनेला ताबडतोब सर्वांनीं हातभार लावला, तरच सर्व कांहीं सर्वांच्याच मनाजोगतें होणार आहे.

## जुन्या नव्या आश्रयदात्यांनो !

मालेचे धनिक हितचिंतक आमचीं रडगाणीं लवकरच बंद करतील असा भरंवसा असला, तरी तोंपर्यंत आमची खरी भिस्त आपल्यावरच आहे. आपण दहा रुपये अगाऊ देऊन तीन वर्षें माला चालू राखलीत याबद्दल मालेचे आपल्याला शतशः धन्यवाद आहेत. आपल्यासाठीं पूर्वीचीच सवलतीच्या आगाऊ वर्गणीची योजना कालमानानुसार थोडाफार फेर करून चालू ठेवण्यांत येत आहे. त्या सवलतीचा फायदा उभयतांनींहि अवश्य द्यावा घ्यावा अशी आग्रहाची सूचना आहे.

( १ ) तीन वर्षांची वर्गणी महागाईमुळें १५ रुपये होते. तीच सवलतीनें १२ रुपये करण्यांत आली आहे.

( २ ) ज्यांना तीन वर्षांची वर्गणी १२ रुपये भरतां येणें अवघड वाटेल त्यांच्याकरितां दोन वर्षांच्या १० रुपयांऐवजीं सवलतीची वर्गणी ८ रुपये आहे. पुष्कळांना दोन वर्षांचे अगाऊ वर्गणीचे ८ रुपये भरणें सुकर जाईल व तें मालेलाही सोयीचें खचित होईल.

( ३ ) महागाई संपून पूर्ववत् स्वस्तता होईपर्यंत वार्षिक वर्गणी ट. हं. सह ५ रुपये ठेवणें भाग पडलें आहे.

तरी वरील तीन कलमांपैकीं ज्यांना जें सोयीचें जाईल त्यांनीं त्याप्रमाणें अवश्य कळवावें व वर्गणी अगाऊ मनिऑर्डरीनें धाडण्याची त्वरीत कृपा करावी. अशी विनंती आहे.

## रसिक वाचकांनो

व्यावहारिक दृष्टया सर्वांप्रमाणें आम्हांला कठीण काळ तर कंठणें भाग आहेच. तरीही आम्हीं धडाडीनें आज नव्या वर्षाला आरंभ करीत आहोंत. आपले आवडते कादंबरीकार श्री. नारायणराव कुलकर्णी यांच्या **"ग्रहणापूर्वीं सुटका"** या अत्यंत लोकप्रिय कादंबरीचा तिसरा भाग **" जग कुठें आहे ? "** आपल्याला सादर करीत आहोंत. हा भाग पहिल्या दोन भागांप्रमाणेंच नव्हे, तर त्याहीपेक्षां जास्त आपल्याला आवडेल ही आम्हीं आपल्याला ग्वाही देतों.

## सहाय्यकांचे आभार !

मालेच्या हितचिंतकांनीं मालेच्या कठीण काळांतही आम्हांला चांगला अनुभव दिला आहे ! आजच्या अत्यंत कठिण काळांतही मुंबईच्या रा. रमाकांतांनीं कागदाची सोय स्वतः संकटांत पडून केली नसती, शींवचे रा. डी. डी. देशपांडे, आर्थिक साहाय्य द्यायला ऐन वेळीं धावले नसते, आणि हनुमान प्रेसचे श्री. कोकाटे यांनीं कसलीही वाच्यता न करतां मालेचा प्रवाह चालू ठेवण्यांत सहानुभूतीनें मन घातलें नसतें, तर आजचें पुष्प रसिकांच्या हातीं आम्हांस कसें काय देतां आलें असतें, हा प्रश्नच होता ! म्हणून सर्वांचे मनःपूर्वक आभार मानलेच पाहिजेत ! ज्यांनीं साह्य केलें त्यांचे आभार मानतों. ज्यांनीं अजून सहाय्य दिलें नाहीं, त्यांनीं याच वेळीं त्वरित साह्य करावें, अशी त्यांना विनंती करतों. ज्यांनीं आपली मागील तीन वर्षांची वर्गणी अजून भरली नाहीं, ती त्यांनीं भरावी असें स्मरण करतों. नवव्या वर्षांत 'माले'ची नाव उसळणाऱ्या तुफान सागरांत तर लोटली. आतां ती परतीराला सुखरूप नेण्याची जबाबदारी जनता-जनार्दनावर ! म्हणूनच तिला आरंभींच नमस्ते म्हणणें आमचे पवित्र कर्तव्यच आहे.

महाराष्ट्र-कुटुंब-माला कचेरी
२९२ नारायण पेठ, पुणें २.

सर्वांचा नम्र,
**वि. रा. खाडिलकर**

गुणलुब्धाः स्वयमेव संपदः।


महाराष्ट्र-कुटुंब-माला, कचेरी

३९२ नारायण पेठ, पुणें २.

पुष्प ३३ वें


# ग्रहणापूर्वी सुटका – भाग ३ रा.

# जग कुठें आहे ?


लेखक व संपादक

**नारायण विनायक कुलकर्णी**



प्रकाशक

**विठ्ठल रामचंद्र खाडिलकर**

मुद्रक

**लक्ष्मण भाऊराव कोकाटे**

३०० सदाशिव पेठ, हनुमान प्रिंटिंग प्रेस, पुणें २

चित्रकार

**नाडगौडा** – पुणें.

ब्लॉकमेकर व कव्हरप्रिंटर

**वालोद्यान प्रेस**, पुणें.

प्रमुख एजंट

मेसर्स–**परचुरे पुराणिक** आणि **मंडळी**, मुंबई.

प्रमुख प्रचारक

**वि. बा. मोडक**, शाहुपुरी–कोल्हापूर.

विक्रीचें मुख्य ठिकाण

**श्रीदत्त एजन्सी**, बुधवार चौक, पुणें २.




# समर्पण

**रावसाहेब लक्ष्मण नीलकंठराव ऊर्फ नानासाहेब देशपांडे**

**ॲडव्होकेट**

प्रिय नानासाहेब !

राजवाड्यांतील उत्कृष्ट – उंची पंचपक्वानांचें यथेच्छसेवन करून तृप्त झालेला आत्मा गरिबाच्या झोंपडींतील साधी – शिळी मीठ-भाकर आनंदानें नी प्रेमानें खाताना आढळतो. कै० राम गणेश गडकरी यांचे अमोल मोलाचें वाङ्मय आपण आकंठ सेवन केल्यानें सदासंतृप्त असतांही माझ्या साध्या वाङ्मयाची चव चांखतांना आपल्याला आनंद होतो ! श्रेष्ठप्रतीच्या खऱ्या रसिकाचा हा थोर गुण आहे. तो क्वचित् ठिकाणीं सांपडतो !

दुर्मिळ गुणाचें क्वचित् पण खचित ठिकाण निदान माझ्या बाबतींत आपण आहांत; हें मी हेरलें. ( याची आपल्याला मात्र खात्रीनें दखल नसेल ! ) आणि म्हणूनच आपल्यामध्यें वास करीत असलेल्या त्या थोर गुणाचा अल्पस्वल्प गौरव, माझ्या हातून व्हावा म्हणून, आपल्या परवानगीनेंच नव्हे · तर परवानगीवांचूनही माझी ही मीठभाकर आपल्याला सद्भावानें समर्पण करीत आहें !

स्नेहाकांक्षी सुहृद्

**ना. वि. कुलकर्णी**

॥ श्रीराम ॥

# ग्रहणापूर्वी सुटका

( भाग तिसरा )

## जग कुठें आहे ?

### उपोद्घात

ट्यंहा ! ट्यंहा ! ! ट्यंहा ! ! !

एक कोंवळें अर्भक — एक दिवसाचें होतें कीं दोन दिवसांचें होतें हरी जाणें ! बाळंत्यांत गुंडाळलेलें, इवलेसेसें तें अर्भक कोणी केव्हां आणि कसें रस्त्याच्या कडेला गटारांत आणून टाकलेलें होतें.

किती गोजिरवाणें, किती गोरेंपान, कपाळपट्टी कशी भव्य, डोळे पण कसे टपोरे ! निरुंद जिवणी, चिंचोळी हनुवटी, किती छान छान होतें तें !

तें ट्यंहा, ट्यंहा करीत होतें, दमून थांबत होतें; लगेच अकारण हंसतही होतें. लहान मुलांना, सटवी गुदगुल्या करून, मागल्या जन्मांतल्या गोड गमतींची आठवण देऊन हंसविते; व चिमटे घेऊन मागल्या दुःखांनें स्मरण देऊन रडायला लावते, असें म्हणतात ! गटारांत पडलेल्या त्या अभागी अर्भकाला कसल्या आनंदाच्या व कोणत्या दुःखांच्या आठवणी देऊन सटवी हंसवीत रडवीत होती हें कोणाला सांगतां येणार !

उपजत्या तान्हुल्याच्या ट्यंहा ट्यंहानें, जन्म देणाऱ्या मातेला त्रिभुवनांत न सामावणारा आनंद होत असतो. उपजतांच, आपल्याला काय झालें

आहे हें जन्मदात्रीला कुतूहलानें, उत्सुकतेनें, आनंदानें केव्हां पाहिनसें झालेलें असतें. त्यानें टयंहा टयंहा केलें तरी तिला सौख्य होतें. तें हंसलें तरी परमावधीचें गोड समाधान वाटत असतें ! आपल्या तान्हुल्याबद्दल त्या मातेला निसर्गनिर्मीत पान्हां फुटतो, अपत्यवात्सल्य त्या क्षणींच जन्म घेतें !

पण गटारांत पडलेल्या त्या दुर्दैवी बालकाच्या टयंहा टयंहानें पाषाणहृदयाला पाझर फुटत होता. त्याच्या हंसण्यानेंही सारें ब्रह्मांड आठवत होतें ! नगरपालिकेची एक यःकश्चित् नोकर म्हातारी झाडूवाली रस्ता झाडायला आली, तिनें त्या अर्भकाला पाहिलें ! तिच्याशिवाय इतक्या सकाळीं रस्त्याला फिरकणार कोण ? झाडूवालीनें पाहिलें. कळवळला तिचा जीव ! कोण कोणाची ती ! पण तिचें स्त्रीहृदय हळहळलें. डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहूं लागल्या. हातांतला झाडू हातांतच राहिला. काम विसरली ती ! त्या अर्भकाकडेच पहात राहिली !

" अय्याई ! किती ग बया देवावाणी ग्वाड हाय ! आन् कंच्या रांडनं र बाबा तुझी अशी गत करूनशान् टाकलीया ! तुझी तिला माया कशी न्हायी आली. लाव व्हती का काय जनूं ? तिचं हात धजलं कसं तुला टाकायापायीं !..."

किती आणि कसले कसले विचार त्या झाडूवालीच्या डोक्यांत थैमान घालीत असतील ते तिचें तिलाही कळणें शक्य नव्हतें ! तिच्या तोंडांतून एक शब्द त्या चिमुकल्या अर्भकाबद्दल कळवळ्याचा तर दुसरा त्याला जन्म देऊन बेवारशी करून रस्त्याला टाकणाऱ्या चांडाळणीला उद्देशून संतापातिरेकाचा बाहेर पडत होता !

हातांतला झाडू खालीं गळून पडला होता त्याकडे लक्ष जातांच तिला आपल्या चाकरीची आठवण झाली. आपल्या वरचा मुकादम आला आणि त्यानें आपण काम सोडून उभी राहिलों हें पाहिलें तर तो शेलक्या शिव्यांची लाखोली वाहील आपल्याला; एक दिवसाच्या आपल्या रोजमुऱ्यावरदेखील तो उठेल, हें लक्षांत येऊन ती झाडू उचलून कामाला लागण्याकरितां वांकली; तेवढ्यांत, काव काव करीत एकदोन कावळे त्या अर्भकाच्या रोखानें धावलेले तिला दिसले. तसे, कावळे, घारी झडप घालून आपल्या चोंचीनें त्या बाळाच्या ताज्या मांसाच्या गोळ्याला दुखवतील; रस्त्यावरचीं कुत्रीं,

आधाशासारखीं धावून फाडतील; एकादें मांजर, नखांनीं त्याला ओरबडून टाकील असें झाडूवालीला वाटलें. पुन्हां ती थांबली. तिचा कामाला, त्या पोराला सोडून, हातच उचलेना.

शेजाऱ्यापाजाऱ्याच्या घरांतील आयाबाया, घरांतली झाडलोट करून, केर-सुणीवर घेतलेला केर, कचऱ्याच्या पेटींत टाकण्याकरितां रोजच्यासारख्या लगबगीनें यायला लागल्या; कांहीं जणींनीं त्या बाळाला पाहिलें — कांहींना त्या झाडूवालीनें 'वहिनीबाई, बघा व ह्यें !' म्हणून दाखविलें. कांहीं चक्चक् करीत जरा पहात उभ्या राहिल्या तर कांहीं जणीं घाबरून, भिऊन, धड न पाहतांच पळाल्या !

रहदारी सुरू झाली रस्त्याला ! बघ्यांची गर्दी होऊं लागली. कोणी उभे राहिल्यासारखें करी पाहिलें न पाहिलेंसें करी आणि आपल्या कामाच्या ओढीनें चालते होई. रिकामटेकडे उभे राहत. बाह्यतः कोणी हळहळे, रागवे; कांहीं तरी बडबडे ! तें तान्हुलें कोणाचें असेल ? कोणत्या आळींतलें असावें ? कुमारिकेचें पाप असावें कीं एकाद्या विधवेच्या वांट्याला आलेला हा भोग असावा, या वरच, तेथेंच उभे राहून चर्चा करण्यांत, आपसांत विचारपूस करण्यांत कोणालाच कांहीं वाटत नसे.

" बायका बिघडल्या म्हणजे असे प्रकार हमेशा होणार ! अंधेरांत पापं करतात आणि मग समाजाच्या भीतीनें असें आपलें पाप चव्हाट्यावर आणून टाकतात ! "

" पाप होऊं नये झालं. शेण खाऊं नये खाल्लं. इतका पल्ला पोंचल्यावर पंढरपूरला जायला काय झालं होतं ? तिथं नसती व्यवस्था झाली ? गटारांत पोटच्या पोराला टाकून काय मिळवलं ? "

" पण माझं म्हणणं असं कीं, हल्लींचं जगच असं झालं आहे; मुली मोठ्या होतात — मुलांत मिसळल्याखेरीज त्यांना सोय नसते. शरीरधर्म कोणाला सुटत नाहींत; ज्या वयात जें व्हावयाचें तें व्हावयाचेंच ! नाहीं कोण म्हणतो ? या लोकांच्या करितां 'राइट एजन्सी' आहे ना ? त्यांनीं पिशव्यांची, टोप्यांची व्यवस्था केली आहे ना ! त्यांचा फायदा कां घेत नाहींत हे लोक ? मग इतकी पाळी तरी न येती ! आपली हानी आणि जगाची निंदा असें कां झालें असतें ? "

" आपण राइट एजन्सीचे फिरते प्रचारक आहांत वाटतं ? " मराठी भाषेचे मोठमोठे पुरस्कर्ते जसे आपल्या ' टांकाच्या फेकी ' ची करामत करून स्वतःचें कौशल्य प्रकट करून लोकांची करमणूक करण्याचे श्रेय मिळवितात; त्या प्रमाणें गटाराच्या कडेला, त्या अर्भकाला पाहण्याकरितां गोळा झालेल्या गर्दीतील कित्येक जण स्वतःला महाराष्ट्रांतील महान विभूति समजणारे, आपल्या तोंडांतून ' शब्दांच्या फेकी ' नीं स्वतःची करमणूक आणि ज्यांच्या-वर त्यांचा मारा चालला होता, त्यांच्या हृदयाच्या अगोदरच झालेल्या चिंधड्यावर मिठाच्या पाण्याचे हबके मारावेत असा प्रकार करीत होते !

" कुणासारखें हें पोर दिसतें ? तोंडावळा आईचा दिसतो का बापाचा ? "

" या आळींतीलच कोणाचें हें आहे काय ? "

" ठरल्यावेळीं या आळींतून तीं एक नटारंगी पोरगी जात असे – तिला बघितलें म्हणजे वाटे कीं, ही केव्हांतरी कोणाला तरी फशी पाडल्याशिवाय राहाणार नाहीं–– "

" बरोबर ! बाकी बरेच दिवसांत ती दिसली नाहीं खरी ! "

" अशी वेळ येऊन टेपल्यावर कशी दिसणार ? "

" पलिकडच्या वाड्यांत एक बिऱ्हाड आहे, त्यांतल्या त्या विधवेची ही करामत असावी "

" छे : हो ! ती विधवा नव्हे ! कुमारी आहे ती ! – परवां कांहीं दिवसापूर्वी संशयावरून त्या वाड्याभोंवतीं पोलिसांच्या घिरट्या चालूं होत्या खऱ्या ! म्हटलं आहे काय इथें ? लक्षांतच येईना ! शेवटीं हें – हें प्रकरण असं होतं म्हणायचें ! "

" अहो, पण त्या वाड्यांतलें हें असणें शक्य नाहीं. तें बिऱ्हाड ती जागा सोडून केव्हांच निघून गेलें हें मला माहित आहे ! आणि त्यांतलें हें असलें तरी, हें इथल्या इथं आणून कोण टाकील ? चोर ज्या ठिकाणीं राहतात, त्या पासून कमीत कमी बारा कोसावर जाऊन चोरी करीत असतात ! तत्वच आहे हें मुळीं !–– "

" बरोबर ! कुठल्या तरी दुसऱ्याच पेठेंतलें हें दिसतंय ! "

" शहामत आहे या लोकांची ! करून सवरून नामानिराळ्या या कार्ट्या कशा होतात पहा ! "

एक का दोन ! हजारांच्या हजार जिभा ! वाटेल तशा वळवळत होत्या. एक कुमारीच्या वर्तनावर प्रहार करीत होती तर एक अज्ञान विधवेच्या करणीवर आपली धारदार करवत घाशीत होती ! आणि त्या सर्वांचा वाक्-प्रवाह सर्वशक्तीनिशीं एकट्या स्त्रीवर्गावर जोरजोरानें आदळत होता, हें विशेष !

त्या अर्भकाकडे बोलणारांची दृष्टि वळत होती, हें खरें; पण त्याचें पुढें काय ? त्याच्या करितां कांहीं करावें, त्याचा प्राण वांचवावा, संगोपन पोषण करण्याची पुढें होऊन हमी घ्यावी, सहृदयता प्रकट करावी, घरीं न्यावें, बाळ-गावें, आपलें म्हणून वागवावें, असें कोणा एकाच्या ध्यांनींमनीं येईल तर मात्र शपथ ! परदुःख शीतल म्हणतात तें यालाच !

वांकडें पाऊल पडणाऱ्या किंवा टाकणाऱ्या स्त्रियांचा वाटेल तसा आणि वाटेल तितका उद्धार करण्यांतच सगळयांचा सगळा पुरुषार्थ ! आणि तोही; जेवढे हजर असतील, त्यांच्या तेवढया स्त्रिया महान पतिव्रता आणि गैरहजर असणाऱ्या साऱ्या जगाच्या स्त्रिया अवाच्य वर्तन करून आपलें पोर जन्मतांच गटारांत टाकणाऱ्यांच्या कोटींतल्या समजण्यांत !

कसें कोण जाणें, त्यावेळीं त्याच वाटेनें प्रसाद क्षीरसागर आणि निशिगंध लाड आपापसांत कांहीं बोलत चालले होते. निशिगंध लाड प्रसादची समजूत घालण्याच्या आवेशानें साविर्भाव बोलत होता. प्रसाद केव्हां हूं म्हणे, तर केव्हां त्याच्याकडे नुसताच पाही. त्याच्या डोक्यांत विचार – विकारांचे हजार प्रकारांचें तुंबळ युद्ध माजलें होतें; असें त्याच्याकडे सहज ओझरतें कोणी पाहिलें असतें, तरीसुद्धां त्याच्या चटकन् लक्षांत आलें असतें. तोंडा-वर तुफान वादळ थैमान घालीत असलें तरी, त्याच्या आंत निश्चय, कृत-संकल्प, याचें ठाणें भरभक्कम असावें, तसाच प्रसादचा उमदा चेहरा सांगत होता, हें मात्र सत्य होतें !

निशिगंध लाड नव्या नव्या शब्दांचे सुरुंग दर वेळीं प्रसादच्या हृद-याच्या फत्तरावर लावून, ते फोडून, आपल्या मनासारखी जागा निर्माण करण्याचा मोठ्या उमेदीनें आणि दमदारपणानें चिकाटीचा प्रयत्न करीत होता. पण अजून एकादी छोटीशी कपारीही त्याला हलली आहे असें दिसून येत नव्हतें !

तेवढ्यांत, घोळक्यांतील निशिगंधाच्या ओळखीच्या कोणा गृहस्थाचें

त्यांच्याकडे लक्ष गेलें; त्यानें त्यांना मोठ्यांदा हाक मारून म्हटलें, "अहो, निशिगंध, अहो संपादक ! हें पहा तुमच्या वर्तमानपत्राला नव्या बातमीचें खाद्य ! तद्दन नवी वार्ता !—"

निशिगंध आणि प्रसाद थांबले. त्या घोळक्यांत घुसले. त्यांनी त्या गटारांत पडलेल्या अनाथ अर्भकाला पाहिलें. ओळखीच्या गृहस्थानें निशिगंधाला वर्तमानपत्रांत घालण्याची बातमी म्हणून सांगितलें. आणखीही त्यांतील चार दोन मंडळी प्रसादला ओळखीत होती. त्यांनीं प्रसादकडे मिस्कील दृष्टीनें पाहिलें. तोंडांतल्या तोंडांत ती मंडळी हंसलीही.

"कां, कसं काय आहे प्रसाद ! मुंबईहून केव्हां आलांत ? लग्नाबिग्नाचे कुठवर आणलंत ? चालू मोसमांत आम्हांला जिलब्या–लाडू घालणार कीं नाहीं ? सोडणार नाहीं अं राजेश्री ! नाहीं तर ऐनवेळीं आम्हांला जाल विसरून !"

गटारांतल्या अनाथ अर्भकावर प्रसादची दृष्टि गेली; त्याच्याबद्दल निशिगंधांच्या ओळखीच्या गृहस्थानें जें सांगितलें, त्यांतील कांहीं शब्द त्याच्या कानीं पडले. त्याबरोबर त्याला जबरदस्त विजेचा धक्का बसावा तसें झालें ! त्याच्या डोळ्यांपुढें अंधेरी आली. हृदय क्षणभर बंद पडल्यासारखेंच झालें ! पाय लटलट कांपू लागले. तो तेथेंच एकदम भोंवळ येऊन पडायचाच ! पण तितक्यांत, त्याचें त्यानेंच स्वतःला कसेंबसें सावरलें !

त्याच्या आंतरदृष्टीपुढें त्याची असहाय्य, अगतिक शहाणी सावर्डेकरची करुण मूर्ति उभी राहिली ! क्षणमात्र तो स्थळा– स्थळांतलें अंतर अजिबात विसरला ! आपल्या शहाणीनें आपल्या अर्भकाचीच तर कठोरपणानें ही गत केली नाहीं ना ! हा निखाऱ्यासारखा खरखरणारा प्रश्न त्याच्या मनापुढें उभा राहिला ! त्यानें साऱ्या शक्ति एकवटून रक्ताळलेल्या डोळ्यांनीं, गटारांतील तें अर्भक आपलें तर नाहीं ना ? या विचारानें त्याच्याकडे पाहिलें. आपुलकीच्या, रक्ताच्या, प्रेमाच्या, अपत्यस्नेहाच्या, सर्व विश्वांतल्या सर्व भावना त्याच्या चिमुकल्या हृदयांत दाटल्या ! हजार मैलांच्या वेगानें धांवणाऱ्या तुफान वेगानें त्या अर्भकावर झडप घालून, त्याला हृदयाशीं धरून तेथून धांवत सुटावें, असेंच प्रसादच्या मनांत आल्याशिवाय राहिलें नाहीं. त्यानें पाऊल उचललें. पण त्याचा एक हात निशिगंधांच्या हातांत होता. त्याच्या उसळत्या तापल्या रक्ताचा अनिवार्य वेग निशिगंधांच्या हाताला जाणवला. त्याबरोबर त्यानें आपला

हात घट्ट आवळला ! त्याचें प्रसादकडे लक्ष गेलें, तो काय विचारांत आहे, काय करणार, हें त्यानें ओळखलें. वेडा खवळला—बेफाम झाला म्हणजे दहा—दहा—पंधरा—पंधरा, शक्तीवानांच्या हातांतून निसटतो ! भावनेच्या अतिरेकानें तुफान बनलेल्या प्रसादला आवरणें निशिगंधाला सर्वथा अशक्य होतें. त्याला सहज बाजूस होलपटून, प्रसाद त्या अर्भकाला उचलावयाला त्याच्या हातावर तुरी देऊन निसटला असतां—निसटत होतांच पण कोणाकडून तरी पोलीसठाण्यावर वर्दी गेली होती, तेथून दोन पोलीस त्या जागीं उपस्थित झाले. त्यांनीं दाखल होतांच, ‘ चलो, हटो, ’ करीत, कमरेचें दंडुकें सांवरीत, गर्जना करून, तमाशगिरांना पिटाळून लावण्यास सुरवात केली ! तमासगीरच ते ! पोलीस पाहतांच चारी दिशांना हां हां म्हणतां पांगले !

‘ चल, प्रसाद ’ म्हणत प्रसादाला निशिगंधानें तेथून काढता पाय घेण्याचा इषारा दिला ! प्रसाद किंचित् भानावर आला ! पोलीसनें केस हातीं घेतल्यानंतर मधल्यामध्यें आपल्या अविवेकी भावनेचें प्रदर्शन करण्यांत अर्थ नाहीं, असेंच प्रसादला तेवढयांत वाटलें असावें. त्याचा पहिला आवेश मावळला तो निशिगंधाबरोबर मुकाट्यानें चालूं लागला.

बोलावें असें मनांत येऊन निशिगंधानें प्रसादकडे पाहिलें. प्रसादनेंही त्याच्याकडे पाहिलें. त्याबरोबर, निशिगंधाच्या डोक्यांतले प्रसादला पटवावयाचे विचार पार कोठच्या कोठें पळाले. आपल्या उपदेशरूपी सुरूंग पेरणीचा काडिमात्र उपयोग होणार नाहीं, हें त्यानें पाहिलें. प्रसाद बोलला नाहीं. फक्त त्यानें निशिगंधाकडे पाहिले. पण त्या नुसत्या निःशब्द पाहण्यांत, त्यानें आपले एकदम सर्वभाव प्रकट केले.

“ माझी आई, माझे वडिल, माझ्या आणि शहाणीच्या लग्नाला अजून परवानगी देत नाहींत. तुम्हीं त्यांनाच सामील झालां आहांत. त्यांच्या वतीनें तुम्हींही मला तसाच उपदेश करतां आहांत ! मी शहाणीशीं लग्न केलें नाहीं, तर उद्यां शहाणी आपल्या गर्भाची अशीच वासलात लावील. तिच्या आणि माझ्या बाळाची अशीच अवस्था झालेली तुम्हां सगळ्यांना खपेल — चालेल — आवडेल — लोक गोळा होतील, फिदीफिदी हंसतील. शहाणीच्या वर्तनावर हिडीस कोटया करतील —— छीः थूः करतील ! आणि मी तुम्हां सगळ्यांचा उपदेश ऐकून, नामर्द होऊन शहाणीचा नाद सोडून देऊं ?

तिला विसरूं ? हें होणें शक्य नाहीं, कालत्रयीं शक्य नाहीं ! मी, आमच्या — माझ्या आणि शहाणीच्या — बाळाला असें दीनवाणें गटारांत टाकायला कधींही तयार होणार नाहीं ! ”

हे प्रसादच्या मस्तकांतले विचार — निशिगंधाला स्पष्ट वाचावयाला येत होते. मग तो त्याला काय पटवणार ?



## प्रकरण पहिलें

निशिगंध आज कित्येक वर्षांनीं आपल्या आईला आणि पितृवत् प्रेम करणाऱ्या आपल्या मामांना भेटावयाला आला होता! खेळकर, खोडकर, दंगामस्ती करण्यांत प्रविण, हुशार पण अभ्यासाकडे लक्ष नसलेला, लहानापासून थोरापर्यंत, वाटेल तेव्हां, वाटेल तशी टिंगल टवाळी करणारा, असा निशिगंध कांहीं तरी कारणावरून घराच्या बाहेर एकटाच पडला होता! आईला वाईट वाटेल, ती आपल्याकरितां रडत राहील, याची पर्वा त्यानें त्या वेळीं केली नव्हती! निशिगंधाकरितां त्याच्या मामानीं, आपल्या मुलाच्या बरोबरीनें त्याला वागविण्यांत, त्याच्या शिक्षणास पाण्यासारखा पैसा खर्च करण्यांत, कसलीच कधीं कसूर केली नव्हती! पण त्याचीही पर्वा न करतां निशिगंध सर्वांच्याच रोषांस पात्र होऊन त्याला घराच्या बाहेर पडण्याचा योग टाळतां आला नव्हता!

त्याची आई आणि त्याचे मामा त्याच्या बाबतींत निराश-दुःखी झाले होते! हातांतून मुलगा गेला, त्याच्या आयुष्याचें मातेरें झालें, त्याचा ना धड आपल्याला ना धड त्याला उपयोग असेंच खरोखर सर्वांनीं त्याच्याबद्दल म्हणावें असेंच त्यानें केलें होतें!

निशिगंध अंतःकरणाचा सहृदय, मनाचा मायाळू खरा पण बाल्याची शीव ओलांडून तारुण्याच्या प्रांतांत पाऊल ठेवण्याच्या वेळीं, आपल्या मायेच्या माणसांना, आपलें सहृदयत्व, आपला मायाळूपणा त्याला दाखवितां येणें शक्यच नव्हतें! आपण पितृविहीन आहोंत, आपली अनाथ आई व आपण आपल्या मामाच्या कृपाछत्राखालीं आहोंत-तसें परक्याच्या घरींच आहोंत-

या जाणीवीनें सावधानपणानें वागलें पाहिजे हें त्याला कळतच नव्हतें ! तो बेफामपणानें, स्वतंत्रतेनें वागे–तसाच तो वागला आणि बराबाहेर पडला होता !

त्याचा बाह्य हूडपणा त्याच्या वडील मंडळींना दिसला. त्यामुळें ते त्याला वेळीं अवेळीं दटावीत, बोलत. त्याचा आंतला प्रेमळ मायाळू स्वभाव त्याना समजला नाहीं आणि त्याला त्या दृष्टीनें कोणाला वागवितांच आलें नव्हतें ! म्हणूनही तो बाहेर पडला असेल. त्याच्या आईनें, त्याची चौकशी करण्याचा लकडा–आपल्या भावाच्या मागें वेळीं अवेळीं लावून, आपल्याला दुःखांत आणि भावाला त्रासांत कधीं घातलें नाहीं. प्रेमळ बिचारी माऊली ! तिला वाटे, आपला 'बाबू' हूड आहे. त्याला कळत नाहीं. आज ना उद्यां, केव्हां तरी शुद्धीवर येईल. नीट कळेल. मग त्याला आपली आठवण होईल. आपल्याला सुखाचे दिवस दाखवील तोंपर्यंत नशीबीं असेल तें भोगलें पाहिजे.

आमच्या आईचीं अंतःकरणें अशींच थोर–थोर असतात !––त्याच्या आईच्या उनाड बाबूनें–म्हणजे आपल्या बाबू निशिगंधानें अविचारानें कां होईना अल्प वयांत घराबाहेर पडून बाहेरचे अनेक भलेबुरे प्रसंग अगदीं अल्प काळांत खूपच अनुभवले! उपास काढले. वस्त्राशिवाय थंडीवाऱ्या–उन्हांत दिवस काढले ! बिकट प्रसंगांत सांपडला ! एकदां तर अगतिक होऊन त्यानें आत्महत्याही करण्याचा जागून उमजून, उघड्या डोळ्यांनीं प्रयत्न केला ! पण नशिबाची दोरी बळकट त्यामुळें आत्महत्येच्या संकटांतूनही तो वांचला !

त्यानंतर मात्र त्यानें एकदांच मनाशीं निश्चय करून टाकला कीं, आपल्या कपाळीं 'आत्महत्ये'चें यश नाहीं. इतउत्तर असा गाढवपणा फिरून, आपण आयुष्यांत कधींही करावयाचा नाहीं ! आपल्या हातून आयुष्यांत कांहींतरी लोकोत्तर–लोकोपयोगी सत्कार्य व्हावयाचें ! आपण आपल्याकरितां नसलों तरी दुसऱ्याकरितां आहोंत ! होईल तेवढें दुसऱ्याकरितां यथाशक्ति यथामति करीत राहावयाचें. दुसऱ्याच्या उपयोगी पडावयाचें ! परमेश्वरानें आपल्याला दिलेलें हें अमोल आयुष्य केवळ आत्महत्या करण्याकरितां नाहीं, झगडण्याकरितां आहे! हालांतून–कष्टांतून, संकटांतून जाण्याकरितां, त्यांतून जात असतां, परोपकार करण्यांत आनंद मानण्याकरितां आहे ! चंदन स्वतः झिजतो पण जगाला सुगंध आणि शीतळता देऊन आराम अर्पण करतो. तसेंच मानवप्राण्यानें कां

न करावें ? आपण निशिगंध आहोंत. त्या नांवाला उचित असें आपलें आयुष्य आपण कां न वेंचावें ?

हा संकल्प निशिगंधानें केला आणि आपल्या आयुष्याचा मार्ग आंखला ! कांहीं तरी विशेष हातून घडल्याशिवाय आपल्या मायेच्या माणसांना तोंडही दाखवावयाचें नाहीं, असेंच जणुं काय त्यानें ठरवून टाकलें ! जगाचा कटु अनुभव जो—जितका मिळणें शक्य होतें, तो—तितका त्यानें घेतला ! त्यामुळें जगाशीं झुंज खेळण्याला जितकें निढावयाला पाहिजे असतें, तितका तो आप-सुखच निढावला; कांटक, कणखर बनला ! आत्महत्येच्या प्रयत्नामुळें त्याला आतां मृत्यूची भीति बागूलबोवा असें मानण्याचीही गरज उरली नाहीं.

हाच निशिगंध अनेक ठिकाणीं अनेक उद्योग करून-धरून, त्यांत अनेक प्रकारच्या यशापयशाचें चढ-उतार चढत-उतरत, अनुभव घेत घेत, शेवटीं धक्के देत घेत पंडितांना येऊन मिळाला होता. त्याच्या वाजत्या गाजत्या ' प्रफुल्ल ' वर्तमानपत्रांत काम करूं लागून, आपलें स्थान, त्यानें तेथेंच कायम भरभक्कम केलें. पंडित ' प्रफुल्ल ' पत्राचे मालक—चालक—संपादक तर खरेंच. त्यांच्या नांवाची व कार्याची छाप आणि त्या पत्राच्या भरभराटीचा मोठा वांटा त्यांचा हेंही खरेंच ! पण ' प्रफुल्ल 'च्या लोकप्रियतेला निशिगंधाची तल्लख, चुरचुरीत, चतुर लेखणी तितकीच कारणीभूत झाली होती, हेंही तितकेंच सत्य होतें !

सांसारिक आयुष्यांत एक सद्गृहस्थ म्हणून, निशिगंध पंडितांच्या घरांत, अगदीं त्यांच्याजवळचा एक बनला होता. त्यांचा जिवलग स्नेही झाला होता ! तसाच त्यांच्या ' प्रफुल्ल ' या ख्यातनाम वर्तमानपत्राची—पंडित बाह्य जगांत एक उत्सवमूर्ति गाजत होती तर निशिगंध त्याच पत्राची संजीवनी देणारी—जगाला न दिसणारी कर्तव्याची साक्षात् मूर्ति होती !

मूर्ति लहान पण कीर्ति फार थोर ! लाडाच्या घराण्यांत निशिगंधाचें रोपटें वाढलें. पण त्याच्या कार्याचीं, कृतीचीं सुगंधी फुलें पंडितांना, त्यांच्या घरात पडून सुगंध, आराम, शांतता देत होतीं ! परिजात वृक्ष सत्यभामेच्या घरीं आणि त्याचीं फुलें रुक्मिणीच्या दारीं ! असा प्रकार जगांत सदैवच काय थोडा असतो ?

पंडितांचा निस्सीम लोभ आणि भरंवसा निशिगंधावर ! पंडीत पत्नी—गृह-

देवता–चारुशीला हिचा बंधुवत् विश्वास निशिगंधावर! आणि त्यांची मुलें प्रसाद आणि मंदा, ही निशिगंधाच्या कटीखांद्यावर खेळलीं, बागडलीं, म्हणून त्यांचाही निशिगंध ऊर्फ 'बाबूकाका' म्हणजे जीव कीं प्राण! असें असल्यास नवल काय? निशिगंधानें 'प्रफुल्ल'चा प्रचंड व्याप संभाळून एकदोन नाटकें, एकदोन कादंबऱ्या, एकदोन बोलपटाचीं कथानकें लिहिलीं आणि त्यांत अलौकिक असें यशही मिळविलें! सर्वत्र अफाट खळबळाट करणाऱ्या त्याच्या लेखनाची कीर्ति त्याच्या मामांच्या कानीं गेली तेव्हां, त्यांना किती धन्यता वाटली! त्यांनीं त्याला आपण होऊन पत्र पाठवून, अंतःकरणपूर्वक अनेक शुभाशिर्वाद देऊन लिहिलें कीं, "तूं नादान–नालायख निघशील अशी आम्हांस तुझ्या लहानपणीं भीति आणि काळजी वाटे! पण तूं जगांत फार मोठें नांव कमावलेंस हें पाहून तुझ्या आईला आणि मला अतिशय आनंद झाला! मी तुझ्या शिक्षणाकरितां जो पैसा खर्च केला, तो तूं अशा रीतीनें जगांत नांव कमवून, माझा मला चक्रवाढव्याजासह परत केलास, असें मी मान्य करतों! तुझा उत्तरोत्तर असाच विजय होत जावो! तूं सुखी होवोस!" मामांच्या ह्या पत्रानें निशिगंधाला कोण धन्यता–आयुष्याची किती सार्थकता वाटली असेल, याची खरी कल्पना तशा आयुष्याचा ज्यानें जरा तरी अनुभव घेतला असेल, त्यालाच यथार्थ येईल, इतरांना शक्य नाहीं! विश्वविद्यालयाची पदवी निशिगंधला मिळवितां आली नाहीं, पण तो त्याकरितां खंत करीत बसला नाहीं. वाचन–लेखनाचा अफाट अभ्यास करून, त्यानें कीर्तिदेवीला आपल्या पायाशीं खेंचून आणलें. आपलें आयुष्य पदवीशिवाय वांया गेलें असेंही त्यानें मानलें नाहीं. हरीभाऊ आपटे, गडकरी, वरेरकर आदि थोर थोर साहित्यिक पदवीशिवाय असूनही त्यांनीं, त्यांच्याकडून 'पदव्या' मिळविण्याची हांव धरावी, इतकें अत्युच्च पद मिळविलें. त्यांतच निशिगंधानें आपल्या कर्तबगारीनें आपला समावेश करून घेतला होता!

पदवी नसलेल्या मंडळींनीं नुसतें हळहळत, रडत बसण्याचें आणि निष्क्रिय बनण्याचें कारण नाहीं, हाच आदर्श निशिगंधानें आपल्या कृतीनें ताज्या तरुणांपुढें ठेवला असें म्हणण्यास काय हरकत आहे?



न राहवून आपल्या पराक्रमी भाच्याला – निशिगंधाला – आवर्जून त्याचे

मामा भेटायला गेले त्या वेळीं ती बटु—वामनमूर्ति 'प्रफुल्लच्या' कचेरींतल्या ऐसपैस असलेल्या भव्य टेबलाजवळील बसक्या खुर्चीवर विराजित झाली होती. कामाच्या कागदांचा भलामोठा ढिगारा टेबलावर पडलेला, त्यांत त्यानें डोकें खुपसलें होतें!

त्यानें सहज वर पाहिलें, तों टेबलाच्या दुसऱ्या बाजूला समोर त्याचे मामा त्याच्याकडे साभिमान सादरतेनें पहात उभे असलेले! तो चटकन् लाजून उभा राहिला नम्रपणें त्यानें त्यांना नमस्कार केला. मामांना बसावयास खुर्ची होतीच, तीवर त्यानें त्यांना बसण्यास सुचविलें.

नोकरचाकरावर प्रेमळ हुकमत चालवितांना किंवा स्वतः पंडित तेथें येऊन त्याला ज्या रीतीनें वागवीत होते, तें पाहून मामांना आपल्या दृष्टींचें चांगलें पारणें फिटल्यासारखेंच झालें!

निशिगंधानें आपल्या मामांची पंडितांना ओळख करून दिली. त्या वेळीं यांच्याच आधारावर, आपण अनेकदां 'प्रफुल्ल' पत्रावर गंडांतरें आलीं असतां, आपण निभावून जाऊं, असें आपण म्हणत होतो, हेंही विशद केलें! हे मामा पूर्वी श्रीमंत होते, पण आतां त्यांच्या धर्मावतार स्वभावदोषामुळें गरीबीला आले आहेत. हेंही त्यानें सांगून टाकलें.

पंडितानींही निशिगंधाबद्दल मामांजवळ यथोचित शब्दांत खऱ्या अंतःकरणानें गौरवपर सांगितलें. त्याचा आपला समसमासंयोग झाला आहे, आपण त्याला आपला पाठचा भाऊ लेखतो. तो आमच्या घरांतला आणि कचेरींतला आमच्यावर हुकमत गाजविणारा प्रेमळ अधिकारीच नेमला आहे, 'प्रफुल्ल' पत्राच्या सांप्रतच्या कमाल भरभराटीचा मोठा वांटा आपल्या भाच्याच्याच पराक्रमाकडे जातो! इत्यादि निःसंकोचपणानें सढळ शब्दांत पंडितांनीं मामांना सांगितलें. मामांना धन्यता वाटली! निशिगंधाला कृतकृत्य वाटलें!

मामानीं त्याला परत निघतांना, "अरे, तुझी एक आई आहे. आतां तरी तिला एकदां येऊन भेट! मायेच्या माणसाचा प्रेमळ हात पाठीवरून फिरला आणि त्यांचा संतुष्ट मनाचा आशिर्वाद मिळविला, तर आणखी नाहीं कां चांगले होणार?" असें म्हणून अत्याग्रहानें निशिगंधाला घरीं चार दिवस तरी ये असें बजावलें.

त्यानेंही कबूल केलें! चुकार पोर—घरांतून बाहेर पडले म्हणजे पुढें तें

कितीही बाहेर मोठें झालें असलें तरी, आपल्या अपराधाच्या जाणीवीनें आपल्या मायेच्या माणसांत जायला भिते. टाळाटाळी करते. तसेंच निशिगंधाचें झालें होतें. वडील मंडळींनींच मागील विसरून व चालूं परिस्थितीचा गौरव करून परत बोलावलें म्हणजे तें बिचकत पण जातें. निशिगंधानें घरीं येण्याचें मान्य केलें तें यांच अर्थानें !

आणि म्हटल्याप्रमाणें तो घरीं गेला एकदांचा ! त्याच्या आईला, मामांना, मामीला, आणि त्यांच्या लेंकराबाळांना निशिगंधाच्या आगमनानें किती आनंद झाला असेल, हें लिहून व्यक्त करतां येणें अशक्य आहे ! मुलांना तर आजच 'दिवाळी' आली असें होऊन गेलें !

तो याच्या पूर्वींच खरें म्हटलें तर घरीं जायचा. गेलाही असता. पण मध्येंच पंडितांच्या चिरंजीवांनीं—प्रसादनें मुंबईस भलताच प्रसंग आपल्या प्राणावर ओढवून घेतल्यानें तो बरा होऊन सुखरूप परत आणीपर्यंत, त्याला कोठें हलतांच येणें शक्य नव्हतें !

पंडिताचा मुलगा मुंबईस शिकत असतां शहाणी सावर्डेकरच्या प्रेमाच्या लव्हाळ्यांत कसा अडकला, तिला दिवस गेल्याचें कळल्यावर, तिच्या आईबापांनीं त्याची गत काय केली, त्यानें अगतिक होऊन, अफूची गोळी खाऊन आत्महत्त्येचा अयशस्वी प्रयत्न कसा केला, तो त्यांतून डॉक्टरांच्या दक्षतेनें कसा वांचला, त्यानें पंडितांना व चारुशीलेला—आपल्या आई-बापांना, शहाणी सावर्डेकराला, तशा परिस्थितींत, आपली सून करून घेण्या-विषयींचा कसा बिकट पेचप्रसंग टाकला, हें आतां अगदीं जगजाहीर झालें होतें !

प्रसादला घरीं आणण्यांत आल्यानंतर पंडितांची, चारुशीलेची व त्यांच्याहीपेक्षां खुद्द प्रसादची मनःस्थिती ताळ्यावर येईपर्यंत निशिगंधाला पाय बाहेर काढतां आला नव्हता !

तें वातावरण जरा निवळलें. प्रसाद मोकळेपणानें हिंडूं फिरूं लागला पंडित आपल्या कामाकडे लक्ष घालूं लागले. चारुशीला घरकामांत गढूं लागली, तेव्हां पंडितांची अनुमती घेऊन स्वस्थ चित्तानें निशिगंध घरीं जायला तयार झाला !

निशिगंधाचे मामा, मामी, त्यांचा मुलगा जगन्नाथ, जगन्नाथाचा

मित्र गोपिनाथ, मामांची अठरा एकोणीस वर्षांची मुलगी विजया उर्फ विजू किंवा विजू, आणि तिची मैत्रिण कुंदाराणी, निशिगंधाची जराजर्जर आई, ही घरांतील सर्वच लहान थोर मंडळी बाहेर एकत्र जमली होती. मामा बैठकीवर तक्याला टेकून, पान तंबाखुचा जामानिमा पुढं घेऊन बसले होते. दाराच्या उंबरठ्यावर अर्धी मांडी टेकून—आपल्याच बाजूला निशिगंधाची आई, आणि तिच्याच मागें मामी असून दोघीही मानेला ताण देऊन बाहेर पहात होत्या. कळत कीं न कळत कोण जाणें, पण जगन्नाथ सहज शेजारीं असेल, अशा बेतानें कुंदाराणीनें आपली ऐटदार बैठक ठोकली होती, तर विजू गोपीनाथाशीं सलगी दिसेल, इतकी त्याला चिकटली होती.

ही मंडळी अशी एकत्र जमण्याचें विशेष कारण म्हणजे, मामांच्या एका वृद्ध शेजारी स्नेह्यानें, त्यांच्याकडे अनंतशास्त्री नामक एक दरबारी ज्योतिषी आणले होते !

तरुण मंडळी त्या ज्योतिषीमहाराजांकडे, विनोदाच्या, कुचेष्टेच्या दृष्टीनें पहात होती. त्यांची आपआपसांत करपल्लवी आणि नेत्रपल्लवी अनंत-शास्त्रींची टिंगळ—टवाळी करण्याकरितां चालली होती. मामा त्यांच्याकडे संभावितपणानें पण आसावल्या नजरेनें पहात होते. आई—मामी, हे,ज्योतिषी-महाराज काय—कोणाचें भविष्य वर्तवितात, या भाविक भावनेनें आणि श्रद्धाळू अंतःकरणानेंच दृष्टि देऊन होत्या.

ज्यांनीं अनंतशास्त्रींना आणलें होतें, त्यांनीं, मामांच्या जवळ, त्यांच्या शास्त्रनैपुण्याबद्दल मुक्तकंठानें स्तुती केली होती. ते कुंडलीवरुन पाहतात. रमल जाणतात. प्रश्नकुंडलीवरून भविष्य सांगणें त्यांच्या हातचा मळ आहे. सामुद्रिकाचा त्यांचा व्यासंग गाढा आहे. तोंड पाहून तात्काळ कुंडली मांड-तात—भविष्य झटपट—आणि अचूक सांगतात, इत्यादि सांगण्यांत मुळींच कसूर केली नव्हती !

अनंतशास्त्री ज्योतिषी मात्र एक अजब वल्ली होती ! त्यांचा वेषच मोठा विचित्र होता ! कळकट धोतर, मळकट कोट, तोही पाठीवर सबंध चिरलेला. हातोप्याच्या धसाड्या बऱ्याच निघालेल्या. अनवाणी; डोक्यांस बांधलेला तांबड्या रंगाचा जुनाट रुमाल-इतका किटला होता की, तो कुरकटला होता कीं, त्याचा मूळचा रंग कोणत्या अशाचा, याच्या करितां संशोधन

मंडळच नेमावें लागलें असतें ! छपरी--रांठ केसांच्या मिशा, दाढी बरीच वाढलेली, हात लागला असतां, तर चांगलीच आग झाली असती ! भिवया केवढया जाड--आणि भरभरीत ! आणि त्या चांगल्या मुद्दाम चिकटविल्या असाव्यात अशा दिसत होत्या. आविर्भाव युक्त बोलतांना, त्यांची एक भिंवई बरीच वर चढे, पण एक ठिकाणींच शांत राहत असे ! नेहमीं बोलतांना डोळयावर चाळीशी. पण कुंडली हातांत घेऊन पाहतांना–वाचतांना मात्र चाळीशी एकदम कपाळपट्टीचा प्रांत सहजगत्या काबीज करी !

बाह्य बावळटपणा पाहून तरुण बाबा लोक आपली करमणूक करुन घेत होतेच. त्यानंतर त्यांच्या 'भविष्या'चे तीन तेरा कसे करतां येईल आणि त्या योगें आपली करमणूक आणखी किती होईल या विचारांत होते ! पण अनंतशास्त्री ही कांहीं कमी वस्ताद नव्हते ! बारा गांवचे पाणी प्यालेले ते ! अशा कच्च्यांच्या टवाळीला भीक घालणार थोडीच ते ? त्यांच्या हालचाली न्याहाळीत होते. चावीत चावीत बोलत, मामांच्याकडे आपला लग्गा कितपत लागतो, याचा कयास बांधण्यांत गढले होते ज्योतिषीमहाराज !

वृद्ध गृहस्थानीं सूतोवाच करून दिलें. ज्योतिषीबोवांना कांहीं विचारा असें मामांना सुचविलें. सुरवात झाली !

मामा श्रीमंतींतून गरीबीला आलेले. कर्जानें गांजलेले. ते दुसरे काय विचारणार ? आणि विचारावें कसें ? याचाच विचार त्यांना पडला ! त्यांचा जगन्नाथ बेकार होता. त्याला कोठें नोकरी मिळेल काय ? हें त्यांना विचारावयाचें होतें. तसेंच त्यांची बिजू आतां अगदीं त्यांच्या दृष्टीनें गळयाला आलेली – लग्नाला झालेली. तिला स्थळ चांगलें कसें मिळेल, आपल्या परिस्थितीला कसें झेंपेल ? लग्न केव्हां होईल ? हें त्यांना – त्यांच्यापेक्षां बिजूच्या आईला ऐकावयाची आतुरता होती !

मामा कांहीं बोलेनात. त्यांची अडचण अनंतशास्त्रींनीं ओळखली ते होऊनच पुढें सरकले. त्यांनीं एकेकाचा हात पहायला सुरुवात करून ते लगेच बोलायलाच लागले.

" गेलीं दहा वर्षें आपल्याला अत्यंत त्रासाचीं गेलीं. पुढील दीड वर्षांत आपणांला बराच पैसा मिळेल. नक्की किती हें सांगत नाहीं. पण आपण

कर्जमुक्त तर व्हालच. पण त्याशिवाय बरीच पुंजी करून ठेवाल. निष्काळजी व्हाल !"

अनंतशास्त्रींनीं मामांचें भविष्य कथन केलें !

मामा चकितच झाले ! त्यांचा चेहरा प्रफुल्लित झाला ! न विचारतां नेमका तोंच प्रश्न ज्योतिषांनीं कसा हाताळला, याचें त्यांना आश्चर्य वाटलें. त्यांनीं आपल्या वृद्ध शेजाऱ्याकडे पाहिलें !

त्यानें " द्या टाळी महाराज ! कसे आहेत आमचे ज्योतिषी ! मी उगाच नाहीं म्हटलें ! अहो, मला त्यांनीं असेंच सांगितलें " तुम्हीं शंभर वर्षें पुरी करणार ! हिंदुस्थानाला संपूर्ण स्वातंत्र्य मिळालेलें तुम्हीं आपल्या डोळ्यांनीं पाहणार ! आणि खरोखरी माझी इच्छा तीच आहे !

" मी त्यांना हिंदुस्थान स्वतंत्र झालेला मला पाहावयाला मिळेल काय ! हेंच विचारणार होतों ! – आतां बोला ! " त्या वृद्धानें अगत्यानें टाळी वाजवीत मामांना म्हटलें !

ज्योतिषी महाराजांनीं चिरंजीव जगन्नाथचा हात मागिला – तो पुढें सरकला. आपल्या सैन्यांकडे पाहून मिस्कीलपणानें हंसत, आपला हात ज्योतिषीबुवापुढें केला. डोळ्यावरचा चष्मा कपाळावर एका हातानें नेऊन दुसऱ्या हातानें जगन्नाथाचा हात उलथा पालथा करण्याचें चालविलें. हात पाहिला. ' हं ! ' असें स्वतःशींच केलें. आणि वर कोणाकडेच न पाहतां तें आतां जगन्नाथाचें भविष्य वर्तवूं लागले–

" ठीक आहे. वावगं नाहीं. कीर्तिही आहे – आणि मनपसंत कांताही मिळेल – पण – "

ऐकतांच जगन्नाथाच्या हाताला कसला तरी झटकाच बसला ! कुंदाराणीची तर विलक्षणच तारंबळ उडाली. त्यांच्यांत झालेली चुळबुळ, गोपीनाथ आणि बिजूच्या पण ध्यानांत आली. त्या दोघांनीं कुंदाराणीकडे पाहिलें. " नोकरी मिळेल – पण स्वतंत्र उद्योगाचा योग जास्त आहे. सध्यां मनाचे हेलकावे आहेत ! – " तेंही खरेंच होतें. किंवा ते ऐकल्यावर तशी मनाची अवस्था जगन्नाथाची झाली खरी !–

आतां शास्त्रीमहाशय – बिजूकडे वळले, " आपला हात पाहूं ! – पण नको. दहा अंकांतील एका आंकड्याचें नांवच घ्या ना ! – "

लाजत – मुरकत, सगळयांकडे पाहिलें न पाहिलेंसें करीत, बिजूनें तोंडाला हातरुमालाचा बोळा लावीत – " नऊ " म्हणून म्हटलें !

" ठीक आहे ! नववा गुरू – तुम्हांला अविवाहित ठेवीत नाहीं खास ! पण – " ज्योतिषी महाराजांची वाचा वदली " तुमची इच्छा जो प्रियकर व्हावा – "

बिजूला विजेचा धक्काच बसला, ती एकदम ओरडली, " मुळींच नाहीं ! कुणी सांगितलं तुम्हांला हें ? "

" ग्रह सांगतात ! ते माझ्याशीं बोलतात. मी पदरचें काय सांगणार ? " शास्त्रीबोवा शांतपणें म्हणाले.

पण बिजू खवळली ती खवळलीच; तिनें त्यांना पुढें बोलूंच दिलें नाहीं !

" तुम्हांला कांहीं विचारायचं आहे ?

गोपिनाथाकडे मोर्चा वळवून ज्योतिषीबोवांनीं विचारलें —

आपलें गुपीत घरांतल्या मोठया माणसांदेखत हे भटजीमहाराज फोडणार, ही बिजूला खात्रीच वाटली. ती तडकाफडकीं उठून घरांत चालती झाली. गोपिनाथानें आपली चारचौघांत शोभा नको, म्हणून आपल्याला कांहीं विचारावयाचेंच नाहीं असें स्वच्छ सांगितलें.

पण त्यामुळें त्यांचें भविष्य न सांगतांच त्यांनीं कृतीनें ' खरें ' आहे असें कबूल केल्या सारखें झालें !

ज्यांची टिंगल करण्याची तरुणांची इच्छा, त्यांचीच ज्योतिषीमहाशयांनीं रेवडी उडविली ! मामामामी वगैरे सर्व आपापल्या विचारांत असल्यामुळें त्यांचें तरुणतरुणी मंडळाच्या नाजूक हालचालींकडे लक्षच गेलें नाहीं !

पण इतकें खरें कीं ज्योतिषीबोवांनीं प्रत्येकाचें वर्तविलेलें भविष्य ज्याचें त्याला पटलें. आवडलें आणि त्यांना मनांतल्या मनांत बरेंही वाटलें ! कर्ज फिटणार व पुंजी होणार म्हणून मामांना त्यांचें भविष्य पटले. जगन्नाथाची तर खात्रीच पटली. कुंदाराणीचा चेहरा पाहूनच शास्त्री बोवानीं मध्येंच त्यांना उद्देशून म्हटलें, " तुमचं मनोवांछित पूर्ण होणार आहे. पण अवकाश आहे ! भावी पतीला नोकरी तरी लागली पाहिजे – नाहीं तर उद्योग तरी मिळाला पाहिजे ! तो उद्योगी झाल्याशिवाय तुमचें जुळत नाहीं तुमचें पक्कें

झाल्याशिवाय त्याला उद्योग मिळत नाहीं असं त्रांगडं तुमचे ग्रह करून बसले आहेत! इत्यर्थ इतकाच कीं उशीरा कां होईना पण ग्रह तुमच्या मनाजोगतं करणार आहेत!" हें ऐकून कुंदाराणीची काय त्रेधातिरपीट उडाली! गोरीमोरी झाली ती! तिला मोठ्या माणसांकडेच काय, पण जगन्नाथाकडे, बिजूकडे किंवा गोपीनाथाकडेही पाहण्याची छाती होईना! मनांत मात्र तिला आनंद झाला! "हा बावळट बराच कीं आहे!" असें मनांत मात्र म्हटलें.

नंतर ज्योतिषीबोवा मामांकडे वळून म्हणाले, "आणखी आपल्याला कांहीं विशेष विचारायचं असेल तर विचारा खुशाल. मला सहजासहजीं सांगता आलें तेवढें मी सांगितलें. ज्योतिषशास्त्र गहन आहे. अभ्यासपूर्वक खोल विचार केल्या शिवाय तत्काळ यापेक्षां जास्त काय सांगतां येणार?"

आतां कोण काय विचारणार? मामांचें लक्ष आपल्या बहीणीकडे गेलें. तिनें हलकेंच सुचविलें, "बाबूची पत्रिका असली तर दाखव कीं!

त्यानीं आपल्या संग्रही असलेली निशिगंधाची कुंडली काढून ती शास्त्री-बोवांच्या हातीं दिली.

चष्मा पुन्हां कपाळावर नेत शास्त्रीबोवांनीं कुंडलीवरून दृष्टि फिरविली. निशीगंधांची कुंडली पाहतांक्षणींच शास्त्रीबोवांनीं निशिगंधाच्या गतायुष्यांतील बारीकसारिक गोष्टीसुद्धां खडानूखडा भराभर सांगून टाकल्या!

निशीगंधाच्या आईला ज्योतिषीबोवा देवावतार वाटूं लागले. तिला त्या गोष्टी पटल्या. मामांनां खऱ्या वाटल्या. कारण दोघांनाही त्या माहितच होत्या!

शास्त्रीबोवा जाण्याच्या तयारीला लागले! त्यांना आपला हात ओला होईल ही आशा दिसेना! त्यांनीं सहेतुक बरोबरच्या वृद्धांकडे पाहिलें, लगेच वृद्धानें मामांकडे पाहिलें. मामांनीं ओळखलें. मामा गरीबीला आले होते खरे; पण चारुदत्त कितीही गरीब झाला तरी तो आपला जन्मजात दानशूर पणा कसा सोडणार? त्यांनीं शास्त्रीबोवांची संभावना केली. त्यांना ती कमीच वाटली. पण शास्त्रीबोवांनीं जन्मांत इतकी मोठी संभावना पाहिली नव्हती इतकी ती खास होती! अती लवून नमस्कार करून शास्त्रीबोवांनीं मामांचा निरोप घेतला!

ते गेल्यावर, मामा आपल्या बहिणीशीं—व पत्नीशीं शास्त्रीबोवांच्या अगाध

ज्ञानाबद्दल तारीफ करूं लागले ! तरुणवर्ग आपापसांत एकीकडे बसून त्यावरच चर्चा करून, त्याच्या अचूक भविष्याबद्दल प्रांजल कबुली देऊं लागला !



त्यानंतर दोनच दिवसांनीं निशिगंध घरीं आला. एकदोन दिवस त्याच्या आगमनाच्या आनंदांत, आईकडून कौतुक करून घेण्यांत, मामाशीं मनमुराद बोलण्यांत गेले. नंतर तो मुलांत मिसळला ! तो वयानें, ज्ञानानें, अनुभवानें थोर खरा ! पण बटुबालमूर्ति ती ! मुलांतच शोभायची. मनानेंही तरुण ! मुलांत मिसळण्याची हौसही तशीच ! मुलांना 'बाबूदादा' आपल्या बरोबरचाच आहे, असेंच वाटूं लागलें !

त्याचें आणि त्याच्या मामेबहिणीचें—बिजूचें—मेतकूट फार लवकर जमलें. तो बोलका ! ती एक नंबरची बोलभांड आणि चौकस ! बोलतांना-चालतांना वागतांना खरोखरच बिजू नांवाप्रमाणें बिजलीच होती ! सारखी चमचम करी ! त्यामुळें निशिगंधाची ती फार आवडती झाली. ती त्याला वाटेल तें विचारी. तोही तिला तितकाच मोकळ्या मतानें विस्तार करून उत्तर देई !

एक दिवस तिनें त्याला, "बाबूदादा, ज्योतिष्याबद्दल—भविष्याबद्दल तुझें मत काय ?" म्हणून विचारलें !

"सब् झूट आहे !" त्यानें लगेच सांगितलें, "कां ? वर्तमानपत्रांतील आठवड्याचें भविष्य वाचतेस कीं काय !—कां ? कशाकरितां ?"

"तुम्हीं आपल्या वर्तमानपत्रांत भविष्य छापतां म्हणून आम्हीं वाचतों !" बिजूनें उत्तर दिलें.

"मूर्ख आहेस ! आमचा तो धंदा आहे ! आळशी, निरुद्योगी, ऐता पैसा मिळविण्याची इच्छा करणारे, त्यांना बनविण्यापेक्षां त्यांत काय असते ?" त्यांच्यांत वर्तमानपत्रें खपतात, म्हणून आम्हीं तें देतों ! त्या आळशी, निरुद्योग्यांपैकीं तूंही एक असशील असं मला नव्हतं वाटलं ?"

"मग वर्तमानपत्रांतलीं भविष्यें लोक वाचतात तीं कां ? पटतें म्हणतात तें कसें ?"

"साराच मूर्खांचा बाजार असतो ! तें वाचण्याचें एक व्यसन असतें! आणि मनाला जसें आवडतें तसेंच लिहिलेलें असलें म्हणजे बरें वाटतें ! खरें वाटतें ! म्हणून लोक वाचतात ! आतां तुला त्याची एक गंमत

सांगतों," निशिगंध बिजूला वर्तमानपत्रांतल्या आठवड्याच्या भविष्याची अंतरकी बात सांगूं लागला, "आमचा ज्योतिषी जेव्हां भविष्य पाठवीत नाहीं, तेव्हां आम्हीं जुन्या अंकांतलें भविष्याचें कात्रण काढून तेच नवें म्हणून छापतों. आणि तेही मूर्ख लोकांना बेधडक पटतें ! आतां सांग तूंच !"

ऐकून बिजूला जें काय हंसूं आलें तें पुसूं नका ! आणखी छेडण्यासाठीं व निशिगंधाला कुठीत करावें म्हणून बिजूनें, आपल्या घरीं ज्योतिषीबोवा आल्या वेळची इत्थंभूत हकीकत सांगितली आणि त्याला विचारलें, "शेजारच्या आजोबांना, आमच्या आबांना ( त्याच्या मामांना ), जगूदादाला त्या ज्योतिष्यानें तंतोतंत भविष्य पटेल असें कसें सांगितलें? ( आपल्यालाही भविष्य ऐकून कशा गुदगुल्या झाल्या, हें एवढें तिनें आवर्जून टाळलें. ) तसेंच तुझेंही भविष्य कुंडली पाहतांच सर्व कसें सांगितलें ? तुझ्या बाळपणची हकीकत खडान्‌खडा, आत्याबाईंना नी आबांना बरोबर पटणारी कशी सांगितली ?"

आपली बाळपणासूनची हकीकत सांगितल्याचे ऐकल्यावर निशिगंध जरा चकरला. पण त्याला लगेच शंका आली. त्यानें बिजूला ज्योतिष्याबद्दल विचारलें. तिनें ज्योतिषीमहाराज कसे होते, याबद्दल आपल्या यथार्थ शब्दांनीं, त्याच्यापुढें त्यांचें हुबेहुब चित्र उभें केलें. तेव्हां त्याची त्याच क्षणीं शंका निरसन झाली ! तो खो-खो करून हंसला आणि म्हणाला, "हातेच्या ! तो का तो कुडकुड्या जोशी ! अग, तो माझा चांगला माहितीचा आहे ! त्याचेंच तर ज्योतिष-भविष्य-आम्हीं आमच्या 'प्रफुल्ला'त छापीत असतों ! मीच त्याला माझी बाळपणासूनची सारी कथा अनेक वेळां सांगितली आहे ! तीच त्यानें जशीची तशी तुम्हां सर्वांना भविष्य म्हणून सांगितली, दुसरें काय ?"

जगन्नाथ, गोपीनाथ आणि कुंदाराणी त्याचवेळीं निशिगंध आणि बिजू होती, तेथें आली. बिजूनें त्यांना निशिगंधानें ज्योतिषीबोवा आणि त्यांनीं सांगितलेल्या भविष्याची रेवडी उडविल्याचें वर्णन करून त्यांची करमणूक केली. पण सगळ्यांना अजून त्या ज्योतिषी महाराजांचें भविष्य मोठ्या मंडळींना कसें पटलें हा प्रश्न होताच ! त्यावर निशिगंध काय मल्लीनाथी करतो हें ऐकावेसें वाटलें. म्हणून त्या सर्वांनींच त्याला त्याबद्दल विचारलें. तें व्यवहारशास्त्र असतें, ज्योतिषशास्त्र नसतें, तें कसें, हें निशिगंधानें वेंचक

शब्दांत अचूक असें तरुण–तरुणींना सहज पटवून दिलें. तो म्हणाला,

“ सर्व वयाच्या मंडळींना काय पाहिजे असतें, हें सुमारबुद्धीचा व्यवहारज्ञ कोणीही मनुष्यसुद्धां जाणतो. कसें तें पहा—

अविवाहित तरुणींना प्रेमाची भूक फार लागलेली असते. त्यांना प्रेम आणि प्रेमाचें माणूस याबद्दलच ऐकायची उत्कंठा असते. त्याबद्दल नुसत्या अनुमानानें, इकडे-तिकडे-पुढें-मागें पहात ज्योतिषी सांगतो. तें ऐकणाऱ्या तरुणींना आवडतच असतें म्हणून ऐकलें कीं पटतें.

बिजू–कुंदाराणी यांची गत अशीच झाली होती. त्या तें ऐकून बऱ्याच हंसल्या ! “ दुसरें, तरुणांना, नोकरी, धंदा, कीर्ति आणि त्याबरोबर मनांत भरलेली, शेजारी वावरणारी, गुलगुल गोष्टी करण्याकरितां जवळ येणारी–हवीशी वाटत असतें. ज्योतिषी तेंच जरा संदिग्ध शब्दांत सांगतो कीं, तरुण तें एकदम पटवून घेऊन उडया मारूं लागतात ! ”

जगन्नाथ, गोपीनाथ, बिजू-कुंदाराणी, यांनीं एकमेकांकडे पाहिलें. त्यांना कसेंसेंच झालें. त्यांच्याकडे पाहून निशिगंध हंसून म्हणाला, “ हें पहा ! तुमच्या या चाळ्याकडे पाहून मीच तुमच्याबद्दल भविष्य वर्तवितों ! त्याला तो कुडकुडया जोशीच कशाला पाहिजे ? ” असा भविष्याचा बोजवारा ऐकून त्या सगळ्यांची चांगलींच त्रेधा उडाली !

“ आतां राहिले आपले शेजारचे आजोबा ! त्यांना काय सांगितलें ? “ तुम्हीं हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळालेलें पाहणार ! म्हणजे, त्यांना अजून आयुष्य आहे. ते इतक्यांत मरत नाहींत. ऐशीं वर्षांच्या गृहस्थाला–आणखी जगावेसें वाटतें. साहजीकच आहे. मरावेसें कोणाला वाटेल का ? तें त्यांना पटेल असें सांगितलें. खरे वाटलें. हेंच जर त्यांना, ‘ एकादी तरुण पोरगी तुमच्यावर ‘प्रेम’ करायला येणार आहे, ’ असं सांगितलं असतं तर ? तें त्या आजोबांना पटलेंही नसतें–आणि तरुणीबद्दल त्यांनीं विचारलंही नसतें. नाहीं का ? ” निशिगंधानें आणखी भविष्यकथनांतील मजा सांगितली.

“ यानंतर राहिले आपले मामा ! त्यांच्या वयाच्या माणसांना तरुणींचें प्रेम नको असतें, आयुष्य नको असतें, पैशांच्या अडचणींनें ते वैतागलेले असतात ! पैसा हीच त्यांची तरुणी, पैसा हेंच त्यांचें प्रेमाचें स्थान ! तो मिळणार, असें सांगितल्यावर, कोणत्या अडचणींतल्या माणसाला बरें आणि

खरें वाटणार नाहीं ? मामा झाले तरी माणूसच आहेत ! पैसा मिळेल, कर्जमुक्त व्हाल, मुलाबाळांचें स्वास्थ्य करतां येईल, या कल्पनेनें त्यांना त्या कुडकुड्या जोशाचं भविष्य बरें आणि खरें वाटलें असेल तर नवल काय ? ”

तें ऐकून साऱ्या मुलांमुलींची हंसून हंसून मुरकुंडी वळली !

निशिगंधानें हंसत, खेळत, मजेनें भविष्याचा आणि भविष्यवाद्यांचा यथास्थित बोजवारा उडविला ! एक आवश्यक तें सत्कृत्यच त्यानें केलें !

आपल्या मामांकडे निशिगंध दहाबारा दिवस मजेंत राहिला. त्या अवधींत प्रामुख्यानें त्याच्या डोळ्यांत दोन गोष्टी आल्या. बिजूची बुद्धिमत्ता, तिचें रूप, तिच्या लग्नाचें वय, तिच्या अभ्यासा इतकींच, मामींनी गृहकृत्यांत तिला तिला मिळवून दिलेली दक्षता, हीं; आणि मामांना आणि मामींना बिजूच्या लग्नाविषयीं लागलेली चिंता ! द्रव्याभावी तिला योग्य स्थळ कसें मिळेल ही काळजी ! मामांनीं त्याबद्दल चारदोनदां बोलूनही दाखविलें होतें त्याला !

तो आणखी थोडे दिवस राहणार होता. सर्वांचा आग्रहही होता. आईला तर त्यानें जाऊं नये असें वाटत होतें. मुलें तर कोणी सोडायलाच तयार नव्हती त्याला ! पण निघून येण्याबद्दल पंडितांची तांतडीची तार आली. तेव्हां त्याला निघणें भाग पडलें. पंडितांची तार येतांच त्याला तिकडची आठवण झाली. सर्वांबरोबर, पंडितांचा 'प्रसाद' त्याच्या डोळ्यापुढें आला— आणि त्याच क्षणीं बिजू त्याच्या समोर आली. “ बाबूदादा, तूं जाणार ! आम्हांला तिकडे ने कीं एकदांतरी ! ” बिजू म्हणाली. तेव्हां काय झालें कोण जाणें ! त्याच्या मनांत एकदम कल्पना आली, “ प्रसाद आणि बिजूचें जुळविलें तर ?—एकपंथ दो काज ! मामा काळजींतून सुटतील. पंडित— चारुवहिनींनाही सुटल्यासारखें होईल. 'प्रसाद' ला सन्मार्गाला लावतां येईल. बिजूचें कल्याण होईल ! ” तो त्या वेळीं कोणाला कांहींच बोलला नाहीं. त्यानें मनांत ठेवलें. पण निघण्याच्या वेळीं बिजू जेव्हां त्याला, “ बाबूदादा, चार दिवस तरी मी येणार अं तुझ्याकडे ? ” असें म्हणाली. तेव्हां तो हंसून तिला म्हणाला, “ ठीक आहे. चार दिवसच कां ? जन्मभर तुला तिकडेच राहतां येईल मजेंत, अशाच बेतानें तुला घेऊन जाईन ! काळजी कां करतेस ? ”

---

## प्रकरण दुसरें

प्रसाद क्षीरसागर आणि शहाणी सावर्डेकर या प्रणयी युगुलाच्या प्रणय नाटकाचा पहिला अंक खूप चढला. चांगलाच रंगला. प्रसादनें अफूची गोळी गिळून प्रणयाच्या पायीं साक्षात् मृत्यूला आपण होऊन कवटाळण्यासाठीं धांव ठोकली होती. मृत्यूच्या कराल कडयावर तो उभा राहिला होता! त्याच्यामुळें आणि स्वतःमुळेंही शहाणी सावर्डेकर-प्रसादची प्रणयिनी, स्वतःच्या अब्रूला, घराला, समाजाला, प्रसादप्रियकराला आणि प्रसाद प्रमाणें स्वतःच्याही प्राणाला कायमची पारखी होणार कीं काय ? अशाही स्थितींत आपल्या आईबापांच्या बंधनांतून निसटून-प्रसादला गाढ आलिंगन देण्यास, त्याच्याकडे पोंचण्याचा अट्टहास करीत होती. प्रसादची अखेर काय होणार ? शहाणीचा शेवट काय लागणार ?

अशा प्रकारची नायकनायीकेची जोडी कल्पून एकाद्या नाटककारानें, आपल्या काल्पनिक नाटकाच्या पहिल्या अंकाच्या शेवटीं, त्या जोडप्याच्या प्रणयाची मजल-प्रसाद शहाणी प्रमाणेंच, वरील प्रकारापर्यंत आणून तेथेंच अंकाचा पडदा टाकला असतां, तरी प्रेक्षकांच्या चित्तवृत्ति तेवढयानेंही विलक्षण थरारून गेल्या असत्या. " त्यांचें याच्यापुढें काय ? " असा संभ्रमात्मक-कुतुहलोत्पादक प्रश्न प्रेक्षकांच्या मनापुढें उभा राहिला असता. एका अंकावरूनच रसिक प्रेक्षकांनीं नाटककाराच्या नाटयलेखन कौशल्याबद्दल " उत्कृष्ट ! " असें प्रशस्तीपत्र देऊन टाकलें असतें !

पण प्रसाद-शहाणीच्या जीवननाटकाचा खेळ अनंतकाळानें रचला होता. तो खरा-प्रत्यक्षांतला होता ! आणि अनंतकालरूपी नाटककार काय

सामान्य नाटककाराच्या कोटींतला असणार ? म्हणून तो तेवढाच साधा एक प्रश्न प्रेक्षकापुढें मांडून अंक संपवील ?

प्रसाद–शहाणीच्या जीवननाटक रचणाऱ्या अनंतकालस्वरूपी नाटककारानें त्या नाटकाच्या प्रयोगाला उपस्थित असणाऱ्या त्यांच्या जिव्हाळ्याच्या, नात्यांच्या, प्रेमाच्या, अशा पंडित, चारूशीला, शहाणीची आई, या वेंचक, सहृदय प्रेक्षकांना, त्या नाटकाचा पहिला अंक संपवितां संपवितां–डॉक्टर-कडून प्रसादला पुनर्जन्म देऊन आनंदीत केलें, शहाणीची त्याची तशाही परिस्थितींत भेट करवून, प्रसादला आणि शहाणीलाही आपल्या भावी सुखमय आयुष्याबद्दल आशा वाटायला लावून किंचित् आराम दिला. त्यांच्याबद्दल प्रेक्षकांना सहानुभूति वाटायला लावली. आणि मग शहाणीचा हात हातांत घेतलेल्या प्रसादकडून आपल्या प्रेक्षकांपुढें, " अशा स्थितींत ही सून म्हणून आपण पत्कराल काय ? " असा बिकट पण रोकडा प्रश्न टाकवून पहिल्या अंकाचा पडदा पाडला होता !

प्रश्न सामान्य नव्हता. क्षुल्लक नव्हता. आणि त्रयस्थ–क्षणभर नाटककाराच्या नाट्यकौशल्याची वाहवा करावी, अशा–सामान्य–करमणुकीसाठींच आलेल्या प्रेक्षकां करितांही तो नव्हता !

व्यक्ति, कुटुंब, समाज, देश, राष्ट्र, या सर्वांना, ज्या सामाजिक, धार्मिक, नैतिक, इत्यादींच्या, अनेक शतकांच्या बनलेल्या संस्कृतीनें जखडून टाकलें आहे, त्या संस्कृतीचें बंधन सर्व प्रकारच्या, मागच्यापुढच्या गुंतागुंतीच्या अडीअडचणी डोळ्यापुढें ठेऊन, आपल्या एकाद्या तात्कालिक सुखसोयींसाठीं, ताडकन् तोडण्यास, निदान, तें होईल तितकें सैल करण्यासाठीं, तें राष्ट्र, तो देश, तो समाज, तें कुटुंब किंवा ती व्यक्ति, आपण अडचणींत सांपडलों असें वाटून, सज्ज होते व त्या करितां अगोदर प्रश्न टाकते, तेव्हां, प्रश्न टाकणारापुढें, कशी बिकट परिस्थिती उभी राहते ?

प्रसादचा तशाच प्रकारचा प्रश्न त्याच्या जिव्हाळ्याच्या मंडळींना पडला ! ते प्रेक्षक क्षणभर कौतुक करून, प्रसंगीं 'हौस–हो' ठोकून नुसती भलायकी देणारे आणि घेणारेही नव्हते ! ज्याचें जळतें, त्याला कळतें, या कोटींतले ते होते ! हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ठेवून फुकटांत दानशूरत्वाचा अभिमान बाळगणाऱ्यांना त्या बिकट प्रश्नाचें काय होय !

आणि म्हणूनच काळाच्या खेळांतील एकाद्या घटनेचें थोडें जरी सत्य स्वरूप एकाद्याला दिसलें, म्हणजे तो अचंब्यानें उद्गारतो कीं, कल्पनेपेक्षांही सत्य फार भव्य, अतीशय भीतिप्रद आणि मनाला गुंग करून दिग्मुढ करणारें असतें !

प्रसादनें आपल्या आईबापास केलेल्या प्रश्नाचें सर्वांगीण सत्यस्वरूप त्याचे त्याला पुरें आकलन झालें होतें कीं काय कोणास माहित ! पण त्या प्रश्नानें चारुशीलेला, पंडितांना चांगलेंच भेडसावलें, दिग्मूढ बनविलें, " आतां पुढें काय होणार ? " याचा त्यांना खरोखरच प्रश्न पडला !

आपल्या प्रश्नाचें अनुकूल उत्तर मिळून आपण सुखी होणार, या कल्पनेनें प्रसाद-शहाणी समाधानाचा निश्वास टाकीत आहेत, आपला प्रसाद कालाच्या कराल दाढेंतून सहिसलामत सुटून आपला आपल्याला लाभला आहे या एका आनंदांत, तर त्यानेंच नवा विचित्र प्रश्न टाकून आपल्याला पेंच-प्रसंगांत घातलें आहे, या मनाच्या विलक्षण घोटाळ्यांत घालून प्रसाद–शहाणी–च्या जीवनांतील प्रणयी नाटकाचा अंक काल नाटककारानें संपविला होता ! आतां पुढें काय ? हा प्रश्न सर्वांच्याच पुढें होता !

कोणें सोडविणार होते तो समाधानकारक प्रश्न ? प्रसाद ? शहाणी ? चारुशीला ? पंडीत ? शहाणीचे आई बाप ? कां समाज ? जग ? पण जग म्हणजे काय ? कुठें आहे जग ? जगाचें प्रातिनिधिक स्वरूप, प्रसाद, शहाणी, पंडित, चारुशीला, शहाणीचे आईबाप-हेंच नव्हे का ? ते हा प्रश्न सोडविणार ? त्यांच्याकडून हा प्रश्न सुटेल ? सुटला तरी पटेल ? पचेल ? सर्व सम्मत होईल ? कोण सांगणार हें ?

प्रश्न कालस्वरूपी नाटककाराचा होता. त्यानें तो टाकला होता. त्याचें उत्तर चोखरीतीनें द्यायला तोच समर्थ होता. परिस्थितीचें कोडें परिस्थितीच, योग्य काळीं, योग्य प्रसंगीं, योग्य स्थळीं सोडवीत असते, असें म्हणतात, तें याचसाठीं ! " बाहुलीं मनुष्यें केलीं, त्या अनंतरूपें दिधलीं ! " असें अधिकारानें म्हणणाऱ्या आणि म्हणण्याप्रमाणें वाटेल तशीं सगळ्यांना नाचविणाऱ्या, कालानें आपला खेळ पुढें चालू केला.

प्रसाद–शहाणीच्या जीवन नाटकाच्या दुसऱ्या अंकाला पुढील प्रमाणें सुरुवात झाली—



निसर्ग नियमांना अनुसरून जो नाटककार आपल्या नाटकाची रचना करतों, त्याच्या नाटकांत एका प्रसंगांतून दुसरा, पुढचा प्रसंग आपोआप उत्क्रांत तर होत असतोच, पण दोन प्रसंगांची बेमालूम सांधणी साधण्या साठीं विष्कंभक म्हणून जो भाग असतो; तोही सफाईदार, थोडक्यांत, सहेतुक, मागें काय झालें आहे, त्याची उत्तेजक आठवण न विसरूं देणारा, पुढच्या भागाकडे लक्ष वेधण्यासाठीं ओढ लावणारा, असाच सुस्पष्ट असतो ! आणि द्रष्ट्या नाटककाराच्या कृतींत ते सर्व गुण सहजगत्या दिसून येतातच ! कालाच्या खेळाच्या दुसऱ्या अंकाच्या सुरुवातीचा विष्कंभक भाग असा होता—

पंडीतांनीं किंवा चारुशीलेनें प्रसादच्या त्या प्रश्नाला नाहीं किंवा होय, यापैकीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. कारण तशा बिकट प्रश्नाचा निर्णय असा तडकाफडकी त्यांना देतांच येणें शक्य नव्हतें ! त्यांच्या मतांचा जरी गोंधळ उडाला तरी त्यांनीं तो बाहेर दिसू न देतां, नुसत्या सहानुभूतीच्या दृष्टीनें, त्या दोघांकडे पाहून ती वेळ मुत्सद्दिगिरीनें मारून नेली. माधवराव टेंबे, या आपल्या स्नेह्यांबरोबर चारुशीलेला त्यांनीं त्यांच्या घरीं अगोदर धाडून दिलें. नंतर, ज्या विश्वासानें शहाणीला, तिच्या वडिलांची सम्मति मिळवून बरोबर आणिलें होतें, तिला, तिच्या आईसह, तिच्या घरीं स्वतः नेऊन पोंचवून दिलें. त्या स्थितींत, त्याच वेळीं, त्यांच्या घरीं बसून, पुढल्या कोणत्याही गोष्टी संबंधानें, शहाणीच्या वडिलांशीं भाषा करणें, पंडितांना अशक्य होतें. त्यांना बोलतां आलें नसतें आणि शहाणीचे वडिलही बोलण्याच्या किंवा ऐकून घेण्याच्या स्थितींत ( दारू पिऊन तर्रर असल्यामुळें ) नव्हते ! " नंतर मी आपल्याकडे येईन. त्या वेळीं बोलूं. बसूं " असें सभ्यतापूर्वक आश्वासन देऊन ते पुन्हां दवाखान्याकडे परतले. प्रसादला प्राणदान देणाऱ्या ईश्वरतुल्य डॉ. खरे, यांचे पुन्हां पुन्हां शतशः आभार मानून आणि त्यांची परवानगी घेऊन त्यांनीं प्रसादाला आपल्या स्वाधीन करून घेतलें.

" प्रसाद सुखरूप आहे. त्याला बरोबर घेऊन आम्हीं सर्व निघतों आहोंत. स्टेशनवर घ्यायला या " अशी त्यांनीं निशिगंधाला तार ठोकली.

पंडित सर्वांसह घरीं परत आले !

प्लेगचें भयानक स्वरूप संपून वातावरण शांत झालें म्हणजे जसें लोकांना वाटतें, तसेंच पंडित, चारुशीला यांना घरीं आल्यानंतर वाटत होतें !

सर्वांची दैनंदिनी लवकरच यथाक्रम चालू होण्याच्या मार्गाला लागली.

प्रसाद प्राण संकटांतून वांचल्याचें वर्तमान चारुशीलेनें आपल्या आप्पांना लिहून कळविलें. पंडित आपल्या वडिलांना तसेंच लिहून कळविणार होते, पण लिहून कळविणें न कळविणें, एका दृष्टीनें सारखेंच होतें. त्यांना त्याचें महत्व कितपत वाटलें असतें हें एक, आणि दुसरें, प्रसादाला त्यांच्या मर्जी प्रमाणें त्यांनीं त्यांच्याकडे शेतवाडी करावयाला पाठविलें नव्हतें म्हणून प्रसाद त्यांच्या मनांतून उतरला असेल अशी कल्पना पडीतांना होतीच. मग उगाच लिहा कशाला ? बसलेल्या गांजिण्या उगाच आपणच उठवून, त्या प्रसादला तशाच आपल्यालाही डसायला येतील अशी व्यवस्था करा कशाला ? या कल्पनेनें त्यांनीं आपल्या 'प्रफुल्ल' पत्रांत, त्या प्रसंगाला प्रसिद्धीही दिली नाहीं. ज्या वर्तमानपत्रकारांना दुसऱ्याच्या डोळयांतलें कुसळ दिसतें आणि त्या कुसळाचें मुसळ करून त्याला सार्वजनिक स्वरूप देण्याची घाई सुटते, ते वर्तमानपत्रकार आपल्याच घरची घाण आपल्याच पत्रांत कशी पसरवितील ? आपल्या घरच्या मुसळाच कुसळ करून प्रसिद्धी द्यावयाचें म्हटलें तरी तें त्यांना खुपणार ही धास्ती वाटून, त्यापासून अलिप्त राहणारच !

पंडीतांनीं आणि चारुशीलेनें निशिगंधाला प्रसादनें आपल्या प्राणावर अफूची गोळी गिळून बेतविली आणि डॉक्टर खरे यांनीं त्याला त्यांतून वाचविले, एवढीच हकीकत प्रथम सांगीतली. ती चारूशीलेनें जेव्हां साश्रू-नयनांनीं सानंद सांगितली, तेव्हां ती ऐकतांना सहृदय निशिगंधाच्या डोळयांना पाणी आल्यावांचून राहिलें नाहीं !

गंभीरतेनें तीच गोष्ट पंडितांनीं सांगतांना निशिगंध त्यांच्या इतकाच गंभीर झाला होता.

आठ पंधरा दिवस सर्वांचेच सहज इकडे तिकडे गेले. पंडितांनीं आपल्याला इकडे कां आणलें, आपणही कां आलों, याचा विचार प्रथम प्रसादला फारसा आलाच नाहीं. आईबापांनीं आणल, तो आला. शहाणीचा हात आपल्या हातीं धरून, आपल्या आईबापास, "आपण तिच्याशीं लग्न करणार !" असें त्यानें विचारलें होतें, तो दवाखान्यांतला प्रसंग प्रसादला आठवत होता. आपल्याला त्यांनीं मूक सम्मति दिलीच आहे, असें तो समजत

होता. ती वेळ, ती घटका, प्रत्यक्षांत केव्हां उतरते हाच काय तो एक प्रश्न प्रसादच्या दृष्टीनें त्याच्यापुढें होता.

त्या प्रश्नाला पुन्हां, केव्हां कशी चालना द्यावयाची, त्याचा विचार प्रसादनें घरीं आल्यापासून फारसा केलाच नाहीं. त्याची जरूरी आहे, असेंही त्याला वाटत नव्हतें. थोडा तसा काळ मध्यंतरीं जाणारच, असेंच तो मनाशीं मानीत असावा ! प्राणाचें मोल पणाला लावल्या नंतर, जी घटना—आपल्या मनाप्रमाणें व्हावयाला पाहिजे, ती होणारच, अशी जवळ जवळ प्रसादला खात्री वाटत असल्यास, त्यांत विशेष असें कांहींच नव्हते.

मध्यंतरी चारदोन दिवस गेल्यानंतर, तो स्वाभाविकच शहाणीच्या पत्राची प्रतीक्षा करूं लागला. तिला आपण पत्र पाठवावें असेंही त्याला वाटूं लागलें. पण आधीं तिचें पत्र येईल, मग आपण तिला उत्तर पाठवूं, अशा कल्पनेनें त्यानें पत्र लिहिण्याची उत्कंठा प्रयासानें आंवरून धरली !

आपल्या वसंत मामाला आणि सुलभा मामीला मात्र त्यानें झालेल्या सर्व—प्रसंगाचें—त्यांना जेवढें, जें कळवावेंसें उचित वाटलें तेवढें तेच—पत्रांतून कळवून, आपल्या होणाऱ्या विवाहाला, आपली सहानुभूति, सहाय्य आणि आशीर्वाद अगाऊ मिळविण्यची आपली उत्सुकता व्यक्त केली ! आपली योजना, हेतू, कल्पना, आणि सामाजिक सुधारणांत, आपल्यापुढें आपण एक तरी पाऊल पुढें टाकूं शकतों, याची जाणीव प्रसादला वसंतमामाला पत्र लिहित असतांना रिझवीत होती. अभिमान वाटावयाला लावीत होती ! वसंतमामाच्या पत्रोत्तराची वाट पाहूं लागला प्रसाद ! योग्य वेळीं तें आलें. त्याच्या अपेक्षेप्रमाणेंच त्या उत्तरीं मजकूर होता. वसंतानें त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन केलें होतें. सुलभेनें त्याला शतशः धन्यवाद देऊन त्याचें आणि शहाणीचें अनेक प्रकारें अभीष्ट चिंतीलें होतें !

पण शहाणी सावडेकर कडून अपेक्षित—अनपेक्षित असें कसलेंच पत्र अजूनही येईना ! प्रसाद दरदिवशीं अधिर होऊं लागला. राग—चिंता—काळजी—आतुरता—या सगळ्यांनीं प्रसादाला बेजार केलें. तिचें पत्र कां येऊं नये, हेंच त्याला समजेना. तिच्या आणि तिच्या आईच्या समक्ष आपल्या विवाहाची निश्चिती झाल्यांनतर, आतां तिला पत्र पाठवावयाला कां अडचण वाटावी, हें त्याला कळेना ! आतां त्याला धीर निघेना. तिचें अगोदर पत्र

नाहीं, तर आपणच अगोदर तिला पाठवावें, असें त्यानें ठरविलें. तो लगेच पत्र लिहावयाला सरसावला. पण लेखन सामग्री घेऊन प्रत्यक्ष लिहावयाला बसल्यावर, त्याला उगाचच एकेक शंका येऊं लागल्या. तेथें काय परिस्थिति आहे कोण जाणें ! अजून शहाणीच्या बापाचा संतापलेला मेंदू शांत झाला नसला तर ? तिच्या आईचा राग पुन्हां उसळला असला तर ? आपलें पत्र तिच्या हातीं न पडतां तिच्या बापाचें हातीं पडून त्यानें तिला दिलेंच नाहीं तर ? तो फाडून टाकील, शहाणीला सतावील. कदाचित् ती अजून आपल्या आईबापांच्या पहिल्यासारखीच कैचींत असेल, त्यांच्याच धाकानें, भीतीनें आणि तिच्यावरील त्यांच्या खडया पहाऱ्यानें तिला आपल्याला पत्र लिहितां आलें नसेल ! म्हणून तिचें पत्र नाहीं ! आणि म्हणूनच आपलें पत्र तिला मिळणारही नाहीं ! शंका बळावूं लागल्या. मन बेचैन बनलें. त्याची लेखणी, दौतींत बुचकळण्यापूर्वी हातांत जशीच्या तशीच राहिली !

प्रसादला पेंच तर पडलाच पण त्याची उत्कंठाही थांबेना. कांहीं वेळानें त्याला तोड सुचली. आपल्या प्राध्यापक मित्रामार्फत आपलें पत्र शहाणीला पोंचतें होऊं शकेल. तो उदारधी महात्मा आपलें हें कार्य करीलच, हा त्याला भरंवसा होता. प्रणयी जनांचा प्रणयपूर्ण पत्र व्यवहार सरळमार्गानें होण्यास नेहमीं अडचणी असायच्याच ! आणि त्यांना त्या अडचणींतून वाट काढण्यास आपल्या विश्वासांतल्या मित्रांशिवाय दुसरा कोण त्राता मिळणार ? ते मित्र ही भले असले म्हणजे, आपल्या प्रणय-प्रधान मित्रांची असली नाजूक कामगिरी बिनबोभाट, मोठ्या तत्परतेनें आणि काळजीपूर्वक करीत असतात ! प्रसादनें आपल्या प्राध्यापक स्नेह्यामार्फत शहाणीला पत्र पोंचेल, अशा प्रकारची व्यवस्था करून, प्राध्यापकांच्याच पत्त्यावर पत्र पाठविलें.

पण पुढें आठ दिवस गेले, तरी प्राध्यापकांकडून उत्तर नाहीं आणि शहाणीचें पत्र तर नाहींच नाहीं ! हें असें कां झालें, याचा उलगडा कसा कोण करणार ?

प्रत्यक्ष धरणीकंपांतून प्रसाद जीवंत बाहेर आला होता. त्यांत सांपडतांना त्याला कांहीं वाटलें नाहीं. निधड्या छातीनें व उघड्या डोळ्यांनीं धरणीकंपामुळें दुभंगणाऱ्या भेगेंत, आपण होऊन त्यानें उडी घेतली होती. पण आतां

धरणीकंपाच्या ठिकाणापासून दूर असूनही प्रसादला धक्के बसताहेत, असें वाटून ते त्याला असह्य होत होतें !

पंडीतांशीं बोलण्याचा त्याचा विशेष कधीं परिपाठ नव्हताच, पण आपल्या आईशीं तो पुष्कळ बोले. तसें या वेळींही त्याचें चालू होतें. चारुशीला त्याच्याशीं बोले. मनमोकळेपणानें वागे. मागल्या गोष्टी जशा कांहीं कधीं झाल्याच नाहींत, असें समजून त्याबद्दलचा एक चकारही न काढतां अवांतर त्याला व आपल्याला बऱ्या वाटणाऱ्या अवांतर पुष्कळ प्रसंगावर आनंद-दायक बोलण्याकडे चारुशीलेनें आपली प्रवृत्ति वळविली होती.

मंदाकिनीला तर काय ? हेंही नाहीं आणि तेंही नाहीं. तिला जास्त कळतच होतें काय ? मुंबईस दवाखान्यांतील प्रसंग पाहिला, त्याचाही तिला आनंद आणि इथें आपला प्रसाददादा आपल्या बरोबर आला, त्याचाही आनंदच ! तो कां आला, कशाकरितां आला, याचें तिला काय होय ? ती त्याच्याशीं खेळायची; आपल्या बरोबर खेळायला त्याला भाग पाडायची ! तोही पण तिला कधीं नाराज करीत नसे.



त्या दिवशीं प्रसादच्या प्राध्यापक मित्राचें एकदाचें पत्र आलें. पण तें मुंबईहून न येतां मद्रासहून ! तो, प्रसाद आपल्या घरीं आल्यानंतर अचानक आणि एकदमच प्राध्यापकाची नोकरी सोडून, जाहिरात तज्ञ म्हणून एका नव्या मोठया फील्म कंपनीला जाऊन मिळाला होता ! मुंबईहून त्याचें पत्र मद्रासला जाऊन मिळून, त्याचें उत्तर यायला मध्यंतरीचा बराच काळ स्वाभाविकच गेला ! पत्र आलें खरें; पण त्यांत प्रसादच्या मनासारखें काय होतें ? शहाणीच्या आणि त्याच्या भावी मंगलविवाह विधीबद्दल अगाऊ अभीष्ट चिंतन ! आणि वधु-वरांचें आयुष्य सुखाचे जावो असा कोरडा आशीर्वाद ! शहाणीला लिहिलेलें पत्रही मद्रासलाच पडलें ! प्रसादच्या मनाची अवस्था काय झाली आणि काय नाहीं, सांगण्याची सोय नाहीं. त्याला वाटलें, चटकन् उठावें, पटकन् मिळेल ती गाडी गांठावी आणि प्रत्यक्ष स्वतःच शहाणीला जाऊन भेटावें.

प्रसाद पलंगावर पडला होता. 'प्रफुल्ल' कचेरींतून आणलेल्या वर्तमान-

पत्रांचा मोठा ढीग बाजूच्या तिपाईवर :पडला होता ! आंगावर स्वच्छ पातळसें उपरणें चांगले गळ्यापर्यंत त्यानें घेतलें होतें. डोकीवरच्या खुंटीवर त्याचा स्कार्फ लोंबकळत होता. वाऱ्यानें:हलतां हलतां, तो नेमका प्रसादच्या डोक्यावर पडला.

शेजारींच चारुशीला, मंदाकिनीकरितां नव्या फॅशनचा नवा झंपर शिवण्यांत गढली होती. मंदाकिनी आईच्या कामाकडे पहात जवळच टिवल्या बावल्या करीत खेळत होती. तिचें सहज लक्ष आपल्या प्रसाददादाकडे गेलें. स्कार्फ त्याच्या डोक्यावर पडल्याचें पाहून तिला हंसू आलें. मोठ्यांदा हंसली. चारुशीलेनें तें पहावें व तिनेंही आपल्या प्रमाणें हंसावें म्हणून आईचें लक्ष मंदाकिनीनें प्रसाददादाकडे वेधविलें. लहान मुलांची कल्पनाशक्ति आणि आठवण मोठी तीव्र असते. प्रसादकडे पाहून, तो दवाखान्यांत कॉटवर असतांना जसा तिला दिसला-तसाच या वेळीं तो तिला भासला.

" आई, प्रसाददादा दवाखान्यांत असल्यासारखा दिसतोय नाहीं ? " मंदाकिनी चारुशीलेला हंसून म्हणाली. तें चारुशीलेने ऐकलें. प्रसादनेंही ऐकलें.

वर न पाहतांच चारुशीलेनें नुसतें " हं " म्हटलें.

प्रसाद तशाही मनःस्थितींत बहिणीची तरळ कल्पना ऐकून गालांतल्या गालांत हंसला.

तेवढयांत दवाखान्यांतल्या आपल्या दादाजवळ बसलेली एक कोणी मोठी मुलगी होती—शहाणी सावर्डेकर—तिची मंदाकिनीला आठवण झाली आणि तिनें आपल्या आईला विचारलें,

" पण आई, दादाची ती कुठें आहे ग त्याच्या जवळ ? "

'ती'चा उच्चार कानीं पडतांच प्रसादला गोडशा संवेदना झाल्या. चारुशीलेच्या चर्येवर बारीकशी तिरस्काराची छटा उमटली. आई मंदाकिनीच्या प्रश्नाला काय उत्तर देते हें ऐकण्यासाठीं प्रसादनें आईकडे पाहिलें. चारुशीलेची दृष्टि सहज वर झाली. मायलेकरांची दृष्टादृष्ट झाली. प्रसादला आपल्या खऱ्या भावनांची कल्पना येऊं नये या बुद्धीनें चारुशीलेनें बळेंच आऽऽ करून एक दीर्घ जांभई दिली. हातानें चुटक्या वाजविल्या :

आईनें मंदाकिनीच्या प्रश्नाला कांहींच उत्तर दिलें नाहीं, हें पाहून प्रसादला

मुंबईहून आल्यापासून बाह्यात्कारी सर्व कांहीं सुरळीत, चाललें आहे. पण आपण शहाणीचें नांव काढीत नाहीं आणि इतर कोणीहि तिचा चुकून उच्चार करीत नाहीं. असें त्याला कळून चुकलें !

मोठीं माणसें अनुभवानें शहाणीं झालेलीं; काय बोलावें, कसें बोलावें याची जाणीव त्यांना चांगली. मोठ्या शिताफीनें तीं वागतात–वागवितात. पण लहान मुलांचें तसें थोडेंच असतें ? मनांत आलें कीं, पट्‌दिशीं केव्हांही कुठेंही, कोणापुढेंहि तीं आपलें मनोगत बोलून टाकतात. मंदाकिनीनें या वेळीं तसेंच केलें ! शहाणीच्या विषयाला स्पर्श करून प्रसादला चाळविलें. त्याची उत्कंठा वाढविली. अप्रिय विषयाला सगळ्यांनीं टाळलें होतें, तोच विषय पोरबुद्धीनें सहजासहजीं उच्चारून चारुशीलेला खोड्यांत घालण्याची मंदानें पाळी आणली !

आवडतीं मुलें मोठ्या मंडळींना केव्हां केव्हां, द्वाड अशीं वाटूं लागतात, तीं अशाच वेळीं !

जांभई देणारी आपल्या आईची मुद्रा शहाणीच्या स्मरणानें प्रसन्न तर झाली नाहींच; उलट तिला बरें वाटलें नाहीं, हें प्रसादच्या दृष्टींतून सुटलें नाहीं. असें कां ? प्रसादच्यापुढें प्रचंड प्रश्नचिन्ह उमटलें ! त्यावेळींच आई-जवळ आपण शहाणीची गोष्ट काढून लग्नाबद्दल उहापोह–करावा असें त्याला वाटलें. तो उठून बसला, पण काय झालें कोण जाणें ! त्याला तो विषय बोलतां येईना !

आईनें आपल्या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं, याचें मंदाकिनीला कांहींच वाटलें नाहीं.

ती हलके हलके आपल्या दादाकडे सरकूं लागली. आपल्या देखत पोरगी प्रसादला तेंच तेंच विचारणार कीं काय, असें चारुशीलेला वाटले असावें. तिनें शिवण्या–टिपण्याचें बारदान गुंडाळलें आणि ती तेथून झट्‌दिशी उठलीच !

मानवी मनाची काय ठेवण असेल ती असो. मुलें मोठीं झालीं म्हणजे लहानपणीं त्यांना दबावणारी मोठीं माणसें, मुलांना भिऊं लागतात. बोलायला त्यांच्यापुढं त्यांना धरिच होत नाहीं. आपलें तीं ऐकणार नाहींत, आपला त्यांच्याकडून अपमान होईल असेंच त्यांना वाटत असतें. स्वतःचा बोज संभाळण्याकडे त्यांचा कल असतो.

पंडीत चारुशीलाही या नियमाला अपवाद नव्हती, असेंच म्हटलें पाहिजे. प्रसाद शहाणीच्या विवाहाला प्रथम मुग्ध राहून मग ऐनवेळीं संमति दर्शवून कसाबसा प्रसंग सावरावा या हेतुनें पंडितांनीं, शहाणीच्या घरीं जाऊन, तिच्या वडिलाशीं त्या बाबतींत कांहीं वाटाघाटी करण्याचा ऋजूमनानें व प्राप्त परिस्थिती ओळखून, प्रयत्न केला होता. पण त्यांत त्यांना यश आले नव्हते. शहाणीच्या दारूबाज बापानें त्यांना भलत्याच भरमसाट गोष्टी सुनविल्या. चार पांच हजार रुपये आपणापुढें आणून मांडा, मग मी पुढें काय तें बोलेन. अशी त्याची विचित्रच मागणी होती. पंडितांचे बोलणेंसुद्धां सुध्या मनाने तो ऐकायला तयार नव्हता. मुलगी कोणत्या प्रसंगांत आहे हें ओळखूनही, त्याला तिची फिकीर वाटली नाहीं. पंडिताकडून मुबलक पैसा उकळण्याकडेच त्याचें सारें लक्ष होते. त्यामुळें पंडित मुकाट्यानें परत फिरले होते.

ही हकीकत एकांतीं पंडितांनीं चारुशीलेच्या आणि निशिगंधाच्या कानावर घालून प्रसादशीं पुढें वागण्याचें धोरण कसें ठेवावयाचें, याबद्दल आपापसांत त्यांनीं निश्चित कांहीं केलें होतें.

स्थळ बदललें, काळ लोटला, निराळ्याच व्यापांत मन गुंतविलें म्हणजे एकाद्या वेळीं प्रसाद आपण होऊनच बदलूं शकेल, अशी त्यांची कल्पना होती. प्रसादशीं सरळ—मनमोकळें वागावयाचें, परंतु त्याच्या लग्नाची चर्चा करीत बसावयाचें नाहीं. या धोरणानें मोठीं माणसें प्रसादशीं वागत होतीं. पण त्याचा बोध प्रसादला झाला नव्हता. तो आपल्याच विचारांत गुरफटला होता. चारुशीलेला प्रसादच्या लग्नाची किती ओढ होती. सून घरांत आणण्याकरितां ती किती उत्सुक होती. त्याच्या मुंजीच्या वेळीं तिनें केवढा अट्टाहास केला होता. पंडितांशीं आणि निशिगंधांशीं भांडभांडून त्याच्या मुंजीचा थाट आपल्या मनासारखा उडवून दिला होता. मुंजीपेक्षांही प्रसादचें लग्न आपण झोकांत करणार अशीं तिला किती किती सुखस्वप्नें पडत असत. पण आतां प्रसादच्या लग्नाचा प्रसंग आला तो तिला कसासा वाटत होता. आयुष्यांतल्या साऱ्या वेळा सारख्या कोणाच्याच मनासारख्या येत नाहींत हेंच खरें.

याच सुमाराला एकूणसे चौदा सालाप्रमाणें पश्चिमेकडे जर्मनीनें महायुद्ध पुकारिलें. सर्वांचें लक्ष त्याकडे लागलें. पंडितांचें तर वर्तमानपत्रकार म्हणून जास्तच लक्ष वेधलें. अगोदर ते राष्ट्रीय बाण्याचे. त्यांचें स्वतःचें प्रफुल्ल वर्तमान-

पत्र महायुद्धासंबंधानें दुसऱ्या कोणत्याहि वर्तमानपत्रापेक्षां आपल्या पत्रांत सर्व प्रकारची अद्यावत् माहिती देतां आली पाहिजे, असें त्यांना वाटणें अपरिहार्य होतें. आपल्या लोकांना महायुद्धांच्या परिस्थितींचें ज्ञान, त्याबद्दलचीं आपलीं कर्तव्याकर्तव्यें काय असलीं पाहिजेत, या विषयींची अद्यावत् माहिती जितकी स्पष्ट देतां येईल, तितकी देण्यांत कसूर करण्यांत अर्थ नव्हता! त्याची लेखणी खणखणींत अशी होती. त्यांच्यापुढें याविषयाबद्दल काकासाहेब खाडिलकर यांचा आदर्श होता! आपलें 'प्रफुल्ल' महायुद्धाची माहिती देणारें, प्रभावी प्रचार करणारें, वर्तमानपत्र झालें पाहिजे, असा संकल्प करून, त्यांनीं आपलीं लेखणीं सरसावलीं. महायुद्धाच्या चटकदार बातम्या निशिगंधानें जुळवाव्या, आपण अग्रलेख लिहावे. प्रसाद तूर्त रिकामा आहे, त्याला पुढें आपलेंच पत्र चालवावयाचें आहे, त्या दृष्टीनें त्यानें बराच वेळ प्रफुल्लकडे दिला पाहिजे, असें ठरवून त्यांनीं त्याला तसें सुचविलें. कमाला जुंपलेंही त्याला.

पंडित, चारुशीला, निशिगंध एकत्र जमून सर्वांनीं प्रफुल्लच्या भावी धोरणाची निश्चित आंखणी केली. त्यावेळीं प्रसाद तेथें हजर होता. महायुद्धाच्या विक्राळ वणव्याचें भावी भयानक स्वरूप कसें असण्याचा संभव आहे. याचें यथातथ्य वर्णन पंडित करीत होते. एकाग्र चित्तानें व भयाकुल हृदयानें प्रत्येकजण तें वर्णन ऐकत होता! भारतसंरक्षक कायद्याच्या तीक्ष्ण धारेची तरवार शिरावर लटकत आहे. याची जाणीव जागृत ठेवून प्रफुल्ल चालवावयाचें आहे. हें सर्वच जाणत होते.

आतांपासूनच पंडितांचा पुन्हा एक पाय तुरुंगांत आणि एक पाय घरांत आहे, ही कल्पना येवून चारुशीलेचें सर्वांग थरारलें, निशिगंध अतिशय गंभीर दिसूं लागला. प्रसादला सर्व प्रकारची जाणीव झाली! अत्युच्च डोंगराच्या शिखरावरून पाहिलें म्हणजे सपाटीच्या प्रचंड वस्तुही अति लहान दिसतात त्याप्रमाणें महायुद्धामुळें उद्भवणाऱ्या—आपल्याकडे उठणाऱ्या झंझावाताची कल्पना येऊन प्रसादचे डोळे फाटण्याची वेळ आली! महायुद्धाच्या घातकी स्वरूपापुढें शहाणीबरोबर आपल्या होणाऱ्या लग्नाची मातब्बरी त्याला क्षणकाल क्षुद्र वाटूं लागली. राष्ट्रावरच प्रचंड प्रसंग गुदरला म्हणजे केवळ्याही प्रसंगाचें कांहींच व्यक्तिगत महत्त्व वाटत नाहीं, म्हणतात तें यामुळेंच!

पंडितांच्या लेखणीचा प्रभाव दिसूं लागला. प्रफुल्लचा खप झपाट्यानें वाढूं लागला. तो इतका कीं मागणींइतका पुरवठा करणेंही त्यांना अशक्य होऊं लागलें. आनंद आणि अभिमान वाटण्यासारखीच ही गोष्ट. पण त्या गोष्टीनें चारुशीलेला आनंदाबरोबर तितकीच काळजी वाटूं लागली. सरकारी गदा केव्हां येईल याची तिला चिंता लागली ! एकच गोष्ट आनंदाला तशी दुःखाला कारणीभूत होते ती अशी ! पंडित अग्रलेख तोंडानें सांगत आणि प्रसाद तो लिहून घेत असे. त्यावेळीं आपल्या वडिलांची विशाल विद्वत्ता, तडफ, त्यांच्या भाषेचा, विचारांचा अस्खलित, अथांग ओघ इत्यादि पाहून त्याला विस्मय वाटे ! तो वेळोवेळीं थक्क होऊन जाई ! अशा वडिलांच्या उदरीं आपण जन्मलों याबद्दल त्याला धन्यता वाटे ! त्या धीरोदात्त मूर्तिकडे सादरतेनें पाहतांना तो केव्हां केव्हां स्वतःलाही विसरे !

पंडितांची योग्यता–मोटेपणा–तळमळ–कार्याचा उत्साह–आणि हृदयाची थोरवी, जाणतेपणीं त्यांचे अशा वेळीं प्रत्यक्ष सान्निध्य मिळाल्यामुळें प्रसादला कळूं लागलीं होतीं. त्यांच्यापुढें आपण कोणत्या झाडाचा पाला असेंही त्याच्या मनांत येऊन जात असे ! पण पंडितांच्या खऱ्या थोर–गंभीर–अविचल–हृदयाचें दर्शन प्रसादला अजून पुरतें व्हावयाचें होतें: तसा प्रसंगच अजून आला नव्हता, त्याला कळूं लागल्यापासून !

एक दिवस तोही त्याला पाहावयाचा प्रसंग आला. धरणीकंपाच्या धक्क्यानें जमीन दुभंगते. गगनचुंबी वृक्ष व इमारती क्षणांत गडप होतात. ज्ञानाचा आणि अकलेचा साभिमान गर्व बाळगणाऱ्या केवढ्याही मोठ्या माणसांची मति कुंठीत होते. हृदयाच्या ठिकऱ्या उडतात ! धरणीकंप प्रत्यक्ष न होतां, त्याच्या तोडीचे धक्के आयुष्यांत मानवी प्राण्याला दुसरेही कांहीं कमी घ्यावे लागत नाहींत. त्या धक्क्यानें यत्किंचितही चलित न होतां कर्तव्यांत मग्न राहण्याचें ज्यांचे सामर्थ्य दिसून येतें, त्याची योग्यता काय थोडथोडकी असेल ?

असाच भयंकर धक्का पंडितांच्या हृदयावर बसला असता त्यावेळीं ते प्रसादला कसे दिसले ?

---

## प्रकरण तिसरें

तो प्रसंग तसा खरोखर धक्का बसेल असाच होता ! महायुद्धाच्या विषया-वरील लेख येरझारा घालीत पंडित तोंडानें सांगत होते. प्रसाद तो झरझर लिहून घेत होता. वाक्याच्या शेवटचा शब्द आला कीं त्यानें 'हं' म्हणावें, त्याचा इषारा आणि पंडितांच्या पुढील वाक्याच्या आरंभीच्या चारसहा शब्दांचा उच्चार एकदम होत होता. तेवढ्यांत निशिगंध हळूंच आंत आला. त्यांच्या हातांत कसलेसें पाकिट होतें. त्याचा चेहरा उतरला होता. पंडितांचें लक्ष त्याच्याकडे गेलें. मजकूर सांगण्याचें थांबवून त्यांनीं प्रश्नार्थक मुद्रेनें निशिगंधाकडे पाहिलें. तसेंच महत्त्वाचें कांहीं असल्याशिवाय निशिगंध आपल्या कामांत व्यत्यय आणायला यायचा नाहीं, हें पंडितांना माहित होते म्हणूनच लेख सांगतांना त्या वेळीं स्वतःशीं इतके रंगून गेले असतांही मध्येंच अर्धें वाक्य सोडून ते थांबले.

जड हातानें निशिगंधानें त्यांच्यापुढें पत्र केलें. त्यांनीं तें घेतलें. वाचलें. घडी करून पाकिटांत घालून परत दिलें. पंडित पत्र वाचीत असतां निशिगंध आणि प्रसाद त्यांच्याकडे पहात होते. पत्र वाचून पंडितांच्या मनावर कसलाही फरक झाला नाहीं. निशिगंधाला आश्चर्य वाटलें. पत्रांतल्या मजकुराची प्रसादला कांहींच कल्पना नसल्यानें त्याला कांहींच वाटलें नाहीं. "बरं" असें पंडित किंचित् मोठ्यानें पुटपुटले. निशिगंधाला जायला सांगून त्यांच्या येरझारा व शब्दांच्या फेकीं सुरू झाल्या.

प्रसादनें आपली झरणी सरसावली. वाक्य कोठपर्यंत आलें होते, हें प्रसाद वाचून दाखविणार होता, पण त्याच्या अगोदरच पंडितांनीं सांगायला सुर-

वातच केली. शब्दापुढचा शब्द बिनचूक होता. आधींच्या आवाजांत आणि लेख पुरा होईपर्यंत सांगतांनाच्या पंडितांच्या आवाजांत कसलाच फरक नव्हता. आवेशांत, लेखाच्या जडणी--घडणींत अणुमात्र कमीजास्त नव्हतें! लेखाचा विषयच तसा महत्त्वाचा होता. "देशाकरितां महायुद्धाच्या मदतीसाठीं प्रत्येकानें तन-मन-धन देऊन, सरकारला सहाय्य करायला पुढें आलें पाहिजे." या सरकारच्या आज्ञातुल्य जाहिरपत्रकाला, बिनतोड, कायदेशीर साधार आणि सप्रमाण उत्तर देण्यासाठीं, "आमचा देश कुठें आहे?" हें शीर्षक देऊनच पंडित तो लेख लिहावयाला सरसावले होते!—प्रश्नार्थक वाक्यानें अग्रलेखाचा शेवट झाला. प्रसादनें सर्व कागद जुळविले. त्यावेळीं एकदोनदां प्रसादनें पंडिताकडे ओझरते पाहिलें. आपल्या मनासारखा लेख उतरला म्हणजे पंडित मोठे प्रसन्न होत. त्या प्रसन्नतेचा भाव त्यांच्या मुद्रेवर उमटे. तो अनुभव प्रसादनें यापूर्वी अनेक वेळां घेतला होता. आजचा लेख खरोखरच तसाच अप्रतिम ठरला होता. पण प्रसादला पंडिताच्या मुद्रेवर प्रसन्नता झळकलेली दिसली नाहीं. ते सागरासारखे धीरगंभीर दिसले. त्याची कारणमीमांसा मात्र प्रसादला त्या वेळेस तरी करतां येणें अशक्य झालें.

कोणाचें, कसलें पत्र लाडकाकांनीं आपल्या वडिलांना दिलें होतें? तें रोजच्याप्रमाणें प्रसन्न कां दिसले नाहींत? याबद्दल चौकशी करावी असें प्रसादला वाटलें. वडिलांचा अग्रलेख लाडकाकांकडे देण्याच्या वेळींच विचारावें, असें त्यानें ठरविलें होतें. कांहीं ताजीं वर्तमानपत्रें चाळण्यांत त्याचा कांहीं वेळ गेला. कचेरींतून बाहेर पडतां पडतां सहज त्यानें लाडकाकांच्या बैठकीच्या जागेंत डोकावलें, तों टेबलाच्या एका बाजूला पंडित उभे आहेत, खुर्ची मागें सारून. दुसऱ्या बाजूला लाडकाका पण उभे आहेत, दोघांचें कांहीं बोलणें चालू आहे, असें त्यानें पाहिलें. तो क्षणमात्र थबकला. नंतर पटकन् आंत जाऊन अग्रलेख लाडकाकांच्या टेबलावर ठेवून न बोलतांच तेथून तो निसटला. तेवढ्यांत त्याच्या कानीं जेवढे शद्व पडले, त्यावरून त्याला नीटसा अर्थबोध झाला नाहीं. त्या पत्रानें पंडितांचे वयोवृद्ध वडिल तात्यासाहेब यांच्या आकस्मिक निधनाची दुष्ट वार्ता आणली होती. हें, प्रसाद ज्यावेळीं कचेरींतून घरीं गेला त्यावेळीं त्याला समजलें. तात्यासाहेबांच्या सकवारबाईकडून तें दुःखदायक वार्तेचें पत्र घेऊन एक माणूस आला होता. मंदाकिनी आपल्या

आईला लगटून बसली आहे. भिंतीला टेकून एक वृद्ध कुणबी आपल्या आईच्या समोर बसला आहे. तो तात्यासाहेबांच्या आकस्मिक घडलेल्या मृत्यूची हकिकत चारुशीलेला सांगत आहे, असें हें दृश्यच समक्ष प्रसादनें पाहिलें.

चारुशीला मुकाट्यानें ऐकत होती. मंदाकिनीला ती कथा म्हणजे एकाद्या भयप्रद गोष्टीसारखीच वाटत होती. सासऱ्याच्या हाताखालीं चारुशीला कधीं नांदली नव्हती. प्रसादच्या मुंजीच्या वेळीं आठपंधरा दिवस तेच तिच्याकडे जे काय राहिले असतील तेवढेच. त्यावेळींही त्यांच्याविषयीं आदर वाटावा, आपुलकी निर्माण व्हावी, असेंही ते वागले नव्हते. तरीसुद्धां त्यांच्या मृत्यूच्या बातमीनें चारुशीलेला वाईट वाटलें. कसे असले तरी आपल्या पतीचे ते वडिल होते. नात्याचा संबंध होता आणि मृत्यू ही गोष्टच अशी आहे कीं, ती ऐकतांक्षणीं एकदम कोणाबद्दल हळहळ वाटल्यावांचून राहात नाहीं. मग सहवास असो वा नसो ! तात्यासाहेबांना मृत्यू आला, तोही अशा भयंकर रीतीनें कीं, त्याचें वर्णन ऐकतांना कोणाही सहृदय जीवाच्या काळजाचें पाणी पाणी व्हावें.

आलेला म्हातारा कुणबी तात्यासाहेबांच्या शेतींत राबणारा असून त्याची अवघी उमर त्यांच्याच जवळ गेलेली होती. त्याला तात्यासाहेबांचे गुणावगुण इत्थंभूत माहित होते. त्यांच्यावर त्यांचा विलक्षण लोभ होता. त्यांच्या अन्नावरच त्याचा पिंड पोसला होता; त्यामुळें तात्यासाहेबांच्या मृत्युमुळें कोणालाही वाईट वाटणार नाहीं, इतकें त्याला वाईट वाटत होतें. चारुशीलेला हकीकत सांगत असतांना त्याच्यां डोळ्यांतून कितीदा तरी पाणी घरंगळलें. तात्यासाहेबांच्या गुणांचा उच्चार करतांना, त्या म्हाताऱ्याच्या तोंडून " आमचं तात्या लै बाजिंद ! म्हातारा रंगेल बी तसाच अन् रंगेल बी तसाच ! " असे शब्द निघत. निःशंकपणानें चारुशीलेला ते ऐकविण्यांत तो अभिमान दाखवीत होता ! " आमच्या तात्यांनीं आवा ठ्येवली. पर सकवार बी लै चांगली निवटली. तिनं तात्यांच्या मायंदळ्या खस्ता खाल्या. कवा कवा तात्या कावल म्हंजी सकवारला बदाड बदाड बदडायचं ! पर बाई भारी श्यानी ! हुं का चूं करायची नाहीं ! तिनं ग्वाड बोलावं. तात्यास्नी जीवा आगळं जपावं ! आईचान् सांगतों, एकांदी लग्नाची बाईल दिकून सकवारसारखी वागायची नाहीं ! म्हणून तात्यांचं इक्त्या वर्स निभलं. सुखांत त्येंचा काळ गेला ! "

बोलूनचालून अडाणी कुणबी म्हातारा ! कोणत्या वेळीं आणि कोणाजवळ काय बोलावं याचा तरतमभाव त्यांला कुठला ? तात्यासाहेबांच्या मृत्यूची कथा सांगतांना तो जितका गहिवरे तितकाच त्यांचे गुण वर्णन करतांना त्याला आवेश येई ! हें चाललें असतांनाच प्रसाद तेथें आला. त्यानें आपल्या आजो-बांचें गुणवर्णन ऐकलें. प्रसादला पाहून त्यानें धोरणानें " ह्ये तात्यांचं नातु जनुं ! " असें ओळखून. लगेच त्याच्याकडे वळून घोगऱ्या आवाजांत " छोटेसाहेब, लइ वंगाळ झालं ! आपलं आजोबा गुमावलं. आन् ही वंगाळ वार्ता घेऊनशानी येण्याचा दुष्ट वकुत माझ्यावर आला बघा ! " आणि खरोखरच तो म्हातारा ओक्साबोक्सी रडायला लागला ! तात्यासाहेब काल-वश झाल्याची बातमी प्रसादला कळली ! त्याच वेळीं अगदीं गूढ संवेदना व्हाव्या त्याप्रमाणें होऊन त्या मृत्यूची चिठ्ठी या म्हाताऱ्यानें आणलेली आपल्या वडिलांच्या हातीं कचेरींत मिळाली असावी, असें प्रसादच्या मनांत आलें ! त्याच्या मनांत यायला आणि त्याचवेळीं चारुशीलेनें त्याला उद्देशून " तिकडे पत्र मिळालं का रे ? " असें उदास शब्दांनीं विचारावयाला एकच गांठ पडली ! त्यानें मानेनेंच होय म्हटलें.

" तात्यांनीं पोटच्या पोराचं जलमभर नांव टाकलं. कंदी हाटकलं नाहीं. खरी गोष्ट है. आम्हीं त्येच्याबद्दल त्येंना वारूवार लै फैलावर घेत होतों. सकवार बी त्येंना सदान्कदा टोंचायची ! आमच्यावरच त्ये तावदारायचं— तुम्हास्नी कशापायी ह्या उठाठेवी व्हाव्यात म्हणून ! पर मरतावक्ती त्येस्नी लै वंगाळ वाटलं. पंडितरायांचा आन् ह्या नातवाचा भेटायापायीं त्यांनीं मायंदाळा धोस घेतला ! त्यांना आणा, मला भेटवा ! या परीस वायला सबूद नव्हता ! नातवाकडे भारी वढा तात्यांचा ! लै जीव ह्येच्यावर ! पर का करा-यचं ? नशिबापुढं कुणाचं चालतया का ? परमीसराची विच्छाच नव्हती ! बापलेकाची—नातवाची गांठ पडतीया कशी मग ?........."

हें सांगत असतां पंडित आणि निशिगंध तेथें दाखल झाले. पंडितांना पाहतांच म्हातारा अदबीनें चटकन् उभा राहिला. दोघांनीं एकमेकांना ओळखलें.

" काय राया ! " पंडितांनीं जिव्हाळ्याच्या शब्दांनीं म्हाताऱ्याला

पाचारलें. त्याबरोबर म्हाताऱ्याच्या डोळ्यांत पुन्हां गंगायमुना उभ्या राहिल्या. त्यानें " लै वंगाळ काम परमीसरानं माझ्या वाट्याला आणलं ह्ये साहेब ! " असें रडत रडत म्हटलें.

ना जातीचा ना गोताचा म्हातारा ! अडाणी जीव ! पण किती मायाळू त्याचें हें हृदय ! पंडितांना क्षणमात्र त्याच्याकडे पाहून कसेसेंच झाल्याशिवाय कसें राहील ? पण त्यांनीं बाह्यात्कारी गांभीर्य स्वीकारलें होतें ! निशिगंधाना मात्र त्याचा मोठा अचंबा वाटला ! त्या म्हाताऱ्या रायाबद्दल निशिगंधांना केवढा आदर वाटला !

" किती दिवस तात्यासाहेब आजारी होते ? काय झालं होतं त्यांना ? " निशिगंधांनीं रायाला विचारलें. पंडित त्याच्याकडे नुसते पाहात होते. त्यांच्या पाहाण्याचा भाव निशिगंधांनीं व्यक्त केला होता.

चारुशीलेला अगोदर जें सांगितलें होतें, तेंच ह्या दोघांनाही खाकरून खोकरून, डोळे पुसून रायानें सांगायला सुरुवात केली: —

" तात्या आजारी नव्हतं. धरणीवर बी पडलं नव्हतं ! पर वकुतच वंगाळ आला ! शेतामंदि योक मारकट बैल हाय ! त्यो बिथरला व्हता ! दावं तोडुनशान शिवारांत उधळत व्हता ! त्येला धरून बांधून आणायापायीं तात्या म्होरं झालं ! आम्हीं नगु नगु म्हनुतया. पर तात्यांनीं ऐकलं नाहीं. त्येला कां हुतया ! मी त्येचा धनी हाय ! त्येला खायला घातलुया ! त्यो मला का करतुया ! म्होरं गेल्यावर अल्लाची गाय व्हईल ! " असं म्हणत म्हणत तात्या गेलं न् काय धरायला !— "

" आणि मग ?— बैलानं त्याला ढोसल का काय ? " निशिगंधानें घाबऱ्या घाबऱ्या विचारलं.

" हुंडारलेलं मारकं जनावर त्यें ! त्येनं तात्यांच्या पोटांत शिंगं खुपसून त्येंचा कोथळाच बाहीर काढला ! दहा हात दिलं भिरकावून " रायानें सांगितलें. आणि कपाळाला हात लावला !

सर्वांच्याच अंगावर शहारे आले ऐकून ! चारुशीलेच्या डोळ्यांत टचकन् पाणी आलें. आई रडते हें पाहून मंदाकिनीला रडूं आलें. ती जास्तच आईला बिलगली !

" अरेरे ! " निशिगंध उद्गारला !

" हं ! " पंडितांनीं दीर्घ श्वास सोडला !

प्रसादला काय वाटलें असेल नी काय नाहीं हें सांगतां येणेंच कठीण ! आजोबाबद्दल त्याला आदर होता. तो आई वडिल आणि लाडकाका यांच्याकडे नुसता पाहात राहिला. पोटांत कालवल्यासारखें झालें त्याला !

रायाच्या आग्रहावरूनच नव्हे तर पवित्र कर्तव्य म्हणूनच वडिलांच्या क्रियाकर्मांतराकरितां आपल्या गांवीं पंडितांना जाणें भागच होतें. त्याप्रमाणें रायाची रवानगी करून, नंतर योग्य वेळीं पंडित तिकडे गेले ! निशिगंधांना आपल्या आईला व मामांना भेटायला जावयाचें होतें. त्यांचीं पत्रावर पत्रें येत होतीं. पंडित त्यांना एकदोन दिवसांत पाठवायला तयारही झाले होते. तों मध्येंच हें निराळेंच उपस्थित झालें. निशिगंधाना आपलें जाणें लांबणीवर टाकावें लागलें. पंडितांना जावें लागलें.

प्रसाद निशिगंधांच्या हाताखालीं कामकाज पाहूं लागला.

निशिगंधाबरोबर प्रसाद नेहमीं मोकळेपणानें वागत असे. दोघांचें हित-गुजहि चाले. पंडित नसतांना कचेरींत दोघे काम करूं लागल्यानंतर कामा-व्यतिरिक्त अवांतर बोलायला त्यांना खूप मिळे. पंडित असतांना प्रसादला थोडासा संकोच वाटे. पण आतां तेंही कांहीं नव्हतें. बोलण्याचे विषय हजार असले तरी निशिगंधाचा आवडता आणि मुख्य विषय म्हणजे पंडित. त्यांचें विद्वत्त, कर्तृत्व, धडाडी, संयम, समतोलपणा, दूरदृष्टि; यापैकीं प्रत्येकावर बोलायला सुरुवात झाली म्हणजे निशिगंधांना काय बोलूं आणि किती बोलूं असं होऊन जाई ! आणि त्याचबरोबर दर वेळीं त्यांच्यापेक्षां आपण किती खालच्या पायरीवर आहोंत, हेंही सांगून टाकण्यांत त्यांना मुळींच कमीपणा वाटत नसे. निशिगंध बोलण्यांत आणि प्रसाद ऐकण्यांत सारखेच रंगून जात !

एक दिवस कसल्याशा क्षुल्लक कारणानें निशिगंधांचें मन बिथरलें होतें. त्यांना अग्रलेख लिहावयाचा होता तो कांहीं केल्या जमेना. सांगतांही येईना. आणि स्वतः लिहितांही येईना. त्यांच्या तारंबळीकडे प्रसाद पाहात होता.

" असं काय झालंय तुम्हाला काका ? लिहायचं जमत का नाहीं ? " प्रसादनें त्यांना सहज विचारलें.

" वाटेल त्या स्थितींत शांतपणानें लिहावयास मी काय लोकमान्य टिळक लागून गेलों आहे, का तुझ्या वडिलांची करामत माझ्यांत आहे ? " निशिगंध डोकें खाजवीत म्हणाले.

" म्हणजे ? " प्रसादनें खुलासा विचारला.

" वडिल मुलगा प्लेगानें बळी घेतला, त्यावेळीं लोकमान्य टिळक हिमालयी शांती धारण करून 'केसरी'चा अग्रलेख लिहित बसले होते. आणि परवा पंडित, आपल्या वडिलांचा मृत्यू झाल्याचें पत्र वाचून पाहूनही तितक्याच तन्मयतेनें 'प्रफुल्ल'चा सुंदर अग्रलेख पुरा करूं शकले ! तसें का माझें आहे ? या महान विभूतीपुढें आम्ही कोणत्या झाडाचा पाला !" निशिगंधांनीं वर्णन केलें !

त्या दिवसाचा मूर्तिमंत चित्रपट प्रसादच्या मनःचक्षूपुढें उभा राहिला. त्याच्या मनावर त्याचा खोला ठसा उमटला.

प्रसादला बरें वाटलें. त्यानें हंसून म्हटलें, " पण काका, तुम्ही तरी काय कमी कर्तृत्ववान आहांत ? मी आपल्यालाही जाणतों. "

" बच्चा आहेस प्रसाद तूं ! अरे बाबा ! ज्याचें त्याला आणि गाढव ओझ्याला ! तशी आमची गत ! आम्हीं नुसतीं ओझ्याचीं गाढवं ! " निशिगंध म्हणाला.

दोघांनाही हसूं आल्याशिवाय राहिलें नाहीं.

पुन्हा एकदां बोलण्यावरून बोलणें निघून प्रसादच्या आजोबाचा—तात्यासाहेबांचा विषय निघाला. ते कसे होते, कसे वागले, त्यांनीं काय केलें, काय करायला नको होतें. पंडितांना त्यांनीं कसें वागविलें. पंडित त्यांच्याशीं कसे वागले. या सर्व प्रकारांची उजळणी झालीच. बोलण्याच्या भरांत तात्यासाहेबांच्या सकवारबाईचा उद्धार झालाच !

निशिगंधानीं जरा तिरस्कारयुक्त सकवारचा उल्लेख केला, पण प्रसादला त्यांच्या उलट बाजू घ्यावीशी वाटली !

त्यानें विचारलें, " जुने कट्टर सनातनी आमचे आजोबा असतांना अनैतिक फंदांत कसे पडले असतील हो ? "

प्रसादचा प्रश्न छद्मी होता. त्याचा हेतु निशिगंधांनीं लगेच ताडला. आणि न हंसतां म्हटलें, " अरे जुने काय आणि नवे काय ? सामान्य

वृत्तीचीं माणसें सर्व काळींच जास्त असतात ! पंडितांसारखीं हजारांत एकादी उच्च कोटींतील आदर्शादाखल व्यक्ति आढळणें निराळे ! बाकी जुन्या काळचे तात्या काय त्यानंतरचे आम्ही काय आणि आजच्या काळचा तूं काय ? सारे एकाच माळेचे मणी ! कोणी कोणाला हंसायला नको कीं विचारायला नको ? "

तें ऐकून प्रसाद एकदम चमकलाच ! निशिगंधाच्या डोळयाला डोळा भिडविण्याची ताकद त्याक्षणीं त्याला झाली नाहीं. खर्रकन् त्याचे तोंड उतरलें. त्याला शहाणीची आठवण होऊन कसेंसेंच झालें. बोलून गेल्यावरा निशिगंधांनाही आपण भलतेंच बोलून गेलों हे लक्षांत येऊन त्यांनीं आपली जीभ चावली. पण मग त्याचा कांहींच उपयोग नव्हता !

त्यांनीं आपला विषय सावरण्याकरितां म्हटलें, " प्रसाद, पंडितांचा तूं सुपुत्र आहेस. आमच्यासारखा तूं सामान्य नाहींस. असामान्य पुरुषांची प्रजा पुष्कळदां सामान्य निपजते ! पण ध्रुवताऱ्यावर नजर ठेऊन वागण्याचा निर्धार करणाराला सामान्यांतूनही असामान्य होतां येते. मग असामान्यांच्या पावलावर पाऊल ठेऊन चालणारास तसें बनणें मुळींच अशक्य नाहीं. तूं असामान्य होशील. तसा झालेला तुला आम्ही सर्वांनीं पहावं, अशीच सर्वांची इच्छा ! म्हणूनच तुझ्याजवळ बोलण्यासारखं नसतांना मी बोललों ! " इतकें बोलून निशिगंधांनीं समोरच्या कामांत लक्ष घातलें. प्रसाद कांहींच बोलला नाहीं. आपल्या बोलण्यानें, प्रसादचें मन चाळवलें, हें निशिगंधाच्या लक्षांत आलें नाहीं. पण प्रसादला शहाणीच्या आठवणीनें पछाडलें हें मात्र निश्चित !

योग्य वेळीं, कैलासवासी तात्यासाहेबांचें क्रियाकर्मांतर यथासांग उरकून शेतवाडीची, घराची योग्य ती व्यवस्था लावून पंडीत परत आले. त्यांनीं निशिगंधांना आपल्या आई, मामांना भेटायला जायला मोकळे केलें ! प्रसाद पंडितांच्या हाताखालीं फिरून पूर्ववत् काम करूं लागला. त्यांना उसंत नाहीं. त्यालाही इतर विचार घोळवायला फुरसद मिळेना. तरीही शहाणीची आठवण मधून मधून त्याला डिवचून संत्रस्त करीत असे. चारुशीला समजूं लागली कीं, प्रसाद शहाणीला विसरत चालला. हें समजून तिला बरें वाटूं लागले. मग ती आपण होऊन कशाला पूर्वीच्या दुःखाची खपली उचकटील ? पंडितांना आपल्या अंगीकृत कार्यात दुसरा इतर कसलाच विचार येत नव्हता.

प्रसादला कामाला बरोबर घेऊन ते काम करीत. आज उद्यां प्रसाद आपल्या आंगावर जबाबदारी घेण्यास समर्थ होणार, असें मनांत येऊन समाधानाचा श्वास टाकण्यांतच त्यांना बरें वाटत होतें. प्रसादच्या लग्नाची 'बात' च अजीबात घरांत निघण्याचें बंद पडलें होतें. तो विषय उकरून काढून रण-धुमाळी माजविण्याचें प्रसादचे धैर्य हळूं हळूं नष्ट होऊं लागलें. त्याच्या मनाची कुचंबणा होत होती. लाडकाकांच्या करवीं आपला प्रश्न धसास लावावा, असें जोरानें प्रसादच्या मनांत वरचेवर येई. पण ते नेमके याच वेळीं परगांवीं गेलेले. आणि त्यांनीं एकदां आपल्यापुढें भलतीच जबाबदारी ठेवून अडच-णींत घातलेलें! त्यामुळें त्याला तिकडूनही पंचाईतच वाटे. शिवाय शहाणीचे पत्र नाहीं. तिला पत्र पाठवितां येत नाहीं. अशानें एकसारखा तो घायकुतीला येत होता. पण त्याचें मन त्याही स्थितींत इच्छित प्राप्तीकरितां मार्ग शोधीत होतें. शेवटीं, काय वाटेल तें करून लाडकाकांच्या पाठीशीं पडून मनासारखें करावयाचें असें त्यानें पक्के केलें.

•　　•　　•
•　　•　　•

पंडित परत आल्यानंतर, शेतकीची, घरादाराची, आणि सकवारबाईची व्यवस्था कशी काय लावली, त्यांना त्या बाईनें कसें वागविलें, इत्यादि हकी-कत समजून घेण्याची चारुशीलेला इच्छा होती. ती पंडितांनींच एक दिवस जेवणाच्या वेळीं सर्व कथा सविस्तर तिला निवेदन केली. त्यावेळीं प्रसादही तेथें होता.

"आमच्या तात्यांनीं अखेर जिंकली. खरोखरच ते थोर होते. ऐन तारुण्यांत मला त्यांची खरी कल्पना आली नाहीं!" सांगता सांगता पंडित किंचित् थांबले. चारुशीलेनें सहेतुक त्यांच्याकडे पाहिलें.

ते पुढें म्हणाले, "तात्या गेले. जन्माला आलेल्या प्राण्याला केव्हां तरी जायचं असतंच! त्याबद्दल वाईट वाटून घेण्यांत हंशील नाहीं. उलट जातांना आपल्या थोरपणाचा ठसा जो ठेऊन जातो; त्यामुळें जाणाराचं मंगल होतं. तात्या त्या कोटींतले होते. आणि त्यांच्या सकवारबाईबद्दलही मला कसलीच कांहीं कल्पना नव्हती! तीही बाई फार उच्च कोटींतली आहे. तिच्याबद्दल सगळ्यांनीं सांगितलें. नी ती जें बोलली त्यावरूनही मला दिसून

आलें. माउली आहे बिचारी ! जन्मभर जीवापलिकडे तिनें तात्यांची जपणूक केली. त्यांनीं ओळखून तिच्या पोटापाण्याची व्यवस्था आपल्या हातांनीं करून ठेविली आहे. मी निघतांना मला ती म्हणाली, " आहे हें सारें तुमचेंच आहे. मला काय करायचं आहे ? लाखाचा त्यांचा प्राण गेला. मी रांडरूं जगलें त्यांच्या मागें ! जीव आहे तंवर खाईन. माझ्या मागं, आहे तें तुमचंच आहे ! त्यांच्या पोटच्या गोळ्यांना सोडून मी दुसऱ्याला कशी देईन ?" आणि मरायच्या घटकेला तात्यांनीं माझ्याबद्दल त्या माउलीजवळ जे उद्गार काढले, ते तर पृथ्वीमोलाचे आहेत. ते त्यांचे उद्गार ऐकल्यावर आपण त्यांच्यापुढें किती क्षुद्र आहोंत, असं वाटल्यावांचून राहात नाहीं. "

चारुशीला तें ऐकून चमकलीच. आणि प्रसाद ? तो आजोबा–सकवारबाई, आपण–शहाणी, या जोडप्यांची तुलना त्याच वेळीं मनाशीं करीत होता !

" तात्यांनीं माझ्याबद्दल काय उद्गार काढले असतील असं तुला वाटतें ? " पंडितांनीं चारुशीलेला प्रश्न टाकला. चारुशीला गोंधळली ! त्यांचा विशेष अनुभवच नव्हता, तर ती काय कयास करणार ? त्यांच्याकडे नुसतें प्रश्नार्थक मुद्रेनें तिनें पाहिलें.

" सकवारबाईनीं सांगितलें, तात्यांनीं प्राण जाण्याच्या पूर्वीं जवळ बोलावलें आणि तिला सांगितलें, " माझा पंडित मायभूमीची सेवा करतो आहे. ठीक आहे. त्याच्या प्रमाणें मला कधीं कांहीं करतां आलं नाहीं. पण मी आपल्या सत्तेच्या जमिनीची या आईची–सेवा मरेपर्यंत यथाशक्ति करण्यांत कसूर केली नाहीं. नी ही आई भुकजलेली असते. तिला संभाळवं लागतं. रक्त आटवावं लागतं. ज्याला या आईचं रक्षण करतां येतं, या आईची सेवा करतां येते, त्यालाच मायभूमीची सेवा करण्याचा अधिकार पोंचतो. सेवा करतां येते. पंडीत् तें करतो आहे, मी हें केलं आहे ! या आईला माझ्या रक्ताची भूक लागली. माझ्या आवडत्या बैलानें माझा कोथळा फोडून माझें रक्त तिला दिलं. मला वाईट वाटत नाहीं.

" पंडित आला म्हणजे त्याला सांग, तुलाच मायभूमीची सेवा करण्याचा अधिकार आहे. तूं थकलास, भागलास. हातपाय हालेनात, म्हणजे तूं इथं ये. तुझ्या नावडत्या– नादान बापानं आपलं रक्त देऊन ही तुझी जमीन, ही

आपली हक्काची आई संभाळली आहे! ती तुला मीठभाकरी घालील! आनंदांत, सुखांत ठेवील. काळजी करूं नकोस!......"

बोलतां बोलतां पंडित थांबले! त्यांचा कंठ भरून आला. डोळ्यांत पृथ्वीमोलाचे मोतीबिंदू चमकले! मोठ्यांच्या डोळ्यांतले अश्रू ब्रह्मांडाला गहिवर आणतात! थर्रर्र करून सोडतात! तसेंच यावेळीं झालें! तात्यासाहेब कालवश झाल्याचें ऐकून पंडितांचें चित्त चलित झालें नाहीं. पण त्यांच्या मृत्यूशय्येवरील अखेरच्या उद्गारांनीं मात्र त्यांना गहिंवर आल्यावाचून राहिला नाहीं. "आणि म्हणूनच मी म्हटलें, आमच्या तात्यांनीं अखेर जिंकली! त्यांच्यापुढें मी कःपदार्थ आहे! ते खरोखरीच थोर! मी त्यांच्यापुढें अगदीं लहान, सामान्य!" पंडित वडिलांच्या स्मृतीला अशा रीतीची वाक्पुष्पांजली वाहात असतां हातांतला घास हातांत, तोंडातला तोंडांत, वाढायला आलेली चारुशीला वाढायचे विसरून तशीच ऐकत उभी राहिलेली. अशी सर्वांचीच अवस्था पंडितांच्या बोलण्यानें त्यावेळीं पंक्तीवर झाली होती!

"सकवारबाई धाय मोकलीत होती. दोन दिवस तिनं अन्नाला स्पर्श केला नाहीं. शेतमळ्यांतले लोक लहानापासून थोरापर्यंत, आपला 'पोशिंदा' गेला म्हणून रडत होते. त्या गरीबगुरिबांनीं, अडाण्यांनीं तात्यांची खरी योग्यता काय होती हें ओळखलें होतें. त्या लोकांनीं त्यांना ओळखावें आणि मी त्यांचा मुलगा असतांना मला समजूं नये, यावरूच माझी किंमत झाली! ज्या बैलानें तात्यांना मारले, त्यानें त्यानंतर तोंडांत पाणी घेतलें नाहीं कीं काडी धरली नाहीं. मग इतरांची गोष्ट कशाला?"

पंडित तन्मयतेनें घडलेल्या हकीकतीचें मूर्तिमंत शब्दचित्र रेखाटीत होते. पण या प्रसंगाचा ठसा प्रसादच्या मनावर कसा काय ठसला असेल, हें त्याचा तोच जाणे! नंतर हलके हलके जमिनींची व्यवस्था काय करायची ठरविलें, सकवारबाईला कसले आश्वासन दिलें, या इतर बाबी चारुशीलेला पंडितांनीं सविस्तर पण सावकाश सांगून टाकल्या.

निशिगंध गांवांहून परत आले. कामावर रुजू झाले. दिवसगतीबरोबर तात्यासाहेबांविषयींच्या स्मृति कालाच्या पोटांत दडूं लागल्या. प्रसादचें मन पुन्हा शहाणीकडे ओढ घेऊं लागलें. लाडकाकांजवळ गोष्ट काढायला हरकत नाहीं असें त्याच्या मनांत येऊं लागलें. वडिल आपल्या कार्यांत मग्न आहेत.

म्हणून त्याना आठवण होणें शक्य नाहीं, हे खरें, पण आपली आई अगदींच कशी आपल्या लग्नाबद्दल विषय काढीत नाहीं, याचें त्याला गूढच वाटूं लागलें. कां त्यांनीं त्यावेळीं वेळ मारून नेली नुसती ? त्याची ही शंका बळावत चालली.

रोज सकाळीं प्रसाद दूरवर फिरायला जात असे. निशिगंधही त्याच्या संगति असे. ते गांवाहून येतांच त्या दोघांचा फिरायला जाण्याचा क्रम पूर्ववत् सुरू झालाच. फिरण्याच्या वेळीं निशिगंधांना तात्यासाहेबांकडची हकीकत ऐकलेली प्रसादनें सांगितली ! तेही आपल्या आई-मामांकडील एकेक गंमत खुलवून सांगत. दोन दिवसांनीं प्रसादनें आपल्या लग्नाची गोष्ट त्याच्याजवळ काढलीच ! आजोबांच्या, सकवारबाईच्यासंबंधानें गोष्टी निघाल्या. त्याबरोबरच त्यांनीं आपला विषय जोडून दिला. कल्पना नसतां विषय निघाल्यामुळें निशिगंध जरा गोंधळलेच. चारुशीलेला ती गोष्ट मनापासून नको होती, हें त्यांना माहीत होते. पंडितांनीं त्याकरितां शहाणीच्या वडिलांनीं ते त्याच्याकडे बोलायला गेले असतां, त्यांचा पाणउतारा केला होता, आपण मुलगी तर देणार नाहींच, पण तुम्हीं दहापांच हजार रुपये अब्रूनुकसानीदाखल दिले पाहिजेत. अशी मागणी— धमकावणी देऊन केली होती. ही गोष्ट पंडितां-कडून त्यांना कळली होती; पण हें सत्य प्रसादला सांगावें कसें ? सांगितलें तरी त्याला पटेल कितपत ? याची त्यांना चांगलीच पंचाईत पडली. काय उत्तर द्यावें, हें त्यांना कांहींकाळ सुचेना. त्यांनीं युक्तिप्रयुक्तीनें त्याचें मतपरि-वर्तन करतां येईल काय हें पाहण्याचें ठरविलें. हा प्रसंग कधीं तरी येणार— आपल्याला त्या दिव्यांतून जावें लागणार, ही अंधुक कल्पना अगोदरपासून त्यांना होतीच. तो क्षण आतांच आला. त्यांनीं पंडित—चारुशीलेची बाजू आपण घेतों असें न दाखवितां, तो एकदम बिथरेल ही जाणीव ठेऊन, त्याच्याशीं बोलायचा घाट घातला. गोड शब्दांनीं आणि गुंतागुंतीच्या कोटी-क्रमांनीं त्याला घोंटाळ्यांत घालायला सुरवात केली. शास्त्र, रूढी, लोकसमज, समाजांतले आपलें स्थान, पंडिताचे समाजावरचे आपलें वजन, लोकांची त्यांच्याकडे व त्यामुळें त्यांच्या मंडळीकडे पाहण्याची दृष्टि, यावर त्यांनीं प्रदीर्घ व्याख्यान सुरू केलें. प्रसादचे मन हेलकावे घेण्याच्या टोकाला येते कीं काय असें वाटूं लागले. जास्त बोलतां येईना. कांहीं मुद्यांनीं तो निरुत्तर

होऊं लागला तो ! पण कांहीं केल्या शहाणीशीं लग्न करण्याचा त्याचा निश्चय अणूमात्र ढळेना ! कोटीक्रम करणें त्याला पटतच नव्हतें ! त्याचें निक्षून एकच उत्तर, वडिलांना–आईला सांगा कीं, मी आतां लग्नाची गोष्ट लांबणीवर टाकायला तयार नाहीं. निशिगंधही तितकेच खंबीर ! धिमे धिमे आपण प्रसादचें मतपरिवर्तन करूं, हा त्यांचा दांडगा विश्वास ! ते ‘ होय ! ’ म्हणत, पण पुन्हां आपलेंच प्रवचन सुरू ठेवीत.

कालांतरानें निशिगंधांचा विश्वास, न जाणों फळाला आलाही असता ! नाहीं कोणीं म्हणावें ? पण कालाला तें श्रेय निशिगंधांच्या पदरीं टाकावयाचें नव्हतें, असें दिसतें. कारण त्यांचा तो प्रयत्न चालू असतांच, एक दिवस सकाळीं ते दोघे फिरायला चालले असतां एका रस्त्याच्या कडेला, गटारांत एक अनाथ अर्भक टाकल्याचें त्यांनीं पाहिलें ! त्याला पाहतांच प्रसादचें माथें भडकलें. तें अर्भक शहाणीचें तर नसेल ? हीच भयंकर कल्पना त्याला प्रथम आली. तें अर्भक शहाणीचें नसलें तरी आपण लग्नानें तिला आपली केली नाहीं तर ती आपल्या अर्भकाची हीच गत करील, या भेसूर कल्पनेनें त्याला ग्रासलें ! त्याबरोबर त्यानें आपल्या विचाराला क्षणांत झुगारून दिलें ! लाड-काकांच्या युक्तिबाज प्रवचनाला धाब्यावर बसविलें. आई–वडिलांच्या आठ-वणीला फाटा दिला. कोणाला विचारलें नाहीं. कोण काय म्हणेल याची पर्वाही केली नाहीं. गटारांत पडलेल्या बिनवारशी अर्भकाच्या दर्शनाचा त्याला एवढा जबर धक्का बसला कीं, मागचा पुढचा विचार न करतां, सामानाची–कपड्याची गरज न बाळगतां, घरीं जाण्याचीही फिकीर न करतां, “ काका, मी मुंबईला असाच निघालों. शहाणीला भेटून, लग्न उरकून तिच्यासह परत येईन, तेव्हांच सर्वांना भेटेन. घरीं काय वाटेल तें सांगा ! ” असें कसेंबसें बोलत, त्यांच्या हाताला झटका देऊन प्रसाद स्टेशनच्या दिशेनें तीरासारखा चालता झाला ! निशिगंध प्रसादच्या वाटेकडे ‘ आ ’ वासून पहात राहिले !

---

# प्रकरण चवथें

खुनी मनुष्य ज्या ठिकाणीं खून करतो, तें स्थळ त्याला संकटांत घालणारें असतें. त्या ठिकाणीं जाणें धोक्याचें असतें. असें असूनही खुनी मनुष्याला त्या ठिकाणीं जाण्याचा मोह अनावर होतो; आणि तो तेथें जातोच. आपल्याला तापदायक होणारी ती गोष्ट आहे हें त्या बिचाऱ्याच्या ध्यानींच येत नाहीं. प्रसादच्या बाबतींत नेमके तसेंच झालें. तो जो निशिगंधाच्या हातास हिसडा देऊन निघाला तो त्यानें थेट मुंबई गांठली. स्टेशनवर उतरून त्यानें शहाणी सावर्डेकराच्या बिऱ्हाडाकडे आपला मोर्चा वळविला. निशिगंधापासून निसटतांना तो जवळ जवळ बेभानच झाला होता. गटारांत पडलेले तें बालक आणि शहाणी हीं दोन चित्रें त्याच्या मनांत आणि विचारांत व्यापून उरली होती. आपण इतके नादान कसें ? मूर्ख कसे ? आपल्याला यापूर्वीच काय करावयाला पाहिजे होतें ? काय करीत होतों ? इतके दिवस स्वस्थ बसलोंच कां होतों ? आई वडिलांनीं मूक संमति दिली होती. शहाणीच्या आईला आमचें लग्न इष्ट वाटत होतें. असें असतां आपण गलथानपणानें कां रेंगाळत राहिलों ? अशा विचारांनीं त्याला अगदीं भांबावून सोडलें. तो स्वतःवर रागावला. गाडींत त्याच्या डोळ्यांसमोर गटारांतील तें अर्भक आणि शहाणी नाचत होती. अर्भकाकडून दुसरीकडे दृष्टी वळवली कीं शहाणी दिसे. ती एका क्षणीं संतप्त तर दुसऱ्या क्षणीं कारुण्याची मूर्ति आढळे ! संतापातिरेकानें ती बोलत आहे, " भित्रट, बावळट, उलट्या काळजाचे ! माझ्यासारख्या अजाण तरुणीला फशीं पाडून नामानिराळे होणारे तुम्हीं पुरुष ! पुरुष कसले

रूसाव ! " असे तिचे कठोर वाग्बाण आपल्या हृदयाचा भेद करीत आहेत असा त्याला भास होत होता.

अशा वेळीं दोन्हीं हातांनीं तो आपलें हृदय घट्ट धरून वेदना शमविण्याचा विफल प्रयत्न करी ! तिच्या रागीट डोळ्यांकडे पाहण्याचें धारिष्ट होत नाहीं, म्हणून डोळे मिटून घ्यावेत तर त्याही स्थितींत शहाणी अगदीं त्याच्या जवळ आली आहे असें त्याला दिसूं लागे !

" आतां कां डोळे मिटतोस ? माझ्या बाळाला गटारांत टाकायची वेळ माझ्यावर आणलीस. त्याची ती दशा, माझी ही दशा कां केलीस ? असा कसा तूं निष्ठूर झालास प्रसाद ? मी तुझ्याकरितां आईला आळवलं, बापाशीं भांडलें. लग्नाचं वचन दिलं-घेतलंस; अन् काळं केलेंस. तूं नाहींस, तुझं पत्र नाहीं. जगाला भ्यालें. मनाला भ्यालें, अब्रूकरितां पोटाचा गोळा गटारांत घातला, मग रडूं नको तर काय करूं ? तुला शिव्याशाप देऊं नको तर काय करूं ?........." प्रसादच्या कानांत शहाणीचा आवाज घुमत होता ! गाडींत इतकी गर्दी, पण प्रसादला, आपण, शहाणी आणि गटारांत पडलेलें आपलें अर्भक इतकेंच या अखिल जगांत आहोंत ! इतकीच जाणीव राहिली होती. आकाशाच्या पार्श्वभूमीवर, शहाणीची जिवंत प्रतिमा गाडीच्या वेगानें एकसारखी अधांत्रीं चालली आहे, असें त्याला दिसूं लागलें ! मुंबईस पोहोंचल्यावर जसजसे शहाणीच्या बिऱ्हाडाजवळ तो येऊं लागला, तसतसे त्याचे पहिले विचार पाठीमागें पडूं लागले, आणि नवे विचार येऊं लागले. ती आपल्याकरितां आहे, आपण तिच्याकरितां आहोंत; आपण न भेटल्यानें ती रागावली असेल, तरी सुद्धां आपल्या चार डोळ्यांचें मीलन होतांच, ती आपला रुसवा—वैताग—द्वेष हीं सर्व विसरून जाईल ! तिला स्वर्गाधिक आनंद होईल. आपण खरी हकीकत सांगूं, गैरसमज काढून टाकूं. क्षणार्धांत पूर्वीं सारखी दिलजमाई होऊन जाईल, असे मनाला सुखद वाटणारे विचार त्याला उत्तेजन देऊं लागले.

शहाणीच्या बिऱ्हाडाच्या दारांत तो येऊन ठाकला ! पण, प्रसादची त्या ठिकाणीं अकल्पनीय दारुण निराशा झाली ! त्या जागेंत ती त्याच्या दृष्टीस पडली नाहीं. ती, तिची आई, तिचा बाप, यांपैकीं कोणीच नाहीं. तिचें बिऱ्हाडच तेथें नाहीं. तो गोंधळला. आपण जागा तर चुकलों नाहीं ? त्यानें चौकशी केली.

त्याला कळलें कीं, सावर्डेकर ही जागा सोडून गेले त्याला पुष्कळ दिवस झाले! कोठें गेले हें कोणालाच माहित नाहीं ! समुद्रांत सांडलेली सुई शोधणें आणि पत्ता माहित नसलेल्या मंडळींचा मुंबईत शोध करणें सारखेच! प्रसाद हतबुद्ध झाला. त्याच्या शरिरांतील सर्व शक्तिच नष्ट झाली ! साऱ्या मुंबईत शहाणी, शहाणी, असा तिच्या नांवाचा टाहो फोडीत हिंडण्याचा वक्त प्रसादवर आला! मनचें साधेल तर दुःख कां बाधेल? प्रसादला खात्री होती, शहाणी– आपण एकमेकांकरितां आहोंत. पण कोण कोणाकरितां असतें, हें ठरविणें मानवाच्या स्वाधीन असतें थोडेंच ? त्याचा उत्साह, आशा इच्छा धुळीस मिळाल्या ! जितक्या त्वरेनें तो या ठिकाणीं धावत आला, तितक्याच मंद गतीनें, शून्य मनानें तो तेथून परत फिरला !

त्या चाळीच्या बाहेर पडल्यावर जायचें कोठें व करावयाचें काय ? हा प्रश्नच होता. पण प्रसाद त्या प्रश्नाचा विचार करण्याइतका तरी शुद्धीवर होता कोठें ? जड पावलांनीं, शून्य मनानें आणि ध्येयविरहीत तो कोठें तरी चालला.

प्रसाद यदृच्छया समुद्राच्या बाजूस गेला. वाळवंटांत किती तास तरी सागराच्या विशाल स्वरूपाकडे पहात राहिला; एका भिकाऱ्याची पोर – भिक्षेकरितांच – पण इतकें सुरेल स्वर्गीय संगीत गात होती कीं, जशी काय स्वर्गातील शापभ्रष्ट देवताच ती असावी. त्या संगीताचे सुस्वर त्याच्या कानीं येत होते; रात्र झाली, आकाशांत परमेश्वराची अफाट धनदौलत उघड्यावर पसरलेली प्रसादला दिसली; पण त्यापैकीं कशाचाच उपयोग प्रसादच्या प्रक्षोभाचा उपशम होण्यास झाला नाहीं. प्रेम म्हणा कीं लैंगिक भावना समजा, याचा तडाखाच असा जबरदस्त असतो ! त्याच्या तावडींत प्राणी सांपडला म्हणजे, त्याला आई – बाप–भाऊ, बहिणच काय परंतु सचेतन–अचेतन सृष्टिही त्याला आवरू शकत नाहीं. आणि म्हणूनच परमेश्वराइतकीच सर्व सामर्थ्यवान अशी लैंगिक भावनाही अखिल विश्वाला व्यापून उरली आहे, असें कांहीं विद्वान् म्हणतात तें सत्य आहे, असें अशा वेळीं म्हणावें लागतें. ही अवस्था प्रसाद भोगीत होता !

शहाणीचें सर्व बिऱ्हाड बेपत्ता झाल्यामुळें प्रसादला आपली पथारी कोठें पसरावी याबद्दल अडचण पडली. नादांत भटकत असतां त्याच्या लक्षांत

ती अडचण आली नाहीं. दिवसभर वणवण केली. पोटांत भुकेनें काहूर केलें हें सुद्धां त्याच्या फार उशीरा लक्षांत आलें. वेलणकरांच्या स्पेशलमध्यें त्यानें कसेबसें चार घास पोटांत लोटले. रात्रींच्या वेळीं शरीर आणि मन थकल्यावर अंग कोठें टाकावें हा विचार त्याला पडला.

  

फुटपाथवरील कोपऱ्यावर प्रसाद किती वेळ तरी उभाच होता. त्यावेळीं त्याच्या पाठीवर मागून कोणी तरी एकदम जोरानें थाप मारली. त्यानें दचकून झटकन् मागें वळून पाहिलें. त्याचे एक वेळचे प्राध्यापक, पण सध्यां सिनेमाच्या जगांत पडलेले मित्र आबूराव आपटे होते ते !

" प्रसाद ! तूंच तो ! " आबूराव आपटे म्हणाले, " इकडे कुठें ? केव्हां आलास ? "

आबूरावांना पाहून प्रसादला आनंद झाला. अचानक भेटीनें तो गोंधळला, त्याला त्यांच्याशीं थोडा वेळ बोलायलाही सुचेना.

" केव्हां आलास ? कॉलेजला जाऊं लागलास वाटतं ? "

" आपण मद्रासला गेला होता ना ? मग आपण इथं कसे ? " प्रसादनें त्यांना उलट आतां विचारलें.

" कुठं चालला आहेस तूं ? इथं असा उभा कां ? विशेष गडबडींत नाहींस ना ? मग चलतोस बरोबर माझ्या ? माझ्याच खोलीवर जाऊं पुष्कळ दिवसांनीं भेटलास. खूप खूप बोलतां येईल आहे ना तसा तुला वेळ ? " प्रसादचा हात त्यांनीं धरला. त्याच्या वस्तीची अडचण अशी अनायासेंच दूर झाली. " माझी ना नाहीं, " असें पुटपुटत त्यानें त्यांच्या बरोबर जाण्याची तयारी दाखविली. या अचानक भेटीचा आनंद प्रसादला जास्त झाला. त्याच्या प्रेमकार्यांत उत्तेजन देणाऱ्यापैकीं ते एक होते. त्यांच्या सान्निध्यांत, आपलें इच्छित सफल होणार, असें प्रसादला पहिल्यापासून वाटत असे. त्याचें भारावलेलें मन किंचित् प्रसन्न झालें ! एकदोन मिनिटांत त्यांच्या पुढेंच बस येऊन थांबली. ' हं चल प्रसाद, ' आबूरावांनीं म्हटलें; दोघेही बसमध्यें चढले.

खोलीवर जाईपर्यंत आबूरावांनीं, आपण मद्रासहून मुंबईस केव्हां आलों, का आलों, किती दिवस राहणार वगैरे सर्व माहिती प्रसादला दिली. नंतर

प्रसादनेंही आपल्या मुंबईस येण्याची सर्व हकीकत सांगून येथें आल्यावर काय चमत्कार घडला त्याचेंही साग्र संगीत वर्णन करून तो मोकळा झाला.

प्रसादच्या शिक्षणाची अकारण इतिश्री होत आहे, याबद्दल आबूरावांना जितका खेद झाला तितकेच त्याच्या प्रणयपूर्तीच्या आड अडथळे येत आहेत याचेंही वाईट वाटलें. त्याच्या शिक्षणाविषयीं त्यांनीं उद्गार काढले त्यावेळीं प्रसादनेंही खुलासा केला कीं शिक्षणाला आपण कंटाळलों नाहीं, शहाणीशीं लग्न केल्यानंतर आपल्या आई--वडिलांनीं घरीं राहण्यास नाखुषी दाखविली, शिक्षणाकरितां खर्चाची व्यवस्था केली नाहीं, तरी आपण चिंता करणार नाहीं. मुंबईतच राहूं. खाजगी शिकवण्या मिळवूं. कुठल्याही दैनिकाच्या कचेरींत 'पार्ट टाईम' काम मिळवूं. त्यावर चिन्हाड चालवून शिक्षणाचीही तड लावूं ! पण शहाणीसंबंधीं काय तो सोक्षमोक्ष लागल्याखेरीज आपल्याला कांहींच सुचत नाहीं. आबूरावांना तें पटलें. प्रसादची उमेद आणि विचार त्यांना आवडल्याशिवाय राहिलें नाहीं. प्रोत्साहनपूर्वक त्याला, आपल्याकडे रहा, तूं शहाणीचा शोध कर, आपल्या ओळखीच्या मंडळीमार्फत मी पत्ता काढतों, असें वचन देऊन प्रसादला प्राध्यापकांनीं निश्चित केलें. आबूरावाच्या आश्वासनाचा तसा प्रोत्साहनाचा हात आपल्या पाठीवर पडला त्या अर्थीं आतां सर्व कांहीं ठाकठीक होणार ही प्रसादला खात्रीच वाटली !

त्याला त्या रात्रीं गाढ झोंपही लागली. झोंपेंत स्वप्नें पडलीं. शहाणी त्याच्या स्वप्नसृष्टींत वावरत होती, हें उघडच होतें.

दुसऱ्या दिवसापासून दोघांनीहि आपापल्या चालीनें चालावयाचें, रात्रीं परत आल्यावर झाल्या दिवसाची हकीकत एकमेकांना सांगावयाची, नवे मार्ग सुचतील त्याप्रमाणें पुढें शोधाच्या पाठीस लागावयाचें, असें ठरून त्याप्रमाणें दोघांच्याही उद्योगाला सुरुवातही झाली.

दोन तीन दिवस गेले. शहाणीचा शोध लागला नाहीं. एक दिवस आबूरावांना त्यांच्या एका दोस्ताकडून खात्रीलायक कळलें कीं, शहाणीचें लग्न एका तरुण पदवीधराशीं लागलें. तें जोडपें लग्न होतांच आकोला-उमरावतीकडे निघून गेलें. शहाणीच्या नवऱ्याला त्या बाजूकडे एक चांगली सरकारी नोकरी मिळाली आहे. तिचे आई--बाप कोंकणांत चालते झाले ! अशी बातमी ऐकून प्रसादाला किती यातना होतील, ही आबूरावांना कल्पना असल्यानें

त्याला ती कशी सांगावी, याचा त्यांना पेंच पडला. शिवाय ती बातमी अजून त्यांना विश्वासार्हही वाटत नव्हती. शहाणीशीं लग्न करणारा तरुण कोण ? आपल्या परिचयांतला तो आहे काय ? शहाणीची खरी हकीकत समजावून घेऊन त्यानें लग्न केलें आहे कीं कसें ? न कळतां त्यानें तें पाप पदरीं बांधून घेतलें असेल का ? आपलीच पुरी खात्री झाल्याशिवाय हें अर्धवट सत्य सांगून आपल्याबरोबर प्रसादलाही कां काळजींत टाकावें ? असेंही त्यांना वाटत होतें. म्हणून त्यांनीं ही ऐकलेली बातमी गुलदस्तांत ठेऊन प्रसादला शोध करण्यांत प्रोत्साहित केलें होतें !

पण शेवटीं जें कळावयाचें होतें तें नक्कीं कळलें. शहाणीचें लग्न झालें. त्यांच्या कॉलेजांतला दुसरा एक ओळखीचाच विद्यार्थी होता. त्याचें लक्ष शहाणीवर होतें. तिच्या घरीं अधूनमधून जाणारा, देखणा, तसाच हुशार ! शहाणीच्या बापानें, प्रसादच्या पंडितांना धुडकावून दिलें होतें, ते त्याच्याच आधारावर ! त्याच्याकडून त्या दारुड्यानें पैसेही उकळले. शहाणीची 'अवस्था' छपविलीही ! त्या ' पागल ' तरुणालाहि तितका पोंच आणि धोरण असण्याचें काय कारण ? बापानें त्याच्या जवळ विषय काढला. आपली सांपत्तिक अडचण रडगाण्यांनीं गायली. त्याला तें पाहिजेच होतें. त्यानें कबुली आणि संपत्ति देऊन शहाणीला आपलीशीं केली. त्याला स्वर्ग सौख्य मिळालें. शहाणीच्या आई वडिलांनीं सुटकेचा निश्वास टाकला ! अडलेली गाय—अगतिक झालेली शहाणी, मुकाट्यानें नव्या नवऱ्याच्या मागें गेली !

आपल्या अब्रूचा बचाव झाला. असें शहाणीला वाटलें असेल कीं काय ? प्रसादला आपण पारखे झालों, याचें तिला वाईट वाटलें असेल का ? हें सांगणें कठीण आहे. कदाचित् आई-वडिलांच्या गळ्याचा फास सोडविला, याचें समाधान तिला झालें असेल. प्रसादला प्रयत्नपूर्वक विसरावयाचें, नव्या नवऱ्याची मर्जी संभाळून त्याच्याबरोबर स्वतःला सुखी बनविण्याची शिकस्त करावयाची, असा संकल्प मात्र शहाणीनें केला असणें शक्य आहे.

" मनोहर देशमाने " या तरुणानें शहाणीशीं लग्न केलें, हें संशयातीत ठरलें. तें दांपत्य आतां पूर्ण आनंदांत असून नुकतेंच दूरच्या प्रवासाला गेलें आहे, मनोहर देशमान्यानें आपल्या संगती सकुटुंब चलण्याबद्दल मुंबईतील एका स्नेहाला रसभरीत पाठविलेलें पत्रच आबूरावांना अचानक पहावयाला

मिळालें ! इकडे प्रसादलाहि तुटक–विपर्यस्त पण तसेंच कांहींसें कळलेंच. मनोहर देशमान्याचें नांवही त्याला समजलें. ती मूर्ति आणि त्याबरोबर अधून-मधून तो शहाणींकडे येऊन तिची आपल्यापरी अबोलवृत्तीनें करीत असे ती आराधना, हीं प्रसादच्या डोळ्यापुढून सरकून गेलीं. बातमी कळल्यानें त्याच्या हृदयाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होतात कीं काय, असें मात्र त्याला होऊन गेलें. आपण ऐकलेल्या वार्तेपेक्षां उलट आबूराव आनंदाची वार्ता ऐकवतील अशी अजूनही त्याला दुबळी आशा वाटतच होती. रात्रीं दोघांचीही खोली-वर ठराविक वेळीं भेट झाली. रडक्या पण आशाळभूत वृत्तीनें प्रसाद आबूराव काय सांगतात, तें ऐकायला अधीर झाला होता. आबूरावांवर तो प्रसंगच होता. सावकाश, वेचक शब्दांत, प्रसादच्या हळव्या मनाची पुरती जाणीव ठेऊन, आबूरावांनीं प्रसादला शहाणींच्या झालेल्या लग्नाची हकीकत अखेर सांगितली. वाईट वार्ता सहसा खोट्या ठरत नसतात. आबूराव यांनीं कितीही निर्विकार राहून, ‘ झालें तें बरेंच झालें तुला काय त्याचें. ती तुझी नव्हतीच. ’ असें ठसविण्याच्या शब्दांनीं जरी प्रसादला कळलेली हकीकत निवेदिली, तरी प्रसादच्या हृदयावर त्या बातमीचा वज्रा-घात झाल्याशिवाय कसा राहील ? अप्रिय वार्ता कानीं येतांच प्रसादला आपलें आयुष्य भकास झालेसें वाटलें !

एक पत्नी निवर्तली की तिच्या अशौच्याच्या अमंगल कालांतच दुसरी वधु शोधण्याच्या मार्गाला लागणाऱ्या निढावलेल्या व्यवहारज्ञांच्या कोटींतील लोक पुष्कळ असतात. त्या वर्गांत प्रसाद मोडण्यासारखा खासच नव्हता ! मनोहर देशमान्यानें शहाणीला पटकावून आपल्यावर मात केली, ही विषारी कडु गोळी त्याला मुकाट्यानें गिळणें भाग असलें तरी ती त्याला सहजासहजीं पचवितां येणें अशक्य होतें. प्रसादच्या या वेळच्या मनाच्या अवस्थेचें अगदीं मोजक्या वाक्यांत वर्णन करावयाचें झालें तर असें करितां येईल कीं, त्यानें शहाणीच्या विवाहाची वार्ता ऐकल्यानंतर, श्री. के. क्षीरसागर यांच्या “ राक्षसविवाह ” या पुस्तकांतील नायकाप्रमाणेंच अक्षरशः प्रसादची गत झाली ! आपण जिचे प्रियकर, जी आपली प्रेयसी, ती कायमची दुसऱ्याची झाली ! ती स्वेच्छेनें दुसऱ्याची झाली असेल, असें त्याचें मन त्याला मुळींच ग्वाही देईना ! हा तिचा राक्षसविवाहच नव्हे काय ? आपल्यामुळे

नाहीं तरी मनोहर देशमान्यामुळें शहाणीची बेअब्रू झाली नाहीं, तिचें शील चवाठयावर आलें नाहीं, या कल्पनेनें समाधान करून घ्यावें असें त्याच्या मनांतच येईना ! भावनाप्रधान कोणाही तरुणाचें असेंच होतें. मुंबईस आतां प्रसादला राहावें असें वाटेना आणि बाहेर जावें असेंही सुचेना. तो चडफडला किती, रडला किती, हें एक त्याचें त्याला आणि परमेश्वरालाच माहित ! आबूराव आपटयांनीं मिळालेल्या वेळांत हळूवारपणें त्याच्या विचारांना मुरडा देण्याचें प्रयत्न चालविले ! अशा वेळीं कोणाला झालें तरी त्वरीत यश कसें मिळणार ? कालच त्यावर यशस्वी उपाय योजना करीत असतो.

— शहाणी मनोहराजवळ उभी आहे, त्यानें तिचे हात आपल्या हातीं घेतले आहेत, तिच्या ओंठावर आपले ओंठ ठेवण्याकरितां त्यानें पुढें तोंड नेले आहे. ती हंसते आहे, लाजते आहे, लटकीच मान वळवते आहे....

— प्रसादची इच्छा नसतांनाही हीं अशीं दृश्यें त्याचें मन त्याच्या दृष्टीपुढें नाचवून त्याला डागण्या देत होतें. आपली आई, आपले वडिल, आपली बहीण, लाडकाका या सर्वांना तो पार विसरून गेला होता. खोलीबाहेर प्रसाद पडेनासा झाला ! जेवलें तर जेवलें नाहींतर उपाशीही राहावें, पडून पडून कंटाळा आला म्हणजे गॅलरींत जाऊन रस्त्यांतील रहदारीकडे अर्थशून्य दृष्टीनें पहात राहावें, असा क्रम प्रसादनें कांहीं दिवस चालविला होता.

—सकाळच्या ताज्या वर्तमानपत्रांतील आबूरावांनीं आपल्या सिनेमा कंपनीच्या आगामी बोलपटाची आकर्षक जाहिरातबाजी केलेली पाहण्यांत प्रसाद आपलें लक्ष गुंतविण्याचा प्रयत्न करीत होता. वाचतां वाचतां इतर मजकुरावरूनही त्यांचे डोळे अहेतुकपणें फिरत होते. पहात असतां एका प्रतिष्ठित साप्ताहिकांत प्रसादच्या पूर्वपरिचित ताईसाहेबांचा फोटो त्याला दिसला ! किंचित् कुतुहल वाढलें. फोटोशेजारींच मोठ्या खिळयांनीं छापलेकें शीर्षक होतें. त्या खालीं बराच मजकूर होता. ताईसाहेबांचा आणि त्यांनीं महिलाविषयक चळवळींत प्रमुख असा भाग घेतल्याचा गौरवपूर्ण उल्लेख असून त्याबद्दल ताईसाहेबांचें हार्दिक अभिनंदन, व त्याबरोबर त्यांच्या सत्कार्याचें अभीष्टचिंतन होतें.

—प्रसादला ताईसाहेबांचें व त्याबरोबर त्यांच्या सहवासांत गेलेल्या दिवसांचें

स्मरण झालें. मागील एकेक कल्पना येऊं लागल्या, त्या कांहीं दुखवूं लागल्या, कांहीं सुखवूं लागल्या. पूर्वस्मृतींची गोष्ट मोठी मजेदार असते. त्या गोष्टी मनुष्याला रिझवितात, चालू परिस्थितींतून दूर नेऊन आपल्या मनाप्रमाणें खेळवितात. एकावरून दुसरी, दुसरीवरून तिसरी कल्पना येते, मन त्याबरोबर हेलखावे घेऊं लागते. जवळ जवळ स्वप्नासारखीच ती अवस्था!

प्रसाद ताईसाहेबांच्या छायाचित्राकडे दृष्टि स्थिर करून राहिला; पण त्या चित्रावर त्याच्या कल्पनेनें कांहीं वेळानें कुसुमदेशमुखाची छबी चितारली! – ती छबी, पुन्हा ताईसाहेबांची मूर्ति, त्या हलतातसें वाटून मध्येंच एकदम आणखी शहाणी सावर्डेकर! त्यांच्या त्यांच्या सहवासांतील त्या त्या वेळच्या आठवणी! त्या आठवणींनीं आपल्याला आनंद होतो आहे कीं त्रास होत आहे, हें प्रसादला कळेनासें झालें!

" चित्रांतील ताईसाहेबांच्या दृष्टीला त्यानें दृष्टि भिडविली; प्रसादच्या कानांत ताईसाहेबांचे शब्द घुमलेसे वाटले, " आतां भलत्या नजरेनें कां पाहातोस? ती वेळ गेली. आतां मला तुझी गरज नाहीं! पतीच्या संगतींत मी सुखी आहे! सामाजिक कार्यांत माझें सुख वाढीस लागलें आहे! तुला मी पूर्णपणें विसरूनही गेलें आहे!" प्रसादनें डोक्यावरून व डोळ्यावरून हात फिरविला.

ताईसाहेबांचें चित्र जाऊन त्या जागीं शहाणी दिसूं लागली. त्यावरून प्रसादला आपली दृष्टी बाजूस करतां येईना. ती रडत नव्हती. तशी हंसतही नव्हती! अतिशय गंभीर– प्रशांत– तिची दृष्टि होती. ती म्हणत होती, "आतां अशा कामुक नजरेनें कशाला पाहातोस माझ्याकडे? मी दुसऱ्याची झालें! तुझें– माझें नातें बदललें! सामाजिक रूढीच्या शृंखला तूं तोडूं शकला नाहींस, त्याला मी काय करूं! मला माझी सोय पहावी लागली. आपला ऋणानुबंध संपला!" आणि हा हां म्हणतां, शहाणीची छाया अदृश्य झाली! प्रसादचे डोळे पाण्यानें डबडबले!

त्याच वेळीं, कुसुम देशमूख आपल्याकडे पहात आहे, खूप मोठ्यांदा हंसत आहे; हंसून आपली हेटाळणी करीत आहे, असें त्याला दिसूं लागलें. प्रसाद रडत होता. कुसुम देशमूख खदखदां हंसत होती. त्यानें तिच्याकडून दृष्टि बाजूला केली; पण तिचे हेटाळणीचे शब्द त्याच्या कानांत घुसूं लागले.—

—" तुझ्या उच्छृंखलपणाला आळा घालण्याकरितां मी तुझ्या श्रीमुखांत

भडकावली खरी, पण माझा हेतु तुला उमगला नाहीं; तूं माझ्यापासून दूर होऊन शहाणीला कवटाळलेंस ! तुला चांगलें प्रायश्चित मिळालें. आतां कां रडतोस ! खऱ्या प्रेमाची पायमल्ली केली, म्हणजे हें असं रडणं नशिबीं यायचेंच ! ”
प्रसादला असह्य झालें. समोरचें वर्तमानपत्र त्यानें बाजूला भिरकावलें; पण कसुम देशमुखचा विचार मात्र त्याला बाजूला करतां येईना ! त्याला आतां वाटूं लागलें, कुसुम देशमुखचे म्हणणें खरें होतें, खरें आहे. तिच्याकडे त्या वेळीं मी पाठ फिरविली नसती, तर आतां आपल्याकडे सुखानें अशी पाठ फिरविली नसती ! मनांत विचार आला, तसा प्रसाद ताडकन् उठला, त्यानें कपडे केले आणि वेडयासारखा कुसुम देशमुखला भेटायला जायला तयार झाला ! त्याला वाटलें, शहाणी दुसऱ्याची झाली. आतां ती सुखी होईल. आपल्यावरची जबाबदारी संपली. खरी हकीकत सांगून क्षमा याचना केली, कुसुमच्या कायमच्या प्रेमाची मागणी केली तर ती, ती मान्य करील. कुसुम आपली होईल. आपण–कुसुम एक होऊं. सुखी होऊं ! वेडा विचार !

जिना उतरून तो खालीं गेला. त्याचें त्यालाच काय वाटलें कोण जाणे ! विचार बदलला त्यानें. तो तसाच परत फिरला ! “ आपण भावनेच्या भरांत कुसुमकडे गेलों तर पुन्हां तेथें तिच्याकडून श्रीमुखांत बसण्याची पुनरावृत्ति होणार नाहीं कशावरून ? जगांत कोण कोणाकरितां असतें ? हें समजण्याची पात्रता मानवांत नाहीं हेंच खरें ! शहाणी आपल्यासाठीं आहे, अशी खात्री वाटत असतां, ती आपली झाली नाहीं. मग कुसुम देशमुख तरी आपल्याकरितां आहे अशी खात्री आणि तीहि इतक्या दिवसानंतर, कशी बाळगतां येईल आपल्याला ? ” असे कांहींसे सुसंगत विचार प्रसादला आले !

त्याच दिवशीं रात्रीं दहा साडेदहाच्या सुमाराची गोष्ट. प्रसाद हॉटेलमध्यें जेवायला गेला. रोजच्यापेक्षां आज तो बऱ्याच उशीरा गेला होता. रोज रात्रीं त्याच्याबरोबर आबूराव आपटे असत. आज ते लवकर परत आले नाहींत. त्यांची वाट पाहून तो एकटाच बाहेर पडला होता. स्वतंत्र जागेंत बसला. नोकर आला. ‘ एक ताट ’ म्हणून त्यानें फर्मावलें. आज त्याच कसल्या तरी विचारांच्या तंद्रेंत होता तो ! त्याच्या लगतच्या स्वतंत्र जागेंत कोणी तरी होते. एक स्त्री असावी, दुसरा पुरुष. त्यांच्यांत हंसणें, बोलणें चालूं होतें. स्त्री हंसली. कांहीं बोलली, हंसणें ओळखीचें वाटलें.

शब्द परिचित भासले. प्रसादचें लक्ष साहजिकच तिकडे वेधलें. तो विचारांत पडला. कोण असावी ती ? त्यानें कान टवकारले. विचाराच्या भरांत त्यानें मान वर केली. समोर बिलोरी आरसा. पलिकडील व्यक्तींचें स्पष्ट प्रतिबिंब त्या आरशांत पडलेलें प्रसादला स्वच्छ दिसलें !

नेसण, पदर उलट्या पद्धतीचा वाटला ! साहजिक होतें तें. आरशांत उलटेंच प्रतिबिंब दिसणार ! पण त्यावरूनसुद्धां ओळख पटल्याशिवाय कशी राहील ? ती स्त्री—कुसुम देशमुख होती ! तिच्या जोडीदाराला त्यानें ओळखलें नाहीं. कुसुम देशमुखाला तेथें—तशा स्थितींत पाहून चपापलाच प्रसाद ! ती जोडी खुशींत—गमतींत होती. जेवतांना बोलणें चालू होतें ! बोलतांना जेवण चालू होतें. जोडीदार कुसुमचा अनुनय फार चांगला करीत होता ! केव्हां केव्हां तर साग्रह आपल्या ताटांतला घांस तो तिला भरविण्या-सही प्रेमानें कसुर करीत नव्हता ! ती मुरडत होती. मान वेळीत होती, " हें काय हें ? " असें लटक्या रागानें म्हणत होती ! पण जोडीदाराच्या घासाचा ती स्वीकारही करीत होती !

नोकरानें त्याचें ताट आणलें. प्रसादचें जेवणावरून लक्ष उठलें. ताटांत हांत आणि आरशावर दृष्टि !

आपल्या शयनमंदिरांत—खास एकांतात प्रेमानें समरस झालेले दोन जीव जसें वर्तू शकतात, ज्या ज्या नाना क्रीडा—कौतुकें करतात, त्यांतील बऱ्याचशा क्रीडा, कुसुम आणि तिचा जोडीदार यांच्यांत त्या ठिकाणीं चालल्या आहेत. हें समोरचा प्रामाणिक आरसा प्रसादला भरपूर पुराव्यानिशी पटवीत होता; जोडीदार कुसुमच्या नांवाचा उच्चार करीत होता. कुसुमनें एकदांही आपल्या जोडीदाराला नांवानें संबोधल्याचें प्रसादनें ऐकलें नाहीं. त्यांच्या प्रणयचेष्टेंत कुठली, कसली कमतरताही दिसली नाहीं !

प्रसादची खात्री पटली. कीं, ही, कुसुमनें आपल्या श्रीमुखांत अशा रीतीनें परस्परच भडकावली आहे ! शहाणीप्रमाणें कुसुमही आपल्याकरितां नव्हतीच, हें असें अचानक सिद्ध झालें ! कसकसल्या विचारांत प्रसादनें तेथेंच किती वेळ घालविला कोण जाणें ! कुसुम आपल्या जोडीदारासह तेथून केव्हां गेली हेंही त्याला विचारांच्या भरांत कळलें नाहीं !

" काय पाहिजे साहेब ? " दार उघडून नोकरानें येऊन त्याला विचारलें, तेव्हां तो अर्धवट भानावर आला. " कांहीं नको. घेऊन जा हे ! " त्यानें सांगितलें आणि रिकाम्या आरशाकडे एक दृष्टिपात करून तो तेथून उठला.

" कुणाकरितां कुणीतरी असतें ! पण आपल्याकरितां कोण ? कोणाकरितां आपण ? " असेच कांहीं विचार त्यावेळीं प्रसादच्या डोक्यांत थैमान घालीत नसतील का ?



## प्रकरण पांचवें

महायुद्धाच्या ज्वाळा प्रतिदिनी भडकत चालल्या. आपल्या सरकारला आपल्या सहाय्याची नड भासूं लागली. अशा वेळीं सुद्धां सर्वोदया-करितां धडपडणाऱ्या महात्म्याच्या उजू विनंतीचा—मागणीचा सरकार विचार करीना. देशाला एकदिलानें सत्याग्रहाचें शस्त्र उचलावें लागणार, अशीं चिन्हें दिसूं लागलीं. लहानापासून थोरापर्यंत जो तो आपल्याला मगदुराप्रमाणें आगामी सत्याग्रहाच्या गोष्टी बोलूं लागला.

पंडितांच्या 'प्रफुल्ल' कचेरींत अटीतटीनें सत्याग्रहाच्या विषयावर रणावर रणें पडूं लागलीं. महायुद्धासारख्या आणि सत्याग्रहासारख्या सर्वोत्कर्ष विषयावर, पंडित, निशिगंध आणि चारुशीला यांचीं मनें केंद्रींत झाल्यावर, त्यांना प्रसादच्या न कळवितां घरांतून जाण्याकडे लक्ष देण्यास आणि त्यावर विचार करून असंतोष किंवा राग व्यक्त करण्यास वेळ तरी कसा मिळणार? आणि फुरसद तरी कशी सांपडणार? फक्त निशिगंधांनीं प्रसाद मुंबईस गेला त्या दिवशीं पंडितांना आणि चारुशीलेला, त्याच्या जाण्याची कारणासह जेव्हां बातमी दिली, तेव्हां त्याच्याबद्दल जें काय थोडेंफार बोलणें झालें असेल तेवढेंच!

—"प्रसाद शेवटीं वेडेपणा करणारच. मला वाटतच होतं तसं! अलीकडचीं मुलं! ती कां विचारानं वागायचीं आहेत?" चारुशीला वैतागूनच उद्गारली होती हें!

—"एकंदरींत पाणीदारपणा दाखविला प्रसादनं! आम्हीं आपल्याच उद्योगांत गुंतलों, त्याच्या मनःस्थितिकडे आमचं लक्ष गेलं नाहीं. ही आमची

चूक ! " हे पंडितांचे उद्गार होते, " वास्तविक याच्या पूर्वीच तो जायचा ! पण त्यालाही तशाच प्रसंगानें धक्का दिला, तेव्हांच तो जागा झाला. ठीक आहे. त्याला वडिलकीनें उपदेश करावा इतका कांहीं तो आतां लहान नाहीं. त्याच्या चालींत तो चालतो आहे, त्यांत आम्हांला बोलण्याचं प्रयोजन नाहीं......."

निशिगंधांनीं आपलें मत दिलेंच नाहीं. कारण त्यापूर्वी त्यांनीं अनेकदां प्रसादला वळविण्याचे प्रयत्न केलेही होते. ज्या स्थितींत तो गेला, तो प्रसंग त्याच्याही डोळ्यापुढें होतांच. मग ते तरी काय बोलणार ? त्याच्या जाण्यानें आणि जाण्यापाठीमागील विचारानें त्यांचें मन कांहींसें खट्टू झालें होतें. हें मात्र खरें ! आपला प्रसाददादा कुठें गेला ! कां गेला ? तो आतां केव्हां येणार आहे ? येतांना खाऊ-खेळणीं आणील कीं नाहीं ? अशा प्रश्नांचा भडिमार करून मंदाकिनीनें दोन दिवस चारुशीलेला चांगलेंच भंडावून सोडलें. मंदाकिनीला शाळेंत घातलेंच होतें. शाळेंत तिचा जो वेळ जाई, तेवढाच काय तो चारुशीलेला शांतपणा मिळे. शाळेंत जायच्या अगोदर आणि शाळेंतून आल्यावर चारुशीलेनें तिला खाऊ देऊन गप्प करीपर्यंत " आला कां दादा ? आणला कां त्यानें मला खाऊ ? कुठें आहे तो ? " असें तिनें विचारलें नाहीं, असें होतच नसे.

चारुशीलेच्या पाठीमागें अशा कितीतरी बैदा लागल्या होत्या. तेवढ्यांत तिच्या आप्पांचे पत्र आलें. त्यांच्या कुटुंबियापैकींच अशी वाटणारी म्हातारी-सुद्धां—सरशीची आई—इहलोक सोडून गेली असें समजलें. सुंद्राच्या मृत्यूची बातमी वाचून चारुशीलेच्या डोळ्यांत पाणी आल्याशिवाय राहिलें नाहीं. संबंध एक दिवस ती सुन्न झाली होती. तसेंच आप्पांच्या दुसऱ्या एका पत्रांत आलें " नाग्यानें देशी दारू गाळण्याची आपल्या शेतांत चोरून भट्टी लावली. अबकारीखात्यांत ती बातमी कळली. अधिकाऱ्यांनीं अकल्पित छापा घालून नाग्याला मुद्देमालासुद्धां पकडला. त्याला बराच मोठा दंड झाला आपला माणस व तो निष्कांचन म्हणून त्याला सोडविण्याकरितां त्याचा दंड आपणच भरला ! शेतीच्या कामांत नाग्यासारख्याचा उपयोग होण्याऐवजी उलट त्रासच होतो. दारूनें शरीर पोखरलेलें, चहाच्या व्यसनानें उन्हातान्हांत राबण्याची शक्ति नष्ट झालेली, त्यामुळें नाग्यासारख्यांचा शेतकामाला कांहींच उपयोग होत

नाहीं. अशा लोकांची मदत शेतीचें उत्पन्न वाढविण्यापायीं कशी होणार ? हा नवा अनुभव घेत आहे. अनुभव घेण्यांतच शेती आणि आयुष्य खलास होणार!" आप्पासाहेबांच्या अशा निराश उद्गारांनी चारुशीलेला काय वाटावें हें तसा अनुभव घेणाऱ्यालाच कळणार!

वसंताच्या छांदिष्ट वागणुकीबद्दल आणि सुलभेच्या स्वच्छंद चालीबद्दल आप्पा स्पष्टपणें कधीं लिहित नसत. पण एकंदर त्यांच्यासंबंधींचा उल्लेख निराशेच्या सुरांतलाच असावयाचा! ज्यांच्या आयुष्यांतील ऐन उमेदीचा काळ खुशालचेंडू-ऐषआरामांत गेला आहे, त्यांना जबाबदारीची कसलीच कामें आंगावर घेऊन पार पाडतां येत नाहींत. पंख उपटलेल्या पांखराप्रमाणें ते लोद होतात. असून अडचण नसून खोळंबा; अशी त्यांची अवस्था होते.

वसंतरावांच्या वागणुकीला अनुलक्षून आप्पांनीं आपल्या पत्रांत वरील सारखे विचार प्रगट केलेले चारुशीलेनें वाचले म्हणजे तिला कसेंसेंच होऊन जाई! आप्पाप्रमाणें आपल्या चिरंजीवाबद्दल हरघडी असेच निराशेचे उद्गार किती तरी वडिलांना काढण्याचे नशिबी येत असेल? आपल्या सुनेसंबंधीं, सुलभेसंबंधीं, आप्पा चारुशीलेला कांहींच कळवीत नसत. ती स्त्रियांची उन्नति करण्याच्या मार्गे आहे. महिला मंडळ तिनें काढलें आहे. साक्षरता प्रसाराचें कार्य तिनें अंगिकारलें आहे, ठीक चालले आहे. असें मधून मधून ते कळवीत. पण तें अगदीं हात राखून लिहितात, असेंच चारुशीलेला वाटे. सुलभेच्या वागण्यानें आपल्या आप्पांना खरें समाधान होत नाहीं, अशी शंका तिला येई आणि तेवढ्यानेंहि ती बेचैन होऊन जाई.

तशांत, आपल्या एकाद्या पत्रांत वसंत-सुलभा यांच्यांत उडत असलेल्या खटक्यांचा तापदायक उल्लेख आढळला म्हणजे चारुशीलेला जें काय होऊन जाई, त्याचें वर्णन करणेंच अशक्य! आप्पा उघड कांहींच लिहित नसत. पण "अलीकडची तरुण मंडळी मोठ्या दिमाखानें आपण प्रीतीविवाह केला आहे असें सांगतात. पण अशांचें वर्तन पाहिलें म्हणजे हे प्रीतीविवाह का राक्षसविवाह ? असाच प्रश्न पहाणाऱ्यास गुंग करतो!"

आप्पाचें लिहिणें असें सूचक असलें तरी तेवढ्यावरून जें काय समजावयाचें तें चारुशीला समजून जाई! घरचें झालें थोडें आणि व्याह्यानें पाठविलें घोडें असें होऊं नये, म्हणून चारुशीला बरीक आपल्याकडील त्रास-

दायक हकीकती आम्हांना मुळींच कळवीत नसे. तशा तिकडच्या कथा पंडितांच्याही कानांवर जाऊं देत नसे.

पण इतकें असूनही जात्याच चारुशीलेचें मन जितकें व्यक्तिनिष्ठ तितकेंच पंडितांच्या संगतींत पूर्ण प्रगल्भ झालेलें देशकार्यनिष्ठ बनल्यानें देशकार्याच्या– राष्ट्राच्या चळवळींच्या गोष्टी निघाल्यामुळें व्यक्तिनिष्ठ तापदायक गोष्टी झट्‌दिशी चारुशीला दडपून टाकून देशकार्यनिष्ठ बाबतींत उत्साहानें भाग घ्यायला पुढें सरे !

—राष्ट्रसभा लवकरच सत्याग्रह पुकारणार अशीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. सत्याग्रहाचें कुंड पेटतांच त्यांत पहिली उडी पंडित टाकणार हा प्रश्न वादातीतच होता ! निशिगंधाचें मन उसळ्या मारूं लागलें. त्यांनीं पुकारा केला, "आपण यावेळीं मागें राहाणें शक्य नाहीं. सत्याग्रहांत मला भाग घेतलाच पाहिजे." चारुशीलेनें तर उत्साहातिरेकाच्या भरांत पंडित आणि निशिगंध यांच्या समोर आपली प्रतिज्ञाच जाहीर केली, "१९३० सालच्या प्रचंड सत्याग्रहांत असंख्य महिलांनीं आपली पाळण्यांतलीं लहान मुलें पाळण्यांतच ठेवून उडी घेतली होती. माझी स्थिति तशी असती तरी मी पाय मागें घेतला नसता. आतां तर माझ्यामागें कसलीच ओढ नाहीं. आपली परवानगी असो नसो, आगामी सत्याग्रहाच्या लढ्यांत आपली आहुति आपण स्वखुषीनें आणि आनंदानें देणार !" पत्नीच्या विचारानें पंडित आनंदानें बेहोष झाले !

निशिगंधांनीं मात्र आपलें विरुद्ध मत प्रकट केलें. ते म्हणाले, "पंडितांचा पिंडच देशकार्यासाठीं आहे. मी तर बोलून चालून आजन्म ब्रह्मचारी. ना बायको ना पोर ! कसलाच पाश नाहीं. तेव्हां माझा प्रश्नच उरत नाहीं. पण वहिनींचें तसें नाहीं. शिवाय १९३० च्या सत्याग्रहाच्या लढ्यांत सबंध कुटुंबेंच्या कुटुंबें पडलीं आणि ती चळवळ ओसरल्यावर, घर ना दार झालेल्या तसल्या कुटुंबांची काय दैना झाली, याचें वर्णन प्रेमा कंटकनीं आपल्या सत्याग्रही महाराष्ट्र या पुस्तकांत केलें आहे, तें वहिनीनें वाचावें आणि मग काय तो विचार पक्का करावा, एवढेंच मी सुचवीन !"

प्रश्न विचार करण्यासारखा होता व तो सक्रीय सोडविण्याची वेळही अजून आली नव्हती ! पण सर्वांपुढें सत्याग्रहाचा लढा दिसत होता इत्यर्थ हा !

: : :

शहरवासी मंडळी ' खेड्याकडे चला ' असें कितीही तोंडानें म्हणत असली तरी स्वतः तिकडे जायला खरी उत्सुक नसतात. राहावयाला तर जातच नाहींत. खेड्यातल्यांचीं तोंडें नेहमींच शहराकडे वळलेलीं असतात. ऐतिहासिक कालांत सर्वांचे डोळे जसे दिल्लीवर खिळलेले असत, तसेंच आजकाल खेडीं–तालुक्यासारखीं शहरवजा मोठीं खेडींसुद्धां – पुण्या–मुंबईत केव्हां पडतां येईल, हें पहात असतात. तरुण जीवांची तर अशी धडपड फारच चालू असते.

निशिगंधांची मामेबहिण बिजू हिच्या मनाची अशीच अवस्था झाली होती. निशिगंध आपल्या मामाकडे व आईकडे गेले होते. घरून परत निघतांना बिजूला त्यांनीं आपल्याकडे नेण्याचें आश्वासन दिलें होतें. त्या वेळेपासून आपल्या ' बाबूदादा ' चें आपल्याला पत्र येतें केव्हां आणि आपणांला त्या मोठ्या शहरांत जायला मिळतें केव्हां, असें तिला होऊन गेलें होतें. ती रोज बाबूदादाच्या पत्राची वाट चातकासारखी पहायची. आई, आत्या, वडिल आणि मित्रमैत्रिणीजवळ " मी आतां लवकरच बाबूदादाकडे राहायला जाणार आहें ! " असें ती मोठ्या ऐटीनें व डौलानें सांगायची.

पण निशिगंधांनीं अजून तिकडे पत्र टाकलें नव्हतें. त्यांना आपल्या कामाच्या गर्दींत वेळच मिळाला नव्हता ! बिजूला लवकरच बोलावण्याची वेळ येईल – नव्हे, आणतां येईल असें त्यांना वाटत होतें. पण प्रसादच्या वर्तनाची गाडी निराळ्याच रुळावरून पंजाबमेलच्या वेगानें एकाएकी धावूं लागल्यानें निशिगंधाना बिजूला आतां आपल्याकडे बोलावण्यांत अर्थ नाहीं, असें दिसून आलें. नी मग पत्र पाठविणेंही, तसेंच राहूनच गेलें तें गेलेंच !

ही अशी खरी वस्तुस्थिति; पण शहरवासियांच्याकडे पाहाण्याचा खेडयांतल्या माणसांचा दृष्टिकोनच निराळा असतो. त्यांना, शहरांतील माणसें म्हणजे मोठीं, चांगलीं वाटतात. त्यांनीं आपल्याकडे यावें, रहावें, आपण त्यांचा खूप पाहुणचार करावा, असेंही वाटत असतें. त्याप्रमाणें तीं तशीं वागताततही. शहरवासियांना तशा वागविण्यानें आनंदही होतो. ते बोलून दाखवितात. अभिनंदन करतात, परतभेट द्यायला आग्रहाचें नी कळकळीचें निमंत्रणही देतात; पण ती मंडळी परत भेटीसाठीं शहरांत त्याच पाहुण्यांकडे गेली म्हणजे त्यांचा त्यांच्याकडे अपेक्षाभंग झाल्याचें अनुभवाला येते. आपल्याला जसें वागविलें जाईल अशी त्यांची कल्पना असते; तसें वागविलें जात नाहीं असें

वाटतें. त्यांना राग येतो. मग हवीं तशीं नांवें ठेवण्यासही ती कमी करीत नाहींत. हा अनुभव कोणाला नाहीं ?

बाबूदादाचें बोलावणें येईना; तेव्हां बिजूला त्याचा राग यऊं लागला. तिची आईच काय पण वडिलसुद्धां म्हणूं लागले कीं, शहरांत राहाणारीं माणसें अशींच थापाडीं असतात ! आपण त्यांची कितीहि सरबराई केली आणि त्यांनीं, समक्ष कितीहि गोड भाषणें केलीं, तरी पाठ फिरली कीं त्यांना मागचा विसर पडलाच. वस्तुस्थितीचा विपर्यास पुष्कळदां असाच होत असतो.

पण बाबूदादाकडे जाण्याचा लागलेला छंद बिजूला स्वस्थ राहूं देईना. तिनें हट्ट घेतला. तिच्या आईनें आणि आतेनें तिची कड घेतली. तिच्या वडिलांना भरीस घातलें. शेवटीं सगळ्यांचाच आग्रह पडला म्हणून बिजूसह तिचे वडील निशिगंधाकडे जायला तयार झाले एकदाचें ! मुलीला मनासारखें स्थळ शहरांत सांपडेल असा बिजूच्या आईचा पोटांतला हेतू; तर निशिगंधाचें कसें काय चाललें आहे, हें आपल्या भावानें पाहून यावें, तो आतां तरी लग्न करायला तयार होतो काय हें त्यांनीं बघावें. त्यांनीं आग्रह करावा त्याला. आपले डोळे मिटण्यापूर्वीं आपल्याला सूनमुख पाहायला मिळावें, अशी म्हातारीची मोठी इच्छा नी तळमळ !

आपल्या बाबूदादाकडे बिजू दाखल झाली एकदांची ! मामांना आणि बिजूला अचानक आल्याचें पाहून निशिगंधांना अति आनंद झाला. त्यांचें उत्तम स्वागत झालें. मामांनीं आपल्या भाचाचा उद्योग पाहिला. ऐश्वर्य अवलोकन केलें. पंडित—चारुशीलेनेंही त्यांना बहुमानानें वागविण्यांत कसूर केली नाहीं. मामांचे शहरवासियांच्याबद्दलचें गढूळ मन स्वच्छ झालें. चार दोन दिवस राहून ते सर्वांचा निरोप घेऊन परत गेले. त्यांनीं बिजूला तेथेंच ठेवून दिलें. जायच्या वेळीं निशिगंधांना बाजूला घेऊन त्यांच्याशीं एकांतांत कांहीं महत्वाच्या बाबीसंबंधीं मामांनीं हितगुजही केलें.

चारुशीलेची कल्पना होती निशिगंधांचे मामा जातांना बिजूला बरोबर घेऊन जाणार. म्हणून त्यांनीं त्यांना बिजूला चार दिवस आपल्याकडे राहूं द्या, असें आस्थेनें सुचविलें ! त्यामुळें त्यांना फारच आनंद झाला. बिजू चारुशीलेजवळच राहिली.

चारुशीला, पंडित, बाबूदादा, यांच्याबद्दलच काय पण छोटी मंदाकिनी

हिच्याबद्दलसुद्धां बिजूला काय काय नी कसें कसें वाटायला लागलें, हें तिचें तिलाच कळेना ! ब्रिजू चुणचुणीत, हुशार, देखणी नी शहाणी खरी ! नट्टा पट्टाही तिचा कांहीं कमी नसे. पण येथें आल्यावर, ती स्वतःकडे आणि सभोंवतालच्या परिस्थितीकडे पाहून तिला लाजल्यासारखें झालें. **नागर आणि नांगर संस्कृतींत** किती तफावत असते हें तिला दिसूं लागलें. आपण देखण्या असून कळकट, शहाण्या असून अडाणी, असेंच तिचें तिला ओळखूं लागलें. चारदोन दिवसांच्या सहवासांत बिजूचे गुण, काम करण्याची चपळाई, चौकस बुद्धि, हीं सर्व चारुशीलेच्या दृष्टींतून कशी सुटरणार ? निशिगंधाजवळ ती, " तुमची ब्रिजू फार हुशार आहे हो ! " असें वरचेवर उद्गारूं लागली.

बिजूची आणि मंदाची फार लवकर गट्टी जमली ! जमवून घ्यायचें म्हटलें म्हणजे बायका आपापल्यांत कशा छान जमवून घेतात ! मग वय सारखें असो नसो. शिक्षण असो कीं नसो; गरीबी असो कीं श्रीमंती असो; कुणी कांहीं आड आणीत नाहीं. चारुशीला बिजूला आंजारूंगोंजारूं लागली. वाखाणूं लागली. मंदाकिनी तर तिला क्षणभर सोडायला तयार होईना. कोण नी काय ? बिजूनें तिला हांसऱ्या चेहऱ्यानें जवळ बोलावलें. मंदानें क्षणभर कांकूं केलें. नी लगेच तिच्याजवळ गेली. जमली गट्टी दोघींची. आपल्या मुलीचें कौतुक करणारी, म्हणून बिजू चारुशीलेला जास्तच आवडायला लागली. शिवाय खेड्यांत आपल्या आईच्या हाताखालीं गृहकृत्यांत दक्ष झालेली ब्रिजू, इथेंही चारुशीलेला हरकामांत हातभार लावूं लागल्यानें, चारुशीलेला तिच्याबद्दल जास्तच आपुलकी वाटूं लागली.

—एकाद्या वेळीं जेवणावर चारुशीला निशिगंधांना मोठ्या अभिमानानें म्हणे, " तुमच्या या बहिणीला छान स्थळ मिळायला हवं ! किती सुंदर संसार करून दाखवील म्हणतां आपल्या नवऱ्याचा ! नाहीं ? "

" अर्थात् ! कशी झाली तरी माझी बहिण आहे तीं ! वांया जाणार नाहीं; पण—हा पण कांहीं आमच्या पोरींच्या पाठीमागचा नाहींसा होत नाहीं, त्याला काय करणार ! बिजूच्या भावी सुंदर संसाराची टोलेजंग इमारत मीसुद्धां एका वेळीं मनापुढें उभारीत होतों—उभारलीही होती—पण !—मलाही तो ' पण ' पुन्हां आड आलाच माझ्या ! "

अशा भाषणांत पंडित सहसा कधींच भाग घेत नसत. त्यांचें लक्षही नसे

" बिजूची जबाबदारी मामांनीं माझ्यावर टाकली आहे. मला काय करावं हें कळत नाहीं. मागल्या पिढींतली अडाणी तरी कां ही पोर आहे ? नाहींतर कुठल्याही बैलाच्या दावणीला केव्हांच बांधली असती नेऊन! पण या सुशिक्षित पोरी ! उषेसारखी यांची गत ! ती आपल्या अनिरुद्धाचें चित्र स्वप्नांत रंगवी; या पोरी त्या उषेचा कित्ता गिरवितात ! आतां बिजूचा अनिरुद्ध कोण आहे तें मला कसें कळणार ? आणि समजा, एकाद्या वेळीं समजलें, तरी तोच तिचा मी तिला मिळवून देऊं शकेन कसा ? "

असा विषय निघाला म्हणजे बिजूसमक्ष अशी चर्चा निशिगंध खुशाल करीत ! या चर्चेनें बिजूला जसा आनंद होई तशी लाजही वाटे ! उषादेवीप्रमाणें बिजू आपल्या न पाहिलेल्या अनिरुद्धाचें चित्र मनोमन चितारूं लागली होती का ? तिचें तिला तरी सांगता आलें असतें का ? कोण जाणें ! पण ज्याचा सुगावा तिला अद्याप लागला नव्हता, त्याचें तिला स्पष्टीकरण करतां आलें नसतें, तरी पण असा एक मौजेचा चमत्कार अगदीं सहजगत्या घडून आला होता. त्याचें असें झालें होतें —

—एक दिवस सकाळीं मंदाकिनीला बिजूनें गोष्ट सांगितली. थोडे शिकवलें. नंतर ती कंटाळली. बिजू उगीचच उठली. दिवाणखान्यांत टांगलेल्या अनेक तसबिरा होत्या. एकेक तसबीर ती उभी राहून पाहूं लागली. मंदाकिनी तिचें बोट धरून आपला शहाणपणा व्यक्त करण्याची संधि कशी टाळील ? एकेका तसबिरीची माहिती मंदाकिनी मोठ्या ऐटीनें बिजूला देऊं लागली. शहरांतल्या एवढ्याशा चिमुरड्या मुलीदेखील खेडयांतल्या घोडमुलीपेक्षां किती चाणाक्ष नी तरतरीत असतात ! या कल्पनेनें बिजूला हंसू आलें ! मंदाकिनीनें एकूणएक तजबिरी नी फोटो दाखविण्याचा सपाटा लावला. दिवाणखान्यांतल्या तसबिरी पाहून झाल्या. मंदाकिनीनें बिजूला ओढीत म्हटलें, " त्या खोलींत आणखीं किती चित्रें आहेत. चल दाखवितें तुला ! " ती खोली प्रसादच्या बैठकीची ! दोघी आंत गेल्या. मंदाकिनी दिमाखानें खोलीची आणि आपल्या प्रसाददादाची माहिती बिजूला स्वयंप्रेरणेनें देऊं लागली ! " अग, ही आमच्या प्रसाददादाची खोली आहे ! तो आतां गांवाला गेला आहे. इथं असला म्हणजे या खुर्चीवर बसून लिहितो. पुस्तक वाचतों. तो फार चांगला आहे. त्याला पाहिलं आहेस तूं ? ओळख आहे का तुझी ? आतां तो लवकर येणार आहे. मला

खाऊ, खेळणीं, पुस्तकें, पातळं, ब्लाऊजला कापड आणणार आहे! तुला आणायला सांगू या अं! कळवलं म्हणजे आणील तो! आईला सांगू या बर कां ?"

मंदाकिनी सांगत होती. बिजू त्या खोलींतल्या तजबिरी पहात होती. आतां ती प्रसादच्याच छायाचित्रापुढें होती. "अग, हाच माझा प्रसाददादा! कसा ऐटींत दिसतो आहे! आपल्याकडे बघतो आहे नाहीं? आवडला का तुला? मला किती आवडतो! मी पण त्याला आवडतें. तूं पण त्याला आवडशील बरं का!" मंदाकिनी बिजूला आश्वासन भरीत होती. त्याकडे बिजूचें लक्ष किती होतें कोण जाणें! पण तिचें अवघें लक्ष प्रसादच्या फोटो-वर खिळलें होतें इतकें खरें!"

"प्रसाददादा आला! प्रसाददादा आला!"

  

प्रसाद आलेला पहातांच मंदाकिनी आनंदानें घरभर आनंदाची वार्ता ज्याच्यात्याच्या पुढें जाऊन सांगत सुटली! भावाला जाऊन बिलगली. किती वेळानें तिला बिजूची आठवण झाली. तिच्याकडे धावत जाऊन, तिच्या दोन्हीं हाताला धरून, तिनें तिला आपला आवडता प्रसाददादा दाखवायला त्याच्यापर्यंत दरदर ओढीतच नेलें.

"हें बघ दादा, आपल्या घरीं कोण आलं आहे तें! तुला कुठं ठाऊक आहे! हा बघ माझा दादा! मी तुला सांगत नव्हतें, आमचा दादा किती चांगला आहे म्हणून? आवडला का माझा दादा तुला?" मंदाकिनीनें प्रसादला आणि बिजूला एकमेकासमोर आणून म्हटलें!

प्रसादकडे पाहिलें न पाहिलें असें करून ती मंदाकिनीच्या हातून सोडवणूक करून घेऊन बिजू चपळाईनें तेथून नाहींशी झाली! प्रसाद तिच्याकडे पहात राहिला! जणुं काय आकाशांत डोळे दिपवणारी बिजली चमकून् चमकून अदृश्य व्हावी, असेंच त्याला झालें! कोण ही बिजली! कुणाची कोण? आपल्या इथें कशी आली? प्रसादच्या पुढें अनेक प्रश्नचिन्हें उभीं राहात होतीं; त्याच वेळीं त्याच्याशीं दांडगाई करणारी मंदाकिनी, "बिजूताई, चांगली आहे ना रे? तुला आवडली ना रे? मला काय आणलंस? बिजू-ताईला काय आणलंस? ती मला खेळवते, शिकवते...." असें एकसारखें प्रसादला सगळें विचारीत होती. सांगत होती.

प्रसाद घरीं परत आला. एकटाच आला. शहाणीशीं त्याचें लग्न झालें नाहीं, हें घरांतल्या मंडळींना समजलें. बिजू. कोण, कोणाची हें प्रसादला कळलें. प्रसादचें मन अजून अस्थिर होतें. दृष्टीस पडेल तेव्हां बिजूकडे निरखून पहावें, असें त्याच्या मनांत आलें नव्हतें. तो पहातही नव्हता ! त्याचें मन अजून शहाणी, कुसुम, यांच्याभोंवतीं घोटाळण्यांत बरेंचसें गुंग होतें.

पडद्यावरील बोलपटांतील नायक पाहावा, त्याच्याबद्दल कुतुहल निर्माण व्हावें आणि तोच नायक नाटकांत काम करतांना प्रत्यक्ष पहावा आणि त्याच्या बद्दलचें कौतुक, प्रेम, आपुलकी, हीं असंख्य पटीनें वाढीस लागावीं; तसें बिजूला, प्रसादचा फोटो आणि प्रत्यक्ष प्रसाद पाहून झालें ! तिला तो एकदम आवडला. त्याचें बोलणें, चालणें, मंदाची लडिवाळ थट्टा करणें, यांनीं बिजूला, कशा गोड गुदगुल्या होत. एकदोन दिवसांतच तिची भीड चेपली. मंदाकिनीचे गोडवे गाण्याच्या निमित्तानेंच अतिशय थोडया काळांत ती प्रसादशीं मन मोकळेपणानें बोलूं लागली.

आपलें मन दरक्षणीं प्रसादकडे अधिकाधिक आकर्षिलें जात आहे, हें तिला कळत नसलें तरी तसें घडत होतें. ती बोलूं लागली म्हणजे प्रसादला उत्तर देणें भाग पडे ! बिजूचें, स्वतंत्र, आगळें असें वैशिष्ट्य आहे, हें प्रसादच्या प्रत्ययाला आलें. पण त्याचें मन अजून मात्र तिच्याकडे आकर्षिलें जात नव्हतें. " यां चिंतयामि मयि सा विरक्ता " अशा सारखी अजून तरी त्याची अवस्था होती. बिजू लाडकाकाची बहिण आहे, असें समजल्यानंतर तिच्याशीं बोलायला त्याला कसलाच संकोच वाटत नव्हता एवढें मात्र खरें !

महात्माजींनीं सत्याग्रहाचें युद्ध जाहीर करून विनोबा भावे यांना आघाडीवर धाडलें होतें. आणि त्याबरोबर जी निवडक वीरांची यादी जाहीर होणार होती, त्यांत आपलें नांव गोवलें जावें म्हणून पंडितांनीं स्वयंप्रेरणेनें आपलें नांव कळविलें होतें. आपलेंही नांव घालावें असा हट्ट चारुशीलेनें चालविला होता. निशिगंधांचा प्रश्न वादग्रस्त होता. त्यावर चाललेल्या वादविवादापुढें प्रसाद–बिजू यांच्या विषयाकडे वळणार कोण ? हो ना करतां करतां चारुशीलेनें सत्याग्रहांत भाग घ्यावा अशी पंडितांनीं सम्मति दिली. ठरलें. पण निदान या वेळीं तरी चारुशीलेला सत्याग्रहांत शिरण्याचा योग नव्हता. कारण नांव कळविण्याच्या वेळींच वसंताचें एक पत्र चारुशीलेला आलें. आप्पा अत्यवस्थ

असून त्यांनीं चारुशीलेला भेटण्याविषयीं एकसारखा हट्ट चालविला आहे, अशा तऱ्हेचा मजकूर वसंताच्या त्या पत्रांत होता !

इकडे आड तिकडे विहीर असें चारुशीलेला झालें. सत्याग्रहांत जातां येत नाहीं, यामुळें तिचें मन जितकें खट्टू झालें, तितकेंच आपले आप्पा अत्यवस्थ आहेत, त्यांनीं आपला धोसरा घेतला आहे, हें कळून तिच्या जिवाचें पाणी पाणी झालें ! देशसेवा श्रेष्ठ कां पितृसेवा श्रेष्ठ असा प्रश्न तिच्या पुढें ठाकला ! निशिगंधांनीं निर्णय दिला, कीं वहिनींनीं आप्पाना भेटावयाला जावें अखेरची त्यांची सेवा त्यांनीं करावी. पंडितांनीं निर्णायक मत दिलें, कीं देशसेवेइतकेंच पितृसेवेलाही महत्व आहे. त्यांत पुण्य आहे ! दुसऱ्या दिवशींच चारुशीला आप्पांच्या सेवेसाठीं निघून गेली. पंडितांचा सत्याग्रहाचा दिनांक व स्थळहीं मुक्रर झाल्याचें जाहीर झालें ! निशिगंधांची पिरपिर चालू होतीच. सत्याग्रहाचें युद्ध लढविणें आपल्या वांटयाला येत नाहीं, हें शल्य त्यांना दुखवीत होतें. तेही गेले तर 'प्रफुल्ल' चालवायचें कोणी हा पेंच होता ! प्रसाद पण त्याच वेळीं परत आल्यामुळें निशिगंधांना हायसें झालें. कल्पना सुचली. त्यांनीं प्रसादला पत्राकडे गोंवण्याचें ठरविलें. पंडितांनाही तें पटलें. त्यांनीं म्हटलें, ' जबाबदारी ओळखून प्रसाद काम करायला तयार झाला तर आपली तुम्हांला ना नाहीं !' निशिगंधांनीं प्रसादला बाजूला घेऊन विचारलें. सर्व परिस्थिति समजावून दिली. त्याला कामाला जुंपून घेणें प्राप्तच होतें. नाहीं तर रिकामा वेळ तो कसा घालविणार होता ? पण त्याला अजून स्वतःबद्दल आत्मविश्वास नव्हता. आपण पदवीधर नाहीं. आपल्याला मानणार कोण ? आपल्याला जबाबदारीचें काम कसें झेपेल ? अशा शंका त्याला येत होत्या.

पण किती तरी मंडळी पदवीधर नसतांना वर्तमानपत्रांतून चमकून गेली. चमकताहेत ! त्यांचा आदर्श पुढें ठेऊन तूं कामाला लागशील तर तुलाही "प्रफुल्ल" यशस्वी रीतीनें चालवून दाखवितां येईल, असें निशिगंधानीं प्रसादला विश्वासपूर्वक प्रोत्साहन दिलें. तो ताज्या रक्ताचा तडफदार तरुण तयार झाला ! नाहीं तरी त्याला वैयक्तिक प्रेमविषयक क्षुल्लक विचारांच्या जंजाळांतून बाहेर पडून एकाद्या मोठया कार्यांत मन व शक्ति गुंतविणें जरूरच होतें. शिवाय ' प्रफुल्ल ' त्याच्या घरचें हक्काचे ! दुसऱ्याच्या दारीं जायचें नव्हतें ! प्रसाद प्रफुल्लचें काम जबाबदारीनें करायला तयार झाला !

—निशिगंधांचें काम झालें! ते निःशंक मनानें सत्याग्रह–संग्रमांत उडी घ्यायला मोकळे झाले!

चारुशीला माहेरीं आप्पांच्या सेवेसुश्रुषेसाठीं गेली. बिजू घरीं राहिली. कोणी न सांगतांच तिच्यावर घर संभाळण्याची जबाबदारी आली. निशिगंधांनीं संध्याकाळच्या जेवणाच्या वेळीं थट्टेनेंच बिजूला म्हटलें, "वहिनी माहेराहून परत येईपर्यंत स्वयंपाकघरांतली सारी जबाबदारी तुझ्यावर आली कीं बिजू! पाहूं या आतां कशी काय वागतेस ती! तुम्हीं अलिकडच्या पोरी! घडाघड वाटेल तितकीं अवघड पुस्तकें वाचाल. पण स्वयंपाक मात्र बिघडवून टाकाल! तुम्हां पोरीना येतंय काय? मामींनीं तुला गृहकृत्यांत कशी तरबेज केली आहे, हें दाखविण्याची तुझ्या परीक्षेची वेळ आहे बरं का? कां जाणार पळून कामाला घाबरून परत आपल्या आईकडे?"

"मला नाहीं वाटत! बिजू तशी फार हुशार आहे काका!" प्रसादनें तिची बाजू घेऊन अनाहूत निशिगंधांना म्हटलें!

"होय! आमच्या बिजूची हुशारी तुझ्या नजरेंत भरली इतक्यांत!" त्या दोघांकडे पहात, किंचित् मिस्किलपणानें हंसून निशिगंधानीं सहेतुक प्रसादला विचारण्यांत चातुर्य आणलें.

आणि खरेंच–बिजूला स्वयंपाकघरांतली जबाबदारी संभाळायला मुळींच कठीण गेलें नाहीं.

–आणखी एक मौज होऊं लागली. बिजू सर्वांचेंच ठाकठीक करी. पण त्या सर्वांत प्रसादची कामें करण्यांत तिची जास्त दक्षता दिसे! त्याचीं कामें करतांना तिच्या हौसेला विलक्षण ऊत येई! प्रसादला चहा घेण्याची मनांत इच्छा होई, त्याच वेळीं बिजू नेमकी त्याच्या पुढें चहाचा कप आणून ठेवी! धुतलेलें कपडे काढून ठेवायचे, मळलेले धोब्याला द्यायचे, बिजूला न सांगताच ती हें नेमानें उरकीं! त्याचे आवडते कपडे कोणतें, हें देखील तिला कळे! त्याला पाहिजे असलेले कपडे तिनें आणलें म्हणजे हें तिला कसें कळलें? असाच प्रश्न प्रसादाला पडे! त्याच्या उशाशीं पुस्तकें कोणती ठेवावयाचीं, हें देखील तिला उमगे. थोडक्यांत म्हणजे दोन्हीं हृदयाचे तारातरंग बिजू बरोबर जुळवी. ते जुळत! कां आणि कसें हें मात्र सांगणें कठीण होतें! बिजू प्रसादचेंच हृदयसिंहासन काबीज करीत होती. त्यांत तिला यश येत चाललें

होते ! हें आपलें कायमचें घर असें तिला वाटत होतें ! इकडच्या गंमतीजमती निष्कपटी भावानें, फुरसद सांपडली कीं ती आपल्या आईला पत्रानें कळवी.

सत्याग्रहाचा दिवस उजाडला ! अलोट गर्दीपुढें पंडितांचें सावेश, ओजस्वी आणि तेजस्वी भाषण झालें ! त्या अफाट समुदायाच्या प्रचंड सभेला प्रसाद उपस्थित होता ! वडिलांचें उत्कृष्ट व्याख्यान ऐकून प्रसाद थक्क झाला ! हें दिव्य–दैवी वडिलांचें स्वरूप त्याला यापूर्वीं पहावयाला मिळालें नव्हतें ! "तरुणांनीं देशसेवा केली पाहिजे. रणकुंडात उडी घेतली पाहिजे. प्रेम,प्रणय, काम, शृंगारचेष्टा म्हणजेच कांहीं जीवितांचें सारसर्वस्व नव्हे ! मीही तरुण होतों. मलाही प्रेमाच्या भावना होत्या! कामानें मीही विद्ध होत असे ! पण त्या सर्वांना ओलांडून, बाजूला सारून, परमेश्वरानें मला देशसेवा करण्याचें सामर्थ्य दिलें. तोच परमेश्वर तुम्हां तरुणांना देशसेवेची दिव्य स्फूर्ति देवो ! देश स्वतंत्र होईपर्यंत प्रेम कःपदार्थ समजण्याची धमक तुम्हांत निर्माण होवो ! राष्ट्रसभा तुमच्या कार्यानें धन्य, यशस्वी होवो !..." अशा अर्थाचें पंडितांनीं भाषण केलें ! भाषण संपतांच त्यांना पकडण्यांत आलें ! हंसतमुखानें ते अधिकाऱ्याच्या स्वाधीन झाले प्रसादाला आपण कोठें आहोंत, आपल्यापुढें काय चाललें आहे, याचें मुळींच भान नव्हतें ! त्या उदात्त प्रसंग दर्शनानें त्यावेळीं त्याच्या तोंडावरही दिव्य तेज झळाळत होतें !

---

# प्रकरण सहावें

अद्वितीय लावण्याची खाण मुमताज आपल्या सत्तेची झाल्यानें शहाजानाला जितका आनंद झाला नसेल, स्वर्गांगनातुल्य मस्तानीची प्राप्ति झाल्यानें थोरले बाजीराव पेशवे यांना जितकी धन्यता वाटली नसेल, स्वयंवराच्या मंडपांत नटून सजून उपस्थित झालेल्या अनेक देवांना डावलून सौंदर्यसंपन्न दमयंतीनें नळराजाला लग्नाची माळ घातल्यानें त्या राजराजेश्वराला जितकें आनंदानें अस्मान ठेंगणें झालें नसेल, त्यापेक्षां कितीतरी पटीनें शहाणी सावर्डेकराची विवाहमाला मनोहर देशमाने यांच्या गळयांत पडली, त्यावेळीं त्याला तीन त्रिभुवनांत न सामावणारें सौख्य मिळालें असें वाटलें! शहाणीच्या स्वरूपसौंदर्यावर लुब्ध होऊन ती आपलीशी व्हावी अशी महत्वाकांक्षा किती तरुणांनीं बाळगली असेल, किती तरुण तिच्यासाठीं दिवसच्या दिवस मनांत झुरले असतील, किती नवजवानांनीं तिच्याशीं ओळख पाडण्याचा प्रयत्न म्हणून तिला हरतऱ्हेची प्रेझेंटस् अर्पण करून,आपले तिच्यावरील प्रेम व्यक्त केलें असेल! ती आपली—कायमची—आपली व्हावी ही मनिषा अनेकांनीं व्यक्त केली असेल! असें असतां—आणि असें खात्रीनें होतें—ही माहिती मनोहर देशमान्याला कर्णोपकर्णी होती. ही शहाणी त्यापैकीं कोणा एकाचीही न होतां ती आपली झाली, तिच्या जीविताच्या सर्वस्वाचें आपण झालों, या जाणीवेनें मनोहरला जगज्जेत्याच्या तोलाचा आनंद कां होणार नाहीं ?

कोणीं कांहींहि तोंडानें बडबडो, प्रीतिविवाहाचें गोडवे गावो. मनाविरुद्ध झालेला विवाह पाहिला किंवा ऐकला म्हणजे त्याला खुशाल राक्षसविवाह

असें अभिधान देवो, मानसविवाह सर्वश्रेष्ठ ठरवो, किंवा 'शरीरसंबंध' या सदरांत पडणाऱ्या विवाहाचा तिरस्कार करो; पण बहुतेकांच्या विवाहाच्या बाबतींत शेवटीं जें व्हावयाचें असतें तेंच होत असतें आणि जें घडावयाचें असतें तेंच घडत असतें ! मनासारखें झालें असें वाटून आरंभीं जो हंसतो, त्याला शेवटीं रडायची वेळ येते आणि आपण चुकलों असा समज होऊन जो प्रथम उगाच रडतो–कुढतो, त्याला शेवटीं हंसण्यासारखी आपली वैवाहिक परिस्थिति आहे असेंही आढळून येत असतें.

चालू काळांतील सुविद्य तरुण मनोहर देशमाने ! त्याने आईला विचारलें नाहीं. बापाची पर्वा केली नाहीं. वडिलधाऱ्यांचा सल्लाही घेतला नाहीं. शहाणीला पाहिलें. बेहोष झाला. तिच्या आई–वडिलांनीं सूतोवाच केलें. गयावया केल्या, त्याला पाहिजे होतें ते झालें. तो कबूल झाला. जगांत स्वतःच्या पायावर उभा राहाण्यास समर्थ झालेला मनोहर विवाहसंबंधांत आपल्या कल्पनेपेक्षांही अधिक सौंदर्य आपल्याकडे चालून येत असलेलें पाहिल्यावर तें हस्तगत करून घेण्याच्या वेळीं कोणाची पर्वा कां करील ?

लग्न झटपट, थोडक्यांत, कसलाच गाजावाजा न करतां उरकण्यांत आलें! ताशे–वाजंत्रीं, पाहुणे–रावळे,भटाभिक्षुकांच्या पंक्ती,विहिणींचे मानपान, आरवणें मिरवणें, असल्या सनातनी थाटाला शहाणपणानें चाट दिला. वधूकडील मंडळींनीं, वधूच्या आंगाखांद्यावर वरानें सोन्यामोत्यांचे किती डागडागिने चढविले, याबद्दल चुकून देखील तक्रार केली नाहीं त्यांनीं ! समंजस पोक्तपणा दाखविला म्हणूनच वराकडील 'बडा घर पोकळ वासा' छपला जाऊन वरपक्षाची अब्रू बचावली ! जरी किनारी चार खंबायती पातळें, चार उंची रेशमी ब्लाऊज, दोन नक्षीच्या बांगड्या, एक मोत्यांचा गळ्यांतला सर, कानांतल्या इअरिंगची जोडी, बुचड्यांत घालायच्या बऱ्याचशा पीन्स, फुलांचे गजरे, या भरगच्च सामुग्रीवरच्च मनोहरनें आपलें मंगलकार्य उरकून टाकलें ! त्याच्या मनांतून खरें म्हणजे आपलें लग्न रजिस्टरच करावयाचें होतें; पण कां कोण जाणें, वधुपक्षानें वैदिक पद्धतीनें व्हावें अशी मनिषा व्यक्त केली. मनोहर त्याला मान्यता देता झाला !

हा विवाहसमारंभ डामडौलाचा, बेसुमार खर्चाचा, जुन्या पद्धतीचा झाला नाहीं. हें खरें असलें तरीही विवाहसमारंभाच्या वधूवरांच्या छायाचित्रासहित

भारी किंमतीच्या, फॅशनेबल कागदावर, सुवर्णांकित छापाच्या निमंत्रण पत्रिका ( समारंभाच्याच दिवशीं, किंवा त्याच्या दुसऱ्या दिवशीं सर्वांना पोंचाव्यात, अशा दक्षतेनें पाठविण्यांत आल्या असल्या तरी त्या छापण्यांत मुळींच कसूर करण्यांत आली नव्हती. ) काढण्यांत आल्या होत्या. तसेंच एकदोन वर्तमानपत्रांचें उपसंपादक वा वार्ताहर मनोहरच्या ओळखीचे असलेले विवाह समारंभास अगत्यपूर्वक उपस्थित होते, त्यांनीं अत्याग्रह केल्यावरून व अभिनंदनपर स्फुट लिहिण्याची खाली पटल्यावरून जाहिरातीच्या दरानें कां होईना, पण मनोहरनें आपलें व शहाणींचें छायाचित्र वर्तमानपत्रांत छापण्यासाठीं दिलें. समारंभ उरकतांच शहाणीच्या आईवडिलांना तांतडीनें कोंकणांत जावयाचें होतें; त्यांच्या सुखरूप प्रवासाची व्यवस्था करणें मनोहराकडेच होतें. तें त्यानें बिनबोभाट पार पाडलें.

अलीकडे, लग्न झाल्यानंतर वधूच्या हट्टामुळें तिचें नांव बदलण्यांत येत नाही. माहेरचेंच कायम ठेवतात, पण मनोहरनें शहाणींचें माहेरचें नांव सोडलें. आपल्या आवडीचें नवें नांव शोभना असें तिला दिलें. शहाणी सावर्डेकर आतां खरीखुरी सौ. शोभना देशमाने झाली ! 'शोभना नांव आवडलें का ?' असें एकदां हळूंच, वेळांत वेळ काढून, तिच्या कानाजवळ तोंड नेऊन मनोहर कुजबुजला ! तिनें आपली मूक संमति व्यक्त केली ! तिच्या चेहऱ्यावर त्यावेळीं कोणते विकार नाचून गेले हें बरीक त्यानें पाहिलें नाहीं.

घराची कळा आंगण सांगतें. सौंदर्य अंतरंगाची स्थूल कां होईना पण कल्पना देतें ! शहाणीच्या शरीररूप मंदिराचें शोभना नामकरण करून सार्थक केलें ! तिचें अंतरंग तो प्रत्यक्ष अजून पाहाणार होता ! बाह्यांगाइतकेंच अंतरंग दिलखुष करणारें असणार ! त्याला खात्री अशी असलीच पाहिजे !

'सरदार गृहांत' स्वतंत्र जागा घ्यावयाची. दिमतीला एक मोटार सतत ठेवावयाची. मजेंत मनमुराद काळ घालवायचा व आपला मधुचंद्र साजरा करावयाचा. हें त्यानें तडकाफडकी ठरविले होतें. अनुभव घेतलेल्या त्याच्या जिवलग मित्रांनीं त्याला त्या बाबतींत मनःपूर्वक प्रोत्साहन दिलें होतें. सरदार गृहांत राहायला, मोटार दिमतीला ठेवायला, तेथें घालविण्यांत येणाऱ्या कालांत अनुषंगीक अशा अनेक सुखसोयींचा मनमुराद उपभोग मिळवायला

जो खर्च येणार, त्याकरितां हात आखडतां घेऊन कसें चालणार ? मनोहर तसा कासकूस करणाऱ्यांपैकीं होता काय ? छट् ! मुळींच नाहीं ! अशा बाबतीत, अशा वेळीं ऋण काढून सण करण्याची पाळी आली तरी कोणता हौशी जवान कधीं मागें घेत असतो का ?

राक्षसविवाहाचा पक्का द्वेष्टा आणि मानसविवाहाचा कट्टा चाहता मनोहर, शहाणीला आपलीशी करून, तिच्या नितांत मधुर सौंदर्याचें यथेच्छ पान करण्यासाठीं मधुचंद्राच्या निमित्तानें निघायला कोण उतावीळ झाला होता ! जगाला, त्या दोघांचा दिलखुलास मधुचंद्र साजरा होणार असें दिसत होतें. मनोहरलाही जवळ जवळ तसेंच भासत होतें. पण तो त्याचा केवळ भासच नव्हता का ? उभयतांच्या शरीरसंबंधाची खरीखुरी सार्थकता करायलाच तो उतावीळ झाला नव्हता का ? अगोदर शारीरिक विवाह– राक्षसविवाह– आणि नंतर मानसिक विवाह हाच क्रम त्या विवाहाचा नव्हता का ? आणि असेंच नेहमीं घडत नसतें का ?



मनोहर देशमान्यानें आपला नवा संसार किती छान थाटला होता ! तो हौशी तसाच नव्या दृष्टीचाही होता. आपल्या वास्तव्यासाठीं, जो बंगला त्यानें निवडला होता, तो नवा नी टुमदार होता. बाहेरच्या लहानशा जागेंत नयनमनोहर असा रम्य बागही होता. खिडक्यांना सौम्य आकाशी रंगाचे पडदे, बसायच्या जागेंत देशी, विदेशी कलावंताच्या आकर्षक कलाकृति, सुंदर तऱ्हेच्या अभ्राच्छादित, कोच, खुर्च्या, कोपऱ्यांतील फ्लॉवरपॉटस् ठेवण्यासाठीं लहान, नाजूक, टेबलें; लिहिण्यावाचण्यासाठीं सुसज्जीत खुर्चीसह शोभिवंत टेबल, मच्छरदाणीसहित ऐटदार कॉट, या काळांत कोणालाही अत्यावश्यक असणाऱ्या मामुली बाबी ! आपल्या प्रेममय संसाराच्या आरंभी अशा गोष्टींत मनोहर कानाडोळा कां करील ?

रेडिओ नाहीं म्हणजे अरसिकतेची परिसीमाच म्हणावयाची ! आणि रेडिओ असला तरी ग्रामोफोन नसून कसें चालणार ? रेडिओचें किती झालें तरी परस्वाधीन जिणें ! कळ दाबतांच चारी खंडांतली गाणीं तो स्पष्ट– हरतऱ्हेचीं ऐकवील ! पण तीं त्याला वाटतील तीं ! ऐकणाराला हवीं

असतील तीं नव्हे! त्यासाठीं, आपल्याला लहर लागेल तीं गाणीं ऐकावयाला यावींत, याकरितां ग्रामोफोन नको का ?

आणि मग हार्मोनियमची उणीव भासल्याशिवाय कशी राहणार ?

आपल्या नव्या संसाराची सजावट, प्रेमाचे सुरेल संगीत पूर्णतेस नेण्या-करितां मनोहरनें, मनापासून केली होती ! त्यासाठीं शहाणीनें नव्हे, त्याच्या शोभनेनें– सुचविण्याची अगर हट्ट धरण्याचीही त्यानें वाट पाहिली नव्हती !

शोभनेला यत्किंचितही श्रम पडूं नयेत किंवा इकडची काडी तिकडे करावयाला लागूं नये, या करितांच नव्हे, पण दिवसरात्रींचा सारा वेळ दोघांना अगदीं जवळ– समोरासमोर, किंवा खेटून बसायला मिळून एक-सारखें हंसायला, बोलायला, थट्टामस्करी करायला, कोट्या प्रति कोट्या करा-यला, हितगुजायला मिळावें, म्हणून मनोहरनें एक वृद्ध, कामसू नोकर वर कामाला नेमला तो झाडलोट, धुणी, जेवणाचे डबे आणणें, उष्टी खरकटीं वगैरे सारें कांहीं सारें करी !

शोभनेनें दिवसांतून चार वेळां पातळें बदलावींत. केशभूषा करावी. तोंडाला पावडर फासावी वरचेवर जवळच्या आरशांत पाहून कांहीं कमी जास्त पहावें. बिघडलें असेल तर नीट करावें. मनोहरनें बोलावें तिनें हंसावें.

नव्या संसाराचा थाट यापेक्षां आणखी तो काय करावयाचा ? तो काय सनातन्यांचा जुन्या वळणांचा संसार मांडायचा असतो ? मुलगा रोजगारावर आपल्या बायकोला घेऊन गेला म्हणजे, दोघेहि अननुभवी म्हणून त्याच्या किंवा तिच्या आईनें काळजीनें त्यांच्याकडे यावें. भांडींकुंडीं किती कोणतीं लाग-णार, महिन्याचें धान्यधुन्य किती–कोणकोणतें आणावें, विळीपासून संसाराला लागतात त्या जिनसा आणाव्यात; ठेवरेव कशी करावी, महिन्याच्या मिळ-कतीच्या मानानें, संसार खर्च किती ठेवावा, कपडयालत्त्यावर किती पैसा वेंचावा, अगदीं नाहीं म्हणून शिल्लकसुद्धां कशीं किती मागें टाकावी, नेहमीं पदार्थ कोणते करावेत. पाहुणा आला म्हणजे तेवढयापुरतें बरें दिसण्यासारखें असे तेवढेंच देखाव्याचें कसें करावें, वागावें, या सर्वांचे प्रात्यक्षिक ज्ञान द्यावें आणि संसाराचा गाडा सरळ रस्त्याला लावावा. ही जुनी रीत ! वडील माणसांना नसती दगदग आणि उसळत्या रक्ताच्या उत्साही जीवाची फुकट कुचंबणा आणि पदोपदीं मानहानी आतां हवींत कशाला नी कोणाला ?

मनोहर त्या कसल्या भानगडींतच पडला नाहीं. आपल्या सासूबाईना, आईला बोलावण्याचा वेडाविचारच त्यानें केला नाहीं. आपल्यामध्यें त्याला कोणीच नको होतें.

शोभनेनें रंगरंगोटी करून, नटून सजून मऊ गादीच्या कोचावर नुसतें बसायचें ! मनोहरच्या दर वाक्याचें हंसून स्वागत करावयाचें. थंडी वाजल्या-सारखें जरा कोठें शोभनेचे गोंडस-मांसल शरीर कंप पावल्याचा भास झाला कीं, "काय शोभना, थंडी वाजतेय तुला ?" असें विचारून "गारठा जरा जास्तच सुटलाय आज" म्हणत मनोहरनें स्वतः उठून उघडी असलेली खिडकी लावून घ्यावी. त्या उलट जरा कुठें कंटाळून शोभना हुशहुश करतेशी दिसली कीं, "आज उकाडा फारच होतोय" म्हणत शोभनेला वारा मिळ-ण्यासाठीं उघडलीच खिडकी मनोहरानें !

आवडत्या बायकोला सुख-सुख द्यायचें असतें नवऱ्यानें म्हणजे हेंच नव्हे का ? तरुणीची इच्छा आणि आवड नवऱ्यानें आपल्याला असें वागवावें अशीच असते ना ? तसेंच मनोहर-शोभनेसारख्या प्रेमाच्या जोडप्यानें सिनेमा पहायला न जाऊन कसें चालेल ? सिनेमावाले तरी या असल्या मंड-ळींच्या सुखासाटींच ना आपल्या जिवाचा आटापिटा करतात ? त्यांनीं तसा खर्च करावा, अक्कल खर्च करावी आणि त्यांच्या श्रमाचें चीज या तरुण, होशी लोकांनीं करूं नये म्हणजे काय ?

बरोबरची स्नेही मंडळी सहकुटुंब भेटायला येताहेत, तासन् तास बसता-हेत, गप्पासप्पा, हास्यविनोद सारखा झडतो आहे, चहा-फराळाचा फन्ना उडतो आहे,धंद्याच्या बाबतींत लाख रुपयांची भाषा प्रत्येकाच्या तोंडीं चालते आहे नोकर त्यांच्या सेवेला राबतो आहे-स्नेह्यासोबत्यासाठीं खिशाला खार लावून नको घ्यायला ? गांठचें सोडल्याशिवाय शाबासकीचा हात कोणकोणाच्या पाठीवर ठेवणार आहे या जगांत ? मनोहर खर्चाला कसूर करीत नव्हता ! पुढची चिंता तो मुळींच बाळगीत नव्हता ! तशी चिंता बाळगणें म्हणजे आधुनिक काळांत वागायची लायखी नी पात्रता नाहीं, असा बिनशर्त कबुली जबाब लिहून देण्यासारखें नाहीं का ?

एकादें जुने अनुभवी सनातनी खोड या तरुणांच्या लाखाच्या कोरड्या आणि त्या दुसऱ्याच्या व्यवहाराबद्दल गोष्टी ऐकून "लाख पचोत्री या

गोष्टी करतात का हे दीड शहाणे ?" असें म्हणायचा ! पण असा सनातनी नव्या शहाण्या लोकांच्या जमान्यांत जातोच कशाला अगोदर ?

या असल्या किंवा दुसऱ्या कोणत्याही विषयावरील बोलण्याकडे शोभनेचें लक्ष असें कीं नाहीं कोण जाणें ! बोलण्याच्या भरांत तिचें लक्ष आहे का ? तिला तें आवडतें का ? याकडे मनोहरचें तरी अवधान असें थोडेंच ? मधूनच तो तिच्याकडे पाही, ती हंसरे तोंड करी, इतकेंच ! मनोहर-शोभना किंवा त्यांच्यासारखीं तरुण जोडपीं जामानिमा करून, सकाळीं फिरायला म्हणून, दुपारीं ओळखीच्या ठिकाणीं भेटायला म्हणून, संध्याकाळीं सिनेमा-शोला म्हणून, रात्रीं नाटकाला किंवा एकाद्या दे. भ. च्या व्याख्यानाला म्हणून, रस्त्यांतून जातांना दिसलीं म्हणजे, कित्येकाना अचंबा वाटतो ! "आतां या बायका ! घरीं असतात केव्हां या ? घरांतलीं कामें करतात केव्हां ? आणि आपला संसार चालवितात कसा ? कीं या साऱ्यांच्या घरीं नोकरचाकर, दासदासी आहेत ? नी तीं राबतात ? हे एकजात लक्षाधीश—कोट्याधीश तर नाहींत ? असें आहे तर मग लोक आपला देश दरिद्री आहे, अशी एकजात ओरड करतात ती का ?" असे चमत्कारिक प्रश्न कित्येकजण आपले विचारींत सुटतात ! पण त्या प्रश्नांचीं उत्तरें त्यांना मिळूं शकत नाहींत.

• • •
• • •

मनोहरनें आपल्या नव्या संसाराचा मांड मांडल्यापासून, तासामागून तास, दिवसामागून दिवस भराभर जात होते. शोभनेला मनोहर हृदयाशीं धरीत होता ? हातावर फुलासारखी झेलीत होता. केतकीच्या झाडाला नागानें विळखा घालून बसावें, हिरव्या चाफ्याच्या किंवा नागचाफ्याच्या वृक्षाजवळ त्या त्या फुलांच्या सुगंधानें धुंद होऊन डोलत रहावें, स्वतःला पार विसरून जावें, तसेंच हुबेहुब मनोहरचें झालें होतें. आपणासारखें आपणच या जगतींतलावर सुखी ! आपलें भाग्य अतिशय मोठें म्हणूनच शोभनेसारखीं लावण्यलतिका आपली झाली आहे, या भावनेनें आणि दृष्टीनें जगाकडे मोठ्या अभिमानानें मान उंचावून, छाती उन्नत करून तो पाहात होता ! पण शोभना ?

— बिचारी शोभना ! परिस्थितीनें तिच्यापासून प्रसादला दूर केलें आणि मनोहरचा तिला वेध लागला. त्याच्याशीं लग्न ठरल्यापासून तिला आपला मुखवटा बदलणें भाग पडलें. लग्न ठरलें; झालें. पहिल्याला विसरायचें आणि

दुसऱ्याशीं समरस व्हायचें ! किती कठीण, किती अवघड ! शहाणीला प्रसाद मनापासून आवडूं लागला होता ! शोभनेचा मुखवटा चढवून मनोहर आवडता आहे, अशी मनाला शिकवणूक द्यावयाची होती. मनाची घडण तशी घडवावयाची होती तिला !

स्त्री, हें कधींही, कोणालाही, केव्हांही न सुटणारें एक बिकट कूट आहे, असें म्हणतात. शहाणीच्या मनोमंदिरांत प्रसादनें प्रवेश मिळविला होता. हक्कानें आणि प्रेमानें कांहीं काल तो तिथें स्वच्छंदानें वावरला होता ! त्याचें त्या मंदिरांतील वास्तव्य अजून निःशेष झालें नव्हतें ! आणि अखेरपर्यंत निःशेष होणार होतें कीं नाहीं, कोण जाणें ! जुन्या वाड्याला नवा रंग देऊन, त्यांत नवीन राजाची राजवट सुरू होते; त्याप्रमाणें शोभनेच्या मनोमंदिरांत लग्नाच्या अधिकारानें मनोहर प्रविष्ट झाला होता ! आपल्या आधीं त्या मंदिरांत कोणी विहार करून गेलेंही असेल, हें मनोहरला कसें समजणार ?

स्त्रियांची जात जवळ जवळ फुलासारखीच ! कितिकांनीं आपल्याला हुंगलें असेल, हें फुलांना सांगता येत नाहीं. स्त्रियांना वाचा असून बोलतां येत नाहीं. तसें बोलणें केवढ्या अनर्थपाताला कारणीभूत होत असतें ! एकावर प्रेम असून दुसऱ्याशीं लग्न होतें, लग्नानंतर नवऱ्याशीं समरस होण्याची, पूर्वीचे ऋणानुबंध पार विसरून जाण्याची शक्ति पुरुषापेक्षां स्त्रियांतच निसर्गतः जास्त असते कीं काय कोणास ठाऊक !

मस्तकावर लग्नाच्या अक्षता पडल्या कीं स्त्रिया अंतर्बाह्य बदलून जातात. आपल्या पतीला देवस्वरूपांत पाहाण्याची दिव्य दृष्टि त्यांना प्राप्त होते ! लग्न होतांच शोभना तशी एकदम पुष्कळच बदलली ! खेळकर होती, ती गंभीर बनली. वाचाळ होती ती मुकी झाली. हंसरी होती—लग्नानंतर मनोहरच्या बोलण्यानेंही ती हंसत असेच—पण तिचें पहिलें, मोकळेपणाचें स्वच्छंद, निर्मळ हास्य लग्नानंतर लयाला गेलें यांत शंकाच नव्हती ! मनोहरच्या जीवनाशीं आपल्या जीवनसरितेचा प्रवाह मिळवून, दोघांनीं एकरूप होऊन जावें, अशासाठीं मात्र तिची अहोरात्र एकसारखी धडपड चालू होती.

उलट मनोहरला तिच्या त्या अवस्थेची कांहींच जाणीव नव्हती. तशी जाणीव झाली असती तर त्यानें लग्नाच्या बंधनानें तिचा स्वीकार केला असताच, याची खात्री कोणाला होती ? लग्न झालें म्हणून क्षणमात्र सुटकेचा

श्वास शोभनेनें सोडला असेल नसेल, तोंच जें झालें, जें केलें, तें समजून-उमजून, कळून सवरून झालें असतें, तर बरें झालें असतें. रहस्याचा स्फोट पुढें झाला आणि त्याचा परिणाम विपरीत झाला तर ? ही नवी धास्ती तिच्या हृदयांत घर करून बसली !

कुमारीमातेच्या विचित्र जिवनाला कायद्याचें संरक्षण आणि त्या संरक्षणाला नीतिमान समाजाच्या उदारपणाचें साह्य असतें, पाठिंबा मिळता, तर शोभनेनें प्रसाद नाहीं तर मनोहर पत्करून चालूं जिणें जगविण्याचें मनांतच आणलें नसतें ! स्वतंत्रतेच्या जिविताचा मार्ग स्वखुषीनें आणि आनंदानें पत्करला असता ! पण तसें नाहीं म्हणूनच ती आज निराळा मुखवटा चढवून मनोहरच्या घरीं आपण अतिशय आनंदांत– सुखांत आहोंत, हें दाखवून देण्याची तारेवरची अवघड कसरत करीत होती ! आपल्या मनोधर्माविरुद्ध भूमिका, साजसजावटीनें आणि मेहनतीनें रंगभूमीवर असो कीं रजतपटावर असो, सविकल्प समाधीचा योग आत्मसात् करून, यशस्वीपणानें करून दाखविणारा नट आपण पहात नाहीं का ! तीच भूमिका शोभनेची मनोहरच्या घरीं चालूं होती ! स्त्रियांच्या भूमिका स्त्रियाच बेमालूम वठवूं शकतात, हें निदान संसार नाटकांत तरी शंभर टक्के सत्य आहे ! तो हंसला कीं तिनें हंसावें, तो बोलला कीं सावधपणानें त्याला आवडणारें चटकन् उत्तर द्यावें, बाहेर चलूं या म्हणतांच त्याला पसंत पडणारा पोषाख करून त्याच्यापुढें तयार रहावें, अशा तऱ्हेच्या वागण्यांत शोभना कसूर करीत नसे ! 'जमलें' अशी जाणीव झाली कीं समाधान व्हावें ! केव्हां कांहीं चुकलें असें उगीचच वाटून तिची विलक्षण तारंबळ उडावी ! शरीरसंरक्षणासाठींच नव्हे तर सौंदर्य संगोपनासाठीं, निष्क्रीय राहूं नये, श्रम केले पाहिजेत, म्हणून मनोहर शोभनेला टेनीस खेळायचा प्रेमळ आग्रह करी. तीही तयार होई ! एकल्याशा खेळानें ती किती दमून जाई ! घामानें निथळून निघे.तिच्या सुंदर मुखमंडलावर घर्मबिंदूंच्या मोत्यांची आरास थाटलेली पाहण्यांत मनोहरास – कोण धन्यता वाटे ! मनोहरची मर्जी सुप्रसन्न ठेवण्यासाठीं शोभना–तिच्याकडून होत नसतांही–त्याच्या संगतीं सारे निमूटपणें खेळ खेळत असे !

तिची भीड चेपली होती. मनमोकळेपणा बराच वाढला होता. त्याच्या कोणत्याही हुंकाराला ती हुंकार देऊं लागली होती. पण तिच्या हृदयाच्या एका

कोंपऱ्यांत धास्तीचें ठाणें कायमच होतें. “ हें आपल्याला ठाऊक आहे का ? हें समजल्यावर आपण माझा तिरस्कार तर करणार नाहीं ना ? ” मनोहरला असें एकदां स्पष्ट सांगून आपण कायमचे निर्धास्त व्हावें, असें तिच्या कितीदां तरी मनांत येई. शब्द ओंठावर येत. पण तें तसेंच ओंठावरून परत पोटांत जाऊन गडप होत ! उच्चारावयाला तिला धाडसच होत नसे !

मनोहर तिच्याकडे प्रेमभरानें अनिमिष लोचनानें किती वेळ तर पाहात राही. त्याचा शुद्ध हेतु शोभनेच्या स्वर्गीय सौंदर्याचें आकंठ पान करण्याचा असे. पण तिला वाटे, आपल्या डोळ्यावाटें, आपल्या अंतःकरणांत शिरून तिथला रहस्यमय लेख तो वाचणार आहे ! तिची घाबरगुंडी होई ! तिचे डोळे आपोआप जमिनीकडे पाहूं लागत ! कुठेंतरीच तिचें लक्ष लागून रहावें ! कुणीकडे तरी तिनें एकसारखें पहात रहावें ! रेडिओवर एकादें सुंदर गाणें चालू असावें. मनोहरनें तिला मध्येंच विचारावें, “ शोभना, कसें आहे गाणें ? ” शोभनेनें भानावर येत असता. “ अं ? काय ? छान आहे ! ” असें घाबऱ्या आवजांत उत्तर देऊन आपल्याला कसेंबसें सावरावें.

अशी त्रेधा शोभनेची वारंवार का होई ? प्रसादची स्मृति तिला छळीत असेल का ? एकादे वेळीं आपल्याला प्रसाद हांक मारीत आहे असा तिला भास होई !

मनोहर आपल्याच तंद्रींत असला, त्याचें लक्ष शोभनेकडे नसलें, म्हणजे सर्व शक्ति डोळ्यांत आणून शोभना त्याच्यावर आपली दृष्टि खिळवून ठेवी ! मनोहर नांवासारखाच मोहक, प्रसादइतकाच तरुण, त्याच्यापेक्षांही हौसी. त्याच्याहून शतपटीनें देखणा होता. शोभनेला हें दिसत होतें, पटत होतें; प्रसादला विस्मृतीच्या अंधेरांत दडविण्याचा आणि मनोहरला हृदयसंपुटांत सांचवून ठेवण्याचा कोण तिचा अट्टाहास एकसारखा चाले !

एके दिवशीं टेनिसच्या खेळाचे श्रम तिला सहन झाले नाहींत. ती थकली. दमली. जवळ जवळ बेशुद्ध झाली. मटकन् तिनें बैठक मारली ! मनोहर घाबरून धावतच तिच्या जवळ आला ! अलगत फुलासारखी हातावर झेलून त्यानें तिला आपल्या बंगल्यांत नेलें ! प्रकृति दाखविण्यासाठीं ताबडतोब नोकराला पिटाळून डॉक्टरला आणविलें. डॉक्टरांनीं शोभनेची प्रकृति पाहिली. नाडी तपासली. मनोहर घाबरला होता. डॉक्टर काय सांगतात, हें

पाहात होता. डॉक्टर निष्काळजी दिसले. त्यांच्या तोंडावर मंदस्मित झळकलें! त्यांनीं हंसून मनोहरला म्हटलें, "मनोहर, आपल्या मिसेस्‌ला यानंतर कांहीं काळपर्यंत तरी खेळण्याचे श्रम देऊं नका! काळजी करूं नका! आपल्या घरांत लवकरच मूर्तिमंत आनंद नाचूं बागडूं लागणार आहे!"

मनोहर उमगला. आपल्या प्रीतिसंगमावर, प्रेमाचें सुंदर पुष्प लवकरच फुलणार! काय मजा आहे! काय ईश्वराची कृपा आहे! मनोहरला गगनाधिक आनंद झाला! शुद्धीवर येत असलेल्या शोभनेनें डॉक्टरांचे शब्द ऐकले होते. त्याचा अर्थ तिला समजला. पण त्याबरोबर तिला पुन्हा भयंकर भीतीच्या धसक्यानें घेरी आली! आपलें गुपित— आपलें रहस्य बाहेर आलें! आतां पुढें कसें? ती डोळे मिटून बाह्यतः निश्चेष्ट पण आंतून खवळलेल्या तुफान दर्याप्रमाणें गत होऊन अंथरुणावर मुकाट्यानें पडली होती!

डॉक्टर गेल्यावर मनोहरनें शोभनेच्या कानाजवळ आपलें तोंड नेऊन अत्यंत प्रेमळ शब्दांत हलकेंच कुजबुज केली, "शोभना, घाबरूं नकोस! आनंदाची वार्ता आहे! आपल्या घरीं लवकरच गोजिरवाणं बाळ खेळूं लागणार आहे!" लग्नानंतर दुसरा आणि खरा समाधानाचा निश्वास सोडायला मिळत आहे, असें शोभनेला वाटलें! ती सावकाश उठून बसत होती! मनोहर तिला हलूं नको म्हणत होता! शोभनेच्या संसाराचें गाडें येथपर्यंत येऊन ठेपलें होतें!



# प्रकरण सातवें

" *ज्यानें विठ्ठल मात्रा घ्यावी । त्यानें पथ्यें संभाळावीं ॥* "

संताच्या या अजरामर उद्गारांतील सनातन सत्तत्व कसें सर्व विषयावर सारखेंच लागूं पडत असतें पहा !

शोभना रहात होती त्या जागेच्या जवळच एक नवीन बिऱ्हाड नुकतेंच आलें होतें. दोन जीव. एक पति, दुसरी पत्नी. दोघेही तरुण. तरुणाला फेपरें येण्याचा विकार जडला होता. दिवसांतून वीस-पंचवीस वेळादेखील फिटस् यायच्या. त्यांतून आणखी किती तरी व्याधि, अहिमहिरावणांच्या एका रक्ताच्या बिंदू पासून लाखो राक्षस निर्माण व्हावेत, त्याप्रमाणें त्याच्या उद्भवल्या होत्या; वाताचा झटका आला म्हणजे, स्वारी स्वतःच्या प्राणाची पर्वा न ठेवतां, गाडया, सायकली, मोटारी, यांच्या गर्दीतून धावत सुटायची ! त्याला संभाळण्याचें अति तापदायक काम त्याच्या अर्धांगीशिवाय, बिनबोभाट, शांतपणानें दुसरें कोण पार पाडणार रोज रोज ?

ती तरुणी पण तशीच होती. दिसायला इवलीशीशी. जरा अशक्तच. पण ती आपल्यां प्रिय पतीच्या संरक्षणासाठीं नी सुरक्षिततेसाठीं, त्याच्या संगतीं एकसारखी छायेप्रमाणें असायची. कधीं रागावणें नाहीं, चिडणें नाहीं, कीं रडणेंसुद्धां नाहीं. तो चवताळला, हाणमार करूं लागला, तरी तिचे हंसत मुख ! मधुर, सहानुभूतियुक्त प्रेमळ शब्द असायचे. तिचा त्याच्याशीं वागण्यांत कधीं फरक असायचा नाहीं.

लग्नापूर्वी त्या तरुणाला फिट्स् येतात, हें त्या तरुणीला ठाऊक होतें. एरव्हीं मुलगा चांगला. त्याची आई, बाप, भाऊ, सर्व मंडळी म्हणजे नुसतीं देवमाणसें ! त्या तरुणाचें तिच्यावर प्रेम बसलें. त्या तरुणीनेंही त्याला प्रेमानें — मनानें वरलें ! त्यांचा तो खराखुरा मानस–विवाहाच होता म्हणाना !

विवाहानंतर कांहीं काल सुखाचा गेला असेल, नसेल; पण कांहीं कालानंतर त्या तरुणाच्या प्रकृतीचें बस्तान भयंकरच बिघडलें.

आपल्या माथीं सारी जिम्मेदारी घेऊन चांगल्या हवेच्या ठिकाणीं तिनेंच आपल्या पतीला आणलें होतें. प्रारब्ध–भोग म्हणून त्या तरुणाच्या हृदयविदारक हालअपेष्टा चाललेल्या दिसत असतच. पण त्याच्या इतक्याच–किंबहुना त्याच्याहीपेक्षां लाखपटीनें अधिक हालअपेष्टा त्या अश्राप पोरीच्या होत होत्या !

प्रेमस्वरूपी पांडुरंगाची मात्रा तिनें घेतली होती. म्हणूनच तिनें आपल्या प्रेमळ संसाराची आगगाडी इच्छीत स्थळीं सुखरूप दाखल व्हावी म्हणून— जगानें पाहून आचंब्यानें तोंडांत बोट घालावें — अशा प्रकारचीं अनेक खडतर पथ्यें संभाळलीं होतीं.

मनोहर आपल्या मित्राबरोबर कामाकारणें बाहेर पडला म्हणजे शोभना सहज करमणुकीकरितां दारांत उभी राही ! त्यावेळीं तिच्या समोरून वाताचा प्रकोप झालेला शेजारचा तरुण धावतो आहे, त्याला संभाळून घरीं परत आणण्यासाठीं तरुणीही त्याच्यामागें पळते आहे, कसेंबसें त्याला आंजारून–गोंजारून, घरीं घेऊन येते आहे, हीं हृदयाला धक्के देणारीं दृश्यें शोभनेला पाहायला मिळत असत ! त्या तरुणीची शोभनेशीं ओळख झाली. दोघींचीं बोलणीं होऊं लागलीं. तिच्याकडूनच त्यांची साद्यंत करुणाजनक हकीकत तिला समजली ! तरुणाबद्दल कींव आणि तरुणीबद्दल करुणा शोभनेला किती वाटली असेल, त्याची कल्पनाच कोणाला येणार नाहीं ! त्या जोडप्यांच्या तुलनेनें आपण किती किती सुखी आहोंत, या जाणिवेचा हळूवार शोभनेला पुष्कळदां झाला नसेल असें होईल का ?

मनानें एकदां संकल्प सोडला म्हणजे स्त्रिया आपल्या ध्येयाशीं, धोरणाशीं आणि आचरणाशीं अलौकिक एकनिष्ठता राखतात ! त्यांच्या मानानें पुरुष ? एकनिष्ठ राहणारे, शरीर व मन राबवणारे कांहीं पुरुष नसतील असें नाहीं. असतील ! पण स्त्रियांच्या मानानें फार थोडे ! प्रेमरूपी विठ्ठलाची मात्रा

घ्यावीही स्त्रियानींच आणि त्याकरितां अवघड पथ्यें संभाळावींही स्त्रियानींच ! —आपल्यावरील प्रेमाकरितां मनोहरानें प्रेमरूप विठ्ठलमात्रा चाटली आहे— पण आपलें पुढचें सारें आयुष्य साजरें-गोजरें जावें, म्हणून त्याला आवश्यकता निर्माण झाली तर, जरूर तीं पथ्यें संभाळील का तो ? कुणी नेम सांगावा ? बोलून चालून पुरुषाची जात !

असे शोभनेच्या मनांत विचार येत. तिच्या मनाची चलबिचल होऊन जाई ! आपल्या बिघडवून घेतलेल्या प्रकृतीच्या स्वास्थ्यासाठीं मनोहराच्या कायम सहवासाचें आपण औषध घेतलें आहे, तें पचनीं पाडण्यासाठीं आपल्याला समजतात, ती पथ्येंही आपण चालविलीं आहेत ! मग काळजी कसली ? मनोहर आपला तोल सुटूं देईल का ? नाहीं वाटत ! तसा तो किती चांगला आहे ! राजवाड्यांतल्या ऐश्वर्यांत लोळणाऱ्या राणीलासुद्धां आपल्यासारखें सुख मिळत नसेल ! शेजारचा तरुण बरा होईल. ती तरुणी यशाची धनीन होईल. आपण निर्वेध होऊं. मनोहर यशाचा मान मिळवील !

शोभनेच्या विचारांची धांव येथेंच थांबे ! आजाऱ्यानें पथ्य संभाळलें, तरी जवळचीं मायेचीं माणसें, कळून-नकळूनसुद्धां खायला घालतात. कुपथ्य होतें. आजार विकोपाला जातो ! असल्या गुतागुंतीची शोभनेला कल्पना नव्हती. त्याचा फारसा विचारही ती करीत नसे.

शेजाऱ्याचा परिणाम शोभनेवर एकंदरींत वाईट होऊं लागला ! तिला तें पहावेंना, शेजारी बाधक होतो तो एकाच तऱ्हेनें का ? नाहीं ! चांगला असला तरी बाधतो ! वाईट असला तर मग विचारायलाच नको ! शोभना आजारी पडूं लागली. आधींच अवघडलेला जीव. दोन जिवांचा भार ! आणि त्यांत मनाबरोबर शरीराचाही आजार !

मनोहरानें ठरविलें, आपला बंगलाच वाईट आहे. हवा चांगली नाहीं. शोभनेच्या सुखासाठीं त्यानें बंगला बदलण्याचें ठरविलें. लगेच बंगला बदलला. मूर्खांनीं बंगले बांधावेत आणि शहाण्यांनीं त्यांत राहायला जाऊन त्यांचा उपयोग घ्यावा !

केवळ शोभनेच्या जीवासाठींच नाहींतर आपल्या लहरीखातर मनोहरनें किती थोड्या वेळांत कितीतरी बंगले बदलण्याचा चमत्कार केला. त्याला तो एक छंदच होता !

बंगल्यासारखा मनोहरला एकाद्या वेळीं आपलाही असाच कंटाळा तर येणार नाहीं ? कंटाळलेल्या बंगल्याला तो सहज सोडतो तसा तो आपल्यालाही सोडणार नाहीं का ? असे किंवा अशासारखे विचार शोभनेच्या मनांत येत. तिचा नुसता थरकांप होई ! अधु झालेल्या मनाची अवस्था अशी न होईल तरच आश्चर्य ! मनोहर शोभनेशीं प्रामाणिकपणानें वागत होता. आपल्या वंशाच्या विस्ताराचीं चिन्हें दिसतांच त्यानें आनंद व्यक्त केला होता. शोभना तशी त्या वेळेपासून बरीच निर्भय झाली होती. पुष्कळच निःशंक वागूं लागली होती तरीही तिच्या जिवाची धाकधुक् अजिबात मात्र नाहींशी झाली नव्हती ! कुठें काय कसें खुट् होईल आणि त्याचा शेवट केव्हां काय होईल, अशी धास्ती तिला वाटेच ! तशी धास्ती आंतल्या आंत दडविण्याचा सराव मात्र तिला आतां चांगला झाला होता !

पण तिचे दिवस भरत आले होते. मूळ सौंदर्य कितीही सुरेख असलें म्हणून काय झालें ? गर्भारपणीं स्त्रियांच्या शरीराचा डौल बदलतो. तें बेरूगळ दिसायला लागतें ! अंगकांतीही फिक्कट होते. तोंडावरचें तेज राहात नाहीं. डोळ्याखालीं काळसरपणा पसरतो. आकर्षक नेसण्यांत एकादी ललना कितीही पटाईत झाली तरी, त्या दिवसांत, तिला त्यांत आकर्षकता आणणेंच शक्य नसते ! त्या स्थितींत हंसू येण्यासारखें ध्यान दिसूं लागतें ! ज्यांना हें कळतें आणि शक्यता असते त्या गर्भवती तरुणी पुढें पुढें फारशा बाहेरच पडत नाहींत. आपलें प्रदर्शन कोणीं पाहायला नको आणि लोकांनीं आपल्या ह्या सोंगाला हंसायलाहि नको असें वाटत असतें त्यांना.

आरशासमोर उभी राहून शोभना स्वतःलाच निरखीत होती एकदां. पोटीं येणाऱ्या भावी अपत्याच्या आनंदानें मनाच्या एका कप्यांत तिला आनंद उसळतो आहे याची जाणीव आली, तरी आपलें देहसौंदर्य बेंगरूळ दिसतें आहे हें तिला दिसलेंच. मनोहर आपल्या सौंदर्यावर लुब्ध आहे. आपलें सौंदर्य आपल्याच डोळ्यांना कसेसेंच दिसतें, पाहूं नयेसें वाटतें. तर मनोहरला काय वाटत असेल ? विपरीत विचारांनीं तिला भिवविलें ! ती आरशापासून पटकन् दूर झाली !

  

आपला शत्रू अमूक, तो आपल्यावर अमूक बाजूनें चाल करून येणार,

अमूक प्रकारच्या शस्त्रांनीं आपल्याला घायाळ करणार आणि त्याचा यशस्वी प्रतिकार आपण जागरूततेनें केला पाहिजे, असें ठरवून सावध राहिले तरीसुद्धां आपल्याला नवाच-ध्यानींमनीं नसलेला शत्रू, अचानक, निराळयाच, दुर्लक्षित ठिकाणाहून अचानक प्रगट होतो आणि आपल्यावर प्राणघातक हल्ला करतो. त्याचा प्रतिकार आपल्याला करतां येत नाहीं. आपण अगतिक होतों आणि निरुपायानें आपल्याला पराजयाला पात्र व्हावेंच लागतें.

एक दिवस शोभनेच्या नांवाचें पत्र पोष्टाच्या शिपायानें टाकलें. पाकिट होतें तें. भलें जाडजूड आणि ' शहाणी सावर्डेकर, ' या नांवावर ! अक्षर अनोळखीचें. तिच्या माहेरचीं पत्रें-किंवा शोभनेच्या पत्राचीं-उत्तरें अधूनमधून येत. तें अक्षर मनोहरच्या माहितीचें झालेलें आणि शोभना या नांवानें पत्रें येत असत. पत्र आलें तें मनोहरच्या इतर पत्रांबरोबर, मनोहरच्याच हातांत ! असेल एकाद्या शोभनेच्या कॉलेज मैत्रिणीचें ही मनोहरची सरळ कल्पना. दोघांत आडपडदा उरला नव्हता. मनोहरनें औत्सुक्यपूर्ण कुतुहलानें पत्र फोडलें आणि जरा अधिऱ्या आनंदानें वाचायला सुरवात केली.

तो तें पत्र जसजसें वाचूं लागला, तसतसे त्याचे मनोविकार बदलूं लागले. उत्सुकता मावळूं लागली. आनंददायक कुतुहलाचे रूपांतर त्रासदायक तिरस्कारांत होऊं लागलें. मुद्रा फिरूं लागली. राग, त्वेष, मत्सर, इत्यादि विकारांनीं आजपर्यंत मनोहरच्या मनांत ठाणें देऊन बसलेल्या निर्भेळ आनंदाला हुसकून देण्याचा चंग बांधला !

पत्रलेखक हा 'प्रसाद' कोण ? त्याचा आणि आपल्या शोभनेचा संबंध काय ? इतक्या सलगीचें आपुलकीचें पत्र तो शोभनेला कां लिहितो ? शोभनेच्या बोलण्यांत प्रसाद या नांवाच्या प्राण्याचा उल्लेख आजपर्यंत कधीं कसा झाला नाहीं ? शोभनेनें त्याला यापूर्वी आपल्याला न कळत कांहीं पत्रें लिहिलीं असतील काय ? अति स्नेहः पापशङ्की ! हेंच खरें !

होय, तें प्रसादचेंच पत्र होतें. त्यानें आपल्या शहाणीला पहिलें आणि अखेरचेंच तें पत्र लिहिलें होतें. ती दुसऱ्याची – मनोहरची-कायमची झाली आहे, हें त्याला कळलें होतें. आतां तिचें आपलें पूर्वीचें नातें बदललें आहे हेंही त्याला चांगलें माहित होतें.

पत्र लिहिण्याच्या पाठीमागचा प्रसादचा हेतु तसा कांहीं वाईट नव्हता.

तिचें लग्न झालें, ती आपल्या पतिगृहीं गेली, याबद्दल प्रसादनें त्या पत्रांत तिचें व तिच्या पतीचें हार्दिक अभिनंदन केलें होतें. अभीष्टही चिंतिलें होतें. त्याच्या व तिच्या पूर्व सहवासाचा जिवंत चित्रपट त्याच्या डोळ्यापुढें नाचत होता. तसाच शहाणी आपल्या मनश्चक्षूपुढें आणीत असेल, ही त्याची कल्पना ! आपल्याबद्दल पुढेंमागें कोणीतरी हितशत्रू तिच्या पतीच्या मनांत भलतेंच वीष ओतील, तो तिच्या पुढच्या आयुष्याची माती करील, तसें होऊं नये; त्यानें निर्धास्त व्हावें, शहाणीनें निःशंक राहावें, या भावनेनें प्रेरित होऊनच प्रसादनें तें पत्र लिहिलें होतें. कदाचित् आपल्या दोघांबद्दल उडालेली खळबळ शहाणीच्या पतीच्या कानावर गेली असेल, शहाणीनेंही योग्यशा शब्दांत सांगितली असेल, त्यालाही आपली पुष्टी मिळावी, असेंच दर्शविण्याची प्रसादनें आपल्या पत्रांत मजकूर लिहितांना मोठ्या मार्मिकतेनें आणि सहृदय-तेनें बुद्धि ठेविली होती !

द्रुपद राजानें द्रौपदीचें स्वयंवर मांडलें, देशोदेशीचे राजे धावले, द्वारके-हून कृष्णही निघाला. वाटेंतच त्याला कळलें कीं आपला मित्र अर्जुनही स्वयंवराला जात आहे. द्रौपदी अर्जुनाला मिळावी अशा बुद्धीनें कृष्णानें आपला बेत बदलला. आपली गृहिणी–सहचारिणी–द्रौपदी, असा तिच्याकडे पाहण्याचा कृष्णाचा पहिला दृष्टिकोन होता, तो बदलून, त्यानें तिच्याशीं पवित्र भगिनीचे नातें जोडलें. प्रसादनें आपल्या पत्रांत वरील कल्पना मोठ्या हळूवार हातानें मांडून, मनोहर आपल्याला अर्जुनाप्रमाणें आहे, शहाणी ही आपल्या भगिनीप्रमाणें झाली, असें सूचित केलें होतें. खरें प्रेम असल्याशिवाय असें कोण कोणाशीं वागेल ? आपण परस्परांना दुरावलों, याबद्दल वाईट वाटलें तरी त्या विचाराला आपण कशी मुरड दिली आहे, हें शहाणीला चांगलें समजावें म्हणून प्रसादनें त्या आपल्या पत्रांत,

*यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महोदधौ ।*
*समेत्यच व्यपे यातां तद्वत् भूत समागमाः ॥*

या श्लोकाचा उल्लेख करतांना, आपलें कॉलेजचें आयुष्य, भराऱ्या काय असत; त्या भ्रामक कशा असत; जग पुढें जात आहे., आपण त्याच्या बरोबर बेगुमान कसे जात आहोंत, तें कसें खोटें ठरतें, जग जिथें असायचें तिथेंच असतें आणि तें तसेंच असणार, वगैरे वगैरे पुष्कळच लिहिलें होतें.

मानसविवाहाचें स्तोम आपण कसें माजवीत होतो, इतर सर्व विवाहपद्ध- तींना राक्षसविवाहाच्या सदरांत ढकलून, त्याची हुर्रेवडी कशी करीत असूं, त्या वेळच्या अशा पोरकट बुद्धीवादाची थट्टा प्रसादनें पत्रांत केली होती. आप- ल्याप्रमाणें शहाणीही त्या वेळच्या सगळ्याच विषयांची तशीच थट्टा आतां करीत असेल याबद्दल आपणच निर्वाळा दिला होता.

प्रसादचें पत्र शुद्ध हेतुचें खरें, तिच्या संसारांतील मार्ग निष्कंटक, निर्मळ राजरोस रहावा अशीच त्याची इच्छा, पण तें तसें झालें नाहीं. मनोहरला तें पत्र अखेरपर्यंत वाचवेना आणि वाचल्यावांचून गत्यंतरही वाटेना ! कसेंबसें तें पत्र वाचलें त्यानें ! मनोहर सुशिक्षित, सुसंस्कृत, पुरोगामी विचाराचा ! नव्या ध्येयाचा, जुनें जळलें पाहिजे, नवें तरारलें पाहिजे म्हणणारा ! वाद घालणारा खरा ! पण त्याला, अनोळखी असणाऱ्या प्रसादनें आपल्या शोभनेला, आपल्यापेक्षां तिच्याबद्दल आपुलकी, कळकळ, प्रेम व्यक्त करणारें पत्र आल्या- क्षणीं पूर्वीचा मनोहर, मनोहर राहिला नाहीं ! त्याचा पुरुष जागा झाला ! जग झपाट्यानें दरक्षणीं पुढें चाललें आहे, आपण त्याबरोबर धावलों नाहीं, तर मूर्ख ठरूं, मरून जाऊं म्हणणारा मनोहर जग आणि आपण पहिल्याच जागीं आहोंत, नव्हे, त्यापेक्षांही फार मागें गेलों आहोंत– रानटी युगांत वावरतों आहोंत, अशाच विचारांत पडला ! भलभलत्या कल्पनांनीं एकदम गर्दी केल्यानें मनोहरचें मन पहिल्यांदा महिरूनच गेलें. प्रसादच्या पत्रानें, प्रसाद बद्दल भयंकर द्वेष आणि शोभनेबद्दल विलक्षण तिरस्कार, या भावना जन्माला घातल्या, पक्क्याच झाल्या ! प्रसाद त्याला शत्रू म्हणून दिसूं लागला. शोभना कपटपटु, तिरस्करणीय, अपवित्र, अशी डोळ्यासमोर नाचूं लागली ! शोभना आपली का प्रसादची ? तो तिचा कोण ? ती त्याची कोण ? तो तिच्याशीं कसा वागला असेल ? ती त्याच्याशीं कशी वागली असेल ? आपण शोभनेला कसे वागवीत आलों ? ती आपल्याशीं कशी वागत असते ? मनोहरला आपल्या लग्नाचा समारंभ आठवला. शोभनेची आई, तिचे वडील, त्यांच्याकडील आप्तेष्ट मंडळींचा अभाव ! त्यांचे चेहरे, त्यांची वागणूक, हीं सर्व कशीं होतीं ? तशीं तीं चोरट्या– चोरट्या सारखीं, धास्तावल्यासारखीं कां दिसत होतीं ? तें विपरीत आपल्या ध्यानांत त्या वेळीं कां आलें नाहीं ? शोभनेला आपल्या प्राणापलीकडे आपण वागविलें, प्रथम

पासून वागवूं लागलों. जीव दिला. प्रेम दिलें. सर्वस्व दिलें, तेव्हांपासून शोभना आपल्याशीं चोरटेपणानें वागत होती का ? ती मध्येंच का दचकायची ? कुठें तरी मध्येंच तिचें लक्ष कां जात असें ? आपल्याला तिचें हृदय सर्वस्व मिळत नाहीं, अशी अकारण हुरहुर आपल्याला कां लागत असे ? लागत असे खरी!– ती त्यावेळीं दिसत असे कशी ? वागत असे कशी ? आतां दिसते कशी ? – आपलें लग्न होऊन झाले किती दिवस ? लग्नसमारंभ चोरट्यासारखा, एकीकडे, झटपट व्हावा, अशी गडबड शोभनेच्या बापानें त्यावेळीं कां केली ? शोभना दिवसांत पडली आहे– हें– हें– कसें— ?

कसे आणि काय, नकोत तें, येवूं नयेत ते भयंकर विचार मनोहरच्या मनांत येवूं लागले. त्या विचारानीं मनोहर घायाळ झाला ! जहरी विंचवानें विषारी डंख मारतांच जसें व्हावें तसेंच त्याला होऊन गेलें ?

प्रसादनें पत्राच्या द्वारें प्रेमाच्या पोटीं शहाणीला कुपथ्य तर केलें नाहीं हें ?



“ हें तुला पत्र आलं आहे तुझ्या प्रसादचं पहा ! ”

अवघडलेली शोभना सहज बाहेर बसायला आली, तिच्या अंगावर प्रसादचें पत्र भिरकावीत मनोहर तिला म्हणाला. तेवढें एकच वाक्य पण मनोहरनें तें कसें उच्चारलें असेल, हें एक त्याच्या जीवालाच ठाऊक ! त्यानें नंतर लगेच बाजूस मान वळाविली.

प्रसाद आणि त्याचें पत्र ? आणि अनपेक्षित ? प्रसादचें स्मरण शोभनेला केव्हांही आनंददायक ! त्यांत त्याचें पत्र आलेलें ! शोभनेचा हृदयसागर उचंबळूनच यावयाचा ! पण ही वेळ ती नव्हती.

आपल्या अंगावर प्रसादचें पत्र मनोहरनें कोणत्या आविर्भावांत फेकलें, त्याबद्दल सांगतांना– एकच वाक्य उच्चारतांना त्याचा स्वर कसा होता ? त्याच्याकडे पाहणें आणि त्याचे शब्द ऐकणें शोभनेच्या या दोनही क्रिया एकदमच घडल्या. तिची विलक्षण घाबरगुंडीच उडाली ! तिचें तोंड खर्रकन् उतरलें !

शोभनेनें कसेंबसें स्वतःला सावरीत प्रसादचें पत्र हातांत घेतलें. तसेंच तें धास्तावलेल्या काळजानें आणि कापऱ्या हातानें उलगडलें आणि अंधेरी येत आहे, असें वाटणाऱ्या डोळ्यापुढें धरलें. प्रसादचें पत्र तिला वाचावेसें

वाटूं लागलें. वाचण्याची भीतिही भेडसावूं लागली! इच्छा होईना. मोह आवरेना ! तेथें बसूं नये असें तिला वाटूं लागलें. पत्र वाचावयाला उठून आंत गेल्यास मनोहरला काय शंका येईल, या कल्पनेनेंच आपल्या सर्वांगातील सर्व शक्तीच नष्ट झाली कीं काय ? असें शोभनेला झालें. तितक्यातूनही सर्व बळ एकवटून शोभना आंत जाण्याकरितां उठली. तिची कल्पना, पत्र वाचायला जरा तरी निवांतपणा आंत आपल्याला मिळेल. पत्र मनोहरनें फोडलें होतें त्याअर्थी त्यानें तें अगोदर वाचलें असलें पाहिजे, यांत तिला शंका नव्हतीच. मनोहरची मुद्रा फिरावी असें त्यांत प्रसादनें वेडेपणानें कांहीं वेडेविद्रें लिहिलें असेल का ? मनोहरनें त्यांतील मुद्यांबद्दल वांकडेतिकडे प्रश्न केले– आणि ते तो करणारच– तर आपल्याला त्यांचीं, त्याचें समाधान होईल अशी उत्तरें देतां येतील का ! निदान तशीं देतां आलीं पाहिजेत. कां आपल्या आयुष्याची गाडी सुखासमाधानाच्या रूळावरून कशीबशी चालू लागली आहे, त्या गाडीपुढें प्रसादनें आपल्या या पत्राचा बॉंबगोळा ठेऊन गाडी उलथून पाडण्याचा भयंकर प्रयत्न केला आहे ?

किती थोड्या वेळांत किती भयंकर कल्पना शोभनेच्या मनांत भराभर येऊन गेल्या ! तिला वाटसें, जी वेळ यापुढें आपल्या आयुष्यांत पुन्हा यायला नको होती, ती येणार ! नव्हे येऊनच ठेपली ! आपल्याला घेरी येते आहे, असें तिला वाटलें. तरी ती उठली. आंत जाऊं लागली. ती जायला उठायला आणि खिडकीबाहेर पहात असलेल्या मनोहरानें वळून त्याच वेळीं तिच्याकडे पहायला एकच गांठ पडली !

" आंत कां निघालीस ? माझ्यासमोर पत्र वाचतां येत नाहीं वाटतं ? " मनोहरचा बराच कठोर आवाज शोभनेच्या कानांवर आदळला ! " इथंच बसून माझ्या समोर तें वाच ! "

शोभनेचा नाइलाज झाला. उठतां उठतां बसली ती. ती तें पत्र वाचूं लागली ! शेवटपर्यंत तिला वाचतां आलें कीं नाहीं कोण जाणें ! पत्र वाचतां वाचतांच तें तिच्या हातून खालीं गळून पडलें !

त्या पत्रांत तिला वाईट वाटावें असें कांहीं नव्हतेंच. पण प्रसादचें हस्ताक्षर, त्याची भाषा, त्यांतील कांहीं वाक्यें, एवढ्यानेंच मागल्या साऱ्या प्रसादच्या सहवासांतील असंख्य गोड कटु आठवणी तिच्याकडे धावून आल्या ! तिला तें

सहन झालें नाहीं. प्रसादची मानसमूर्ति तिच्या मानसचक्षूपुढें उभी ठाकली ! तिनें आपलें डोकें बांकाच्या कठडयाला टेंकलें. डोळे मिटले !

प्रसाद आपला आयुष्यांतील थोर मित्र ? कां आपल्या सात जन्माचा शत्रू ? उत्तर-दक्षिण ध्रुवासारखे दोन भिन्न प्रश्न शोभनेच्या पुढें यावेळीं उभे राहिलें असतील ! पण त्याचा बोध तिला होत असेल कीं नाहीं कोण जाणें !

पण तिच्या साऱ्या आविर्भावावरून मनोहरची तिच्याबद्दलची एक समजूत ठाम झाली ! त्याच्या हृदय सिंहासनावर विराजीत झालेली प्रेमाची मंगलमूर्ति भंगली ! शोभना सुंदर असली तरी निर्मळ- निष्पाप नाहीं, ही त्याची खात्री झाली ! ती निर्मळ नसती, निष्पाप नसती, तरी हरकत नव्हती. त्याचें त्याला वाईट वाटलें नसतें; त्याबद्दल तिचा त्याला खरोखर रागही आला नसता. पण आपल्याला हें पूर्वीं कळलें कसें नाहीं, लक्षांत कसें आलें नाहीं याच्या बद्दल त्याला स्वतःचाच अतोनात संताप आला ! शोभनेनें व तिच्या माणसांनीं आपल्याला कसलाच सुगावा लागूं दिला नाहीं. आपल्याला बनविलें. मूर्ख ठरविलें, याचाच त्याला मनस्वी संताप आला होता !

शोभना यावेळीं आसन्न प्रसवा होती. आपलें लग्न होऊन किती महिने झाले, हें मनोहरनें मनांतल्या मनांत दहादां मोजून पाहिलें. त्याच्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला ! प्रसादच्या पत्रांतील कांहीं द्व्यर्थी, संदिग्ध वाक्यानें तो प्रकाश पाडला होता ! शोभनेच्या अगतिक मनःस्थितीकडे लक्ष पुरविण्याचें त्याला भान नव्हतें. तो आपल्या अगतिक मनस्थितीमुळें स्वतःच यावेळीं बेभान झाला होता !

" हा प्रसाद तुझा मित्र होता ? " डोळ्यांतून आगीच्या ठिणग्या टाकीत मनोहरनें शोभनेवर प्रश्नांची सरबत्ती सुरू केली !

तिनें हताश मुद्रेनें त्याच्याकडे पाहिलें !

" प्रसादशीं तुझें लग्न ठरलें होतें ? "

शोभना काय उत्तर देणार त्याला ?

" प्रसादनें आपल्या मस्तकीं प्रेमानें धारण केलेलें फूल—आतां निर्माल्य ठरलेलें—ताजेंच म्हणून मी हुंगीत आलों ? " मनोहरच्या या प्रश्नामुळें शोभना मुकाट्यानें खालीं पाहून अविरत अश्रू वर्षाव करूं लागली !

" लग्नाआधींची स्थिति तूं मला कां कळूं दिली नाहींस ? "

" तुम्ही कां विचारली नाहीं ? मी अपराधी असेन, पण माझ्या इतकेंच तुम्हीही माझ्या बाबतींत अपराधी आहांत ! " असें शोभना मात्र बोलली नाहीं. एकच निमिष तिनें त्याच्याकडे पाहिलें. पण त्या दृष्टींतच वरील तो सारा अर्थ सामावला होता !

प्रसादबद्दल मनोहरनें आपल्याला आणखी कांहीं विचारूं नये, अधिक छेडूं नये, ही शोभनेची कल्पना ! तिची इच्छा ! झालें होतें ते थोडें होतें कां ? तिच्या सहनशक्तीच्या आगळें झालें नव्हतें का ? पण मनाचा समतोलपणा सुटलेला मनोहर तें कांहींच जाणत नव्हता !

शोभनेनें जितकें सहन करतां येईल तितकें, गप्प बसून निमूटपणें सहन केलें. तिची अजून इच्छा होती, " जें झालें तें गेलें. वाहिली ती गंगा उरलें तें तीर्थ, असें समजून मनोहरनें आपल्याला वागवावें; आपण चांगलें वागूं त्याच्याशीं ! " त्या क्षणीं तें तिला बोलतां आलें असतें, तर ती खचित बोलली असती. पण तिच्यांत त्यावेळीं तेवढी शक्तीच उरली नव्हती ! मी—मी म्हणणाऱ्या रथीमहारथींना ऐनवेळीं भांबावल्यासारखें होतें. तेथें यःकश्चित् शोभनेचा काय पाड ? तिला सहन करणें अशक्य होतें—आणि मनोहर तिच्यावर कठोरपणानें सारखे प्रहारामागून वाक्प्रहार करीत सुटला होता ! सहनशीलतेच्या शोभनेच्या मर्यादा सुटत चालल्या ! अति झाल्यावर काय करणार ? कोंडलेली मांजरी चिडली म्हणजे शेवटीं नाइलाज होऊन कोंडणाराच्या नरडीवर झडप घालायला मागें घेत नाहीं. शोभनेचें तसेंच झालें !

" प्रसादचें पोर माझें म्हणून आंगाखांद्यावर खेळायला आणि दुसऱ्यानें हुंगलेलें फुल—समजल्यानंतर मस्तकावर घ्यायला तयार होण्याइतका अजागळ मी नाहीं ! " असें मनोहरनें जहर ओकून शोभनेवर तिरस्काराचा वर्षाव केला ! तेव्हां मात्र शोभना एकाद्या नागिणीसारखी सळसळ करीत मनोहरासमोर फणा उभारून राहिली !

मग खडाजंगीला काय कमी ? याचें एक तर तिचें दहा. सहन करावें बायकांनींच ! पण एकदां कां त्या उलटल्या म्हणजे कसलाही पुरुष असला तरी त्याची दाणादाण उडविल्याशिवाय त्या कधीं राह्यच्या नाहींत ! उत्तरास प्रत्युत्तर ती देऊं लागली ! खवचटपणानें खोदखोदून त्यानें प्रसादबद्दल विचारल्यावर, तिनें आपलें त्याला सरळ सरळ सर्व कांहीं सांगून टाकलें ! कांहीं गुपित

ठेवलें नाहीं. लग्नाआधीं आणि नंतर गुपीत कां आणि कशासाठीं ठेवलें होतें, हेंहि सांगायला कसूर केली नाहीं. लग्नाआधीं तुम्ही काय कमी नाचरेपणा केला असेल ? किती पोरींना नादीं लावलें असेल ? किती पोरींच्या कौमार्याचें हरण केलें असेल ? तुम्हांला मी विचारलें नव्हतें. मला तुम्हाला विचारायची गरज नव्हती ! हें आणि असेंच कांहीं ती त्याला ताड्‌ताड् किती तरी बोलली ! आपल्या मेंदूला, आणि आपल्या अशक्त शरिराला भांडण्याचा ताण किती बसतो आहे, याचे परिणाम आपल्याला किती भोगावे लागतील, याचा तिला सुमार राहिला नाहीं.

मनोहर नरमला ! पण त्याची अरेरावीची भाषा चालूंच होती !

" मला तुझी गरजच नाहीं. इतउत्तर तुझा माझा कसलाही संबंध नाहीं. भंगलेली मूर्ति देव्हाऱ्यांत ठेवून तिची अजागळासारखी पूजा करीत राहण्याइतका मी मूर्ख नाहीं ! माझ्या घरांत या क्षणापासून तुला थारा नाहीं. " वगैरे वगैरे मनोहर बडबडत सुटला !

— " आजकालच्या मुलींना तुम्हीं काय समजतां ? पूर्वीं त्या अबला असतील. पण आजच्या कालांत त्याच सबला आहेत ! तुमच्याप्रमाणेंच आम्ही ज्ञानाच्या वाघीणीचें दूध प्यालों आहोंत. नेलेंत तर बरोबर जायला आमची तयारी आहे. नाहीं तर आमचा मार्ग आम्हां एकेकटीला चोखाळायला, आम्हांला तुमच्या मदतीची गरज नको आहे ! जें घर माझें नव्हें असें ठरलें, त्यांत राहूं नको म्हणायला दुसऱ्याला हवं कशाला ? तुम्हीं रहा म्हटलें तरी मी या घरीं राहाणार नाहीं. " असें शोभनेनेंही उलट ठणकविलेंच ! मनोहर त्या डिवचलेल्या–फुत्कार सोडीत असलेल्या नागीणीकडे नुसता पहात राहिला !

अल्पावकाशांत अकारण ज्यांचें सूत जमतें, त्यांचे थोड्या काळांत कारणाशिवाय तुटतेंही ? पण आजच्या युगाचा हाच विशेष आहे !

पण हें ओळखून जमलेली घडी विसकटूं न देतां काळजीपूर्वक विचारानें समंजसपणानें नीटनेटकी करावी, पण संसाराची घडी मोडून टाकण्यांत मूर्खपणा आहे, सावरण्यांत खरा शहाणपणा आहे, हा पोक्त विचार करणार कोण ? मनोहर कीं शोभना !

---

# प्रकरण आठवें

*नव्हों केंविलवाणें । नव्हों आम्हीं दीन ।*
*सर्वदा शरण पांडुरंगीं ॥*
*पांडुरंग आम्हां पाळितां-पोषितां ।*
*आणिकाची चिंता काय तेथें ? ॥*

साधुतुकाराममहाराजांचा हा अभंग गाणारा तो एक भिकारी होता. त्याचा आवाज मधुर नव्हता. आवाजाला गोडी नव्हती. पण त्याच्या गाण्यांत अंतरीची तळमळ आणि अभंगांतल्या अर्थांत सांठविलेला आत्मप्रत्यय हीं ठसठशीत प्रकट होत होती. तो भिकारीच खरा पण अभंग म्हणून भिक्षा मागण्याकरितां ज्याच्या त्याच्या पुढें दीनवाणें तोंड वेंगाडून हात मात्र पुढें करीत नव्हता. देईल तो दाता, न देईल तोही दाता, अशा बेफिकीर वृत्तीनें, सरळ नाकासमोर दृष्टि ठेऊन तो हिंडत होता. आणि खरोखरीच मौज अशी कीं, कांहीं लोक त्या भिकाऱ्याला हाटकून पै-पाव--आणा देत होते. त्याच्या योगक्षेमाची तरतूद यथाशक्ति करीत होते.

ज्या गाडींत तो भिकारी हिंडत होता, त्याच गाडींतून शोभना प्रवास करीत होती. तिच्या आंगावरील वस्त्राशिवाय नी जरूरीच्या आणखी एकदोन पातळांशिवाय शोभनेजवळ दुसरें कसलेंच सामान नव्हतें; आंगाखांद्यावर कसला जिन्नस नव्हता कीं पाणी प्यायला एकादें भांडेंही बरोबर नव्हतें तिच्या !

भर दुपारची वेळ. बाहेर उन्ह म्हणजे मी म्हणत होतें ! खिडकींतून

येणाऱ्या उन्हाच्या झळांनीं प्रवाशाच्या आंगाची नुसती लाही लाही होत होती. जीव तगमगत होता! एकसारखें पाणी–पाणी झालें होतें सगळ्यांना!

बाहेरची ही अवस्था तशीच शोभनेच्या अंतरींचीही अक्षरशः झाली होती. अवघडलेली देहलता नुसती मलूल होऊन गेली होती. मनांतल्या असंख्य विचाराविचारांनीं जीव अगदीं कावून गेला होता! आपल्यावर प्रेम करणारा प्रसाद आणि आपल्याशीं लग्न लावून चार दिवसांचा प्रपंच मांडणारा मनोहर या दोघांच्याशिवाय दुसरा कसला शोभना विचार करणार?

दोन मूर्ति तिच्या डोळ्यापुढें पुन्हां पुन्हां नाचत होत्या. आपल्या आयुष्याचें मातेरें करायला, जगांतून उठवायला, आपल्या जिवाची होळी करायला जास्त जबाबदार कोण? प्रसादाची खरी चूक कां मनोहरचा मोठा अपराध? एकदां मनोहर जास्त दुष्ट आहे असें तिला वाटे, तर पुन्हा प्रसाद नीच आहे असें भासे! आणि शेवटीं दोघेही पुरुष! दोघेही सारखेच खत्याळ! उलट्या काळजाचे! करून सवरून ऐत्या वेळीं बेगुमान नामानिराळे राहणारे, असा निर्णय तिचें मन घेई! आपल्या वागण्यांत मात्र बारीकसारीकही चूक असेल, असें तिला वाटत नव्हतें! जगांत वागतांना आपली चूक होत असते असें कधीं कोणाला वाटत असतें का? नेहमीं दुसऱ्यांच्या चुका! दुसरे अपराधी! दुसरे कृतघ्न! आपण तेवढे निरापराधी, सरळ, सज्जन! अशाच समजुतीनें वागण्याची आणि जगाला लेखण्याची ज्याचीत्याची रीत!

मनोहर बोलला, त्यानें तिला दोष दिला; आपला–तुझा इतउत्तर संबंध सरला, असें म्हटलें; त्याबरोबर तिनेंही त्याचा संबंध तोडला आणि त्याच्या घरांतून शोभना बाहेर पडली! आपण आसन्न प्रसवा आहोंत, जायचें कोठें, करायचें काय, आपलें कसें होईल, कोण आपल्याला थारा देईल, आपले दिवस कसे जातील, याचा यत्किंचितही विचार शोभनेनें घराच्या बाहेर पाऊल ठेवतांना केला नव्हता! आपल्या माहेरीं जाण्याचें तिनें मनांत आणलें नाहीं. प्रसाद पुढें जाऊन उभें राहावें, तुझ्यामुळें आपल्या आयुष्याचे धिंडवडे व्हायची वेळ आली, आतां माझ्या आयुष्याची तड तूं लाव, तुला आपण सोडणार नाहीं, असें त्याला खडसावावें, असें तिच्या मनांत आलें होतें; नाहीं असें नाहीं. "पण मनोहराशीं तुझें लग्न झालें आहे, आपण तुझ्याशीं लग्न करायला तयार असतां, तूंच घाई करून दुसऱ्याशीं लग्न केलेंस! आतां तुझा

स्वीकार मी कां करीन ? जा मनोहराकडेच पुन्हां आलीस तशी ! " असें सांगून त्यानें परत धुडकावलें तर ? पुरुषांची ही रीतच आहे पहिल्यापासून ! वृद्धांनीं तरुण पोरींशीं लग्न करून, त्यांच्या आयुष्याची माती करण्याची चाल शंकरानें घालून दिली. आपण होऊन आपला अंगिकार करा अशी विनवणी करायला गेलेल्या अंबेला महाभारतांतल्या भीष्माचार्यांनें धुडकावून देऊन, भावी पिढींतल्या पुरुषांना आपल्यावर अनुरक्त असणाऱ्या तरुणींनासुद्धां धुडकावून देण्याचा कित्ता घालून दिला. तो कित्ता पुरुष गिरवीत आहेत अजून ! प्रसाद आपली तीच गत करणार ! साळसूदपणानें पत्र पाठवून आपल्या संसाराचा सत्यनाश करणाऱ्या प्रसादचें नांव घ्यायचें नाहीं, असेंच तिनें ठरविलें ! दुष्टपणानें तरवार चालाविली काय आणि प्रेमानें तरवार चालविली काय, तरवार प्राणघाताचेंच एक चोख काम करणार ! प्रसादनें आपल्याविषयीं हेंच केलें. आतां, प्रसादचें, मनोहरचेंच काय, पण जगांतल्या कोणत्याही पुरुषाचें या जन्मांत आपल्याला नांव नको !

क्षणकालच्या पत्नीपणाचा अनुभव तिनें घेतला होता. आतां ती अनंतकालची माता व्हायची होती. त्या स्थितींत निसर्गानें तिला आणून सोडलें नसतें, तर मनोहरच्या पुरुषी-अरेरावी खुनशीपणाच्या उद्धट वागणुकीमुळें तिनें धावत्या गाडीखालीं जावून जीव द्यायलाही कमी केलें नसतें ! पण स्त्रीजातीला निसर्गतःच अपत्याचें उपजत वेड ! माता होण्याची अनिवार हौस ! आपण लवकरच माता होणार आहोंत हें पहिल्यांदा जेव्हां तिला कळलें, तेव्हां ती घाबरली असली, तरी मनोहरशीं लग्न करून त्याच्या घरीं नांदायला गेल्यानंतर 'आपल्याला बाळ होणार ! त्याचे लाड आपण असे करूं ! त्याचें कौतुक तसें करूं ! त्याला अशा प्रकारचे कपडे करूं. त्याच्या भोंवतीं हरतऱ्हेचीं असंख्य खेळणीं मांडून, त्याच्या आनंदाकडे हर्षभरानें देहभान विसरून पहात राहूं ! त्याला बाबागाडी घेऊन त्यांत बसवून, हिंडवितांना आपल्याला किती सुख होईल, या सर्वांचीं मनोरम कल्पनाचित्रें शोभना मनोमन रंगवूं लागली होती ! पण तसल्या सौख्याची गोडशी सृष्टी आतां मावळली होती. तरीदेखील 'आपण माता होणार आहोंत,' याचा अभिजात आनंद हृदयांतला हृदयांत एका कोपऱ्यांत सांचून राहिलाच होता तिच्या ! 'आपल्या बाळाकरितां आपल्याला जगायचें आहे, जगलें पाहिजे. आपण शिकलेल्या आहोंत,

कोठेंही स्वतःच्या पायावर स्वतंत्रतेनें आपण उभे राहूं ! कोठल्याही एकाद्या धर्मार्थ प्रसूतिगृहांत शिरकाव करून घेऊन तेथें आपल्या बाळाचें गोजरें मुख आपण पाहूं ! '

असे विचार आले म्हणजे, शोभनेला शरीराचा थकवा जाणवला तरी मनाला उत्तेजित झाल्यासारखें वाटे !

स्टेशनामागून स्टेशनें मागें पडत होतीं. उलटसुलट विचारांचीं चक्रें शोभनेच्या डोक्यांत एकसारखीं फिरत होतीं. तिच्या शेजारी कांहीं बायका बसल्या होत्या. त्यांचीं आपापसांत बोलणीं चाललीं होतीं. घरच्या भानगडीं, हेवेदावे, मत्सर, आनंदाच्या गोष्टी, सर्व कांहीं चालू होतें. पण त्या कशाकडेच शोभनेचें लक्ष नव्हतें ! आत्मनिष्ठ जीवाचें नेहमीं असेंच असतें ! आपल्याच दुःखाच्या किंवा सुखाच्या विचारांत तो जीव चूर असतो ! जगाकडे पाहण्याचें, त्यांत मिसळण्याचें, त्यांतील सुखदुःखाशीं समरस होऊन आपलें दुःख कमी करून एकंदरींत सुखाची वाढ करण्याचें त्याला जुळतच नाहीं.

एकादी बाई तिच्याकडे पाहून, ' कोण ? कुठल्या ? कुठून आलांत ? कुठें जाणार ? ' असे विचारी. पण त्यापैकीं एकाद्याही प्रश्नाला सरळ उत्तर देण्याचें तिला मनाच्या आत्यंतिक अस्वस्थतेमुळें जमत नव्हतें !

: : :

एकेका वेळचे एकेक योग तरी काय चमत्कारिक असतात ! ज्या गाडींतील एका डब्यांत शोभना होती, त्याच गाडींतील दुसऱ्या एका डब्यांत मनोहरही आपल्या चारदोन स्नेह्यासह बसलेला होता! तो त्या गाडींत आहे, हें शोभनेला माहित नाहीं. शोभना त्याच गाडींत दुसरीकडे याच वेळीं असेल याची कल्पना मनोहरला नव्हती. घरीं घडून आलेल्या त्या विपरीत घटनेमुळें वैताग आलेल्या मनाला अंशतः तरी विरंगुळा मिळावा, म्हणून, घराबाहेर पडलेला मनोहर आपल्या स्नेहीमंडळींत गप्पागोष्टी करायला निघाला होता. तेथेंच त्याला समजलें होतें कीं, पुण्याला कलकत्त्याच्या सुप्रसिद्ध लीला देसाईच्या नृत्याचा जंगी जाहिर कार्यक्रम आहे. त्या कार्यक्रमाला जायचा बूट मित्र मंडळींत निघाला. मित्रांनीं मनोहरला आग्रह केला. तोही तसाच्या तसाच मित्रासमवेत जायला निघाला. मनोहर आपल्या मित्रमंडळींत गप्पा झोड-

ण्याच्या नादांत घराकडील त्रासदायक घटना जवळ जवळ पार विसरून गेला होता ! मजेंत होता ! त्याच वेळीं शोभना, त्रासांत, वैतागांत, संतापांत चूर होती !

एकाद्या स्टेशनवरून गाडी सुटली कीं, आपलें खेडें सोडून कामधंद्याला निघालेला कुळंब्या शेतकऱ्यांच्या घोळक्यांतून, " बोला, बोला पुंडलीक वरदा हरि विठल ! " " ज्ञानदेव तुकाराम ! " असा प्रचंड गजर होई ! एकाद्या ठिकाणीं, लहानशा गांवांतील खादीधारी देशभक्त सत्याग्रह करून तुरुंगाच्या वाटेला लागलेला असे, त्याला निरोप द्यायला जमलेल्या जमावांतून, " महात्मा गांधी कीं जय ! " " हिंदुस्थान झिंदाबाद ! " " स्वराज्याचा जयजयकार असो ! " अशा उच्च स्वरांत आरोळ्या ऐकायला येत ! कोणी यात्रा, महायात्रेच्या कथा सांगत आहे. कोणाची कुठें एकाद्या नव्या पाहिलेल्या बोलपटावर यथास्थित उलट सुलट चर्चा चालू आहे; कांहीं जण युद्धाच्या वार्ता करीत आहेत. तर कांहीं मंडळी आपापसांत कोर्टांत चालणाऱ्या लहान-मोठ्या खटल्याखोकल्या संबंधीं साधकबाधक बोलत आहेत. एकादा नवजवान पहिल्यावहिल्या आपल्या मुलाच्या बारशाला आनंदानें सासुरवाडीला निघाला आहे, तर दुसरा कोणी दुर्मुखलेलें तोंड घेऊन कोठेंतरी निकटवर्तीयाच्या और्ध्वदैहिकाचें कार्य उरकण्यास जातो आहे !

दिसला कीं शत्रू, जबरदस्तीनें आंत घुसून जवळ बसला कीं मित्र आणि उतरून गेला म्हणजे कोणी नाहीं ! व्यावहारिक जगांत चाललेला हा प्रकार धावत्या गाडींत एकसारखा चालू आहे ! धावती आगगाडी म्हणजे धावत्या जगाचें साक्षात् प्रतिक आहे ! असें म्हणतात तें याचमुळें !

एका स्टेशनावर गाडी उभी राहिली ! पाणी पिण्यासाठीं आणि आपल्या दोस्तांना पाणी पाजण्यासाठीं, मनोहरच्या कंपूंतील एकजण हातांत लोटा घेऊन फलाटावर उतरला. दूरच्या नळाकडे जातांना व येतांना, सभोंवताच्या जगाकडे माणूस जसें पाहातें, तसेंच आगगाडींतल्या जगाकडे पहात असतां, स्टेशनवरच्या पाणक्याकडून पाणी घेत असलेली, तहानेलेली शोभना, त्याच्या दृष्टीस पडली ! त्यानें तिला ओळखलें ! मनोहरला त्यानें तिच्याबद्दल वर्दी दिली ! मनोहरचा चेहरा गोरामोरा झाला ! पण मित्रांना त्यांचें खाजगी कांहीं माहीत नसल्यामुळें कोणाच्याच लक्षांत आलें नाहीं. मनोहरनें खरी

हकीकत कोणाला सांगितली नाहीं. कांहींतरी बात ठोकून वेळ निभावली! पण अंतर्यामी त्याला कसेंसेच झालें! सत्तेचें सौंदर्य पायाखालीं तुडवितांना कांहीं वाटत नाहीं. पण त्यानें आपली सत्ता झुगारून दिल्याचें आढळलें, म्हणजे त्या सौंदर्याचें मोल ध्यानांत येतें; तें दूर जाऊं नये असें नंतर वाटूं लागतें. मनोहरचें तसेंच झालें! मित्रांचा आग्रह पडला, कीं मनोहरनें वहिनीला आपल्याकडे आणून बसवावें. तो कांहीं सनातनी नव्हे! आजकालचा तरुण तो! दुसऱ्या स्टेशनावर गाडी थांबली! मनोहर खालीं उतरला आणि शोभनेला शोधीत तिचा डबा पहात पहात गेला!

"शोभना!" मनोहरनें तिला पाहून हांक मारली! त्याला पाहून आणि त्याचे शब्द ऐकून शोभना किती दचकली! तिनें त्याच्याकडे पाहिलें! तिला भीति पडली. अनेकवेळां अनेकांदेखत आपल्याला मनोहर काय बोलतो नी काय नाहीं? अडाणी कुळंब्यप्रमाणें आपलाच जगजाहीर तमाशा व्हायला नको, म्हणून ती डब्यांतून खालीं उतरून मनोहरासमोर खालीं पहात उभी राहिली! तो आपला पाठलाग करीत कां आला, हेंच तिला कळेना! शोभना आपल्या आवडत्या प्रसादकडे चालली असेल, असेंच मनोहरला वाटलें. "कुठें निघालीस?" असा प्रश्न त्याच अर्थानें तिला त्यानें केला! ती कांहींच बोलूं शकली नाहीं.

"मला न कळवितां घर सोडलंस अं?" तो उद्गारला! त्या उद्गारांत प्राणघातक कडवटपणा ओतप्रोत भरलेला होता. त्यावरही शोभनेला कांहींच बोलण्यासारखें नव्हतें.

आपल्याला तुझ्या बाळाची गरज नसली, तरी तुझ्या अभिजात सौंदर्याला सोडायला आपण तयार नाहीं, अशा अर्थाच्या मुद्रेनें शोभनेकडे पहात मनोहरनें तिला पुढें आणखी विचारलें. "प्रसादकडे जाणार आहेस तुझ्या?"

आपल्या मस्तकावर वीज कोसळत असल्याचा भास शोभनेला झाला! प्रसादची आठवण मनोहरनें कां करून द्यावी? मनोहरला अनपेक्षित रीतीनें पाहिल्यावर तिच्या मनांत तो आपली मनधरणी करून, गयावया करून परत न्यायला आला आहे, असें आलें. आपलें मन विरघळणार, त्याच्या बरोबर परत जावें लागणार, असें वाटतें न वाटतें तिला, तोंच 'प्रसाद'चें नांव त्यानें तिच्या तोंडावर फेंकलें! तिच्या तळपायाची आग मस्तकाला गेली!

' मनोहर या गाडींत होता. आपल्या समोर येऊन उभा राहिला. प्रसाद सुद्धां याच गाडींत नसेल कशावरून ? तोही अचानक आपल्याला पाहून याच वेळीं भेटायला येतो कीं काय ? आपल्यासाठीं समोरासमोर आलेल्या मनोहर-प्रसादांत सुंदोपसुंदी सुरू होऊन, जें नको तेंच या ठिकाणीं घडणार तर, नाहीं ?' या विचारांनीं शोभनेची जीवघेणी करायला कमी केलें नाहीं ! शोभना प्रसादकडे निघाली; आपल्या अब्रूची धिंड काढीत निघाली. ती उत्तर द्यायला तयार नाहीं, हें पाहून मनोहरच्या मस्तकांत कल्पांत उडाला ! आपल्याला जें कळलें, ज्यामुळें राग आला, त्या रागाच्या भरांत चार उगेअधिक शब्द बोललों, तेवढेंही शोभनेला सहन होऊं नये ? तिनें लगेच लाथ झाडून, आपल्याला कायमचे सोडून घराबाहेर पडावें ? कसलें आपलें नवरेपण ? आणि कसलें तकलुपी या बायकांचें गृहिणीपण ?

जगांत, अगदीं आजच्या जगांत, कितीतरी असे थोर पुरुष आहेत, कीं ज्यांना, – आपल्या धर्मपत्नीला, तिच्या पहिल्या घरचें मूल आहे, आपल्यालाही पहिल्या पत्नीपासून झालेलें अपत्य आहे, असलीं तीं दोघें एकत्र आल्यावर, त्यांनाही दैवानें अपत्यलाभ झाला आहे; असें तें प्रेमळ उदार हृदयीं दांपत्य एकत्र बसून बोलत असतां, हें तुझें बाळ, हा माझा छबडा, हें आपलें लाडकें !" असें म्हणून, सर्वांना सारख्याच प्रेमळ वात्सल्यानें वागवून, त्या लोकांनीं आपला संसार सुखानें, आनंदानें चालविला आहे ! तसेंच आपल्याला करतां आलें नसतें का ? अजून वागतां येणार नाहीं का ? क्षणाचा वैताग जन्मभर का टिकत असतो ? पण असा विचार कोण करतो ? इतका धीर आहे कोणाला ?

शोभनेला परत न्यावें, आपल्या विचाराला मुरड द्यावी. थोरांच्या पावलावर पाऊल टाकायला आपणही शिकावें, पण शोभनेला सोडूं नये, असा विचार मनोहरच्या अंतःकरणांत चमकला ! त्याचें हृदय कोमल झालें ! जे थोडे दिवस तिच्या संगतींत गेले, त्याची आठवण त्याला झाली ! त्यानें आपलीं सर्व शक्ति एकत्र केली आणि शोभनेला म्हटलें, "ऐकलेंस शोभना ! बस्स झाला अविचार ! मी पुण्याला उतरतों आहें. तुलाही तेथेंच उतरायला पाहिजे ! आणि उद्यां माझ्याबरोबर परत घरीं चललें पाहिजे ! माझें तुला ऐकलेंच पाहिजे !" त्याच्या हृदयाचा प्रेमळपणा हृदयांत राहिला ! थरथरत्या ओंठा-

बाहेर शब्द आले ते हुकमाचे—कडक अरेरावी पतीचे— पुरुषाचे ! शोभनेच्या कानांला ते शब्द तापलेल्या लोखंडाच्या रसासारखे चटके देत शिरताहेत असे वाटलें ! मनोहर शोभनेच्या अनुकूल उत्तराची अपेक्षा करीत उभा होता. ती दगडी पुतळीप्रमाणें त्याच्या समोर अचेतन उभी होती. आतां तिच्या मनानें पुरती उलट खाल्ली होती !

इंजिननें शिटी दिली. शोभना कशीबशी डब्यांत चढली ! मनोहर आपल्या डब्याकडे धांवला ! गाडी चालूं झाली !

मित्रमंडळींनीं मनोहरला " मिसेस मनोहरला इकडे कां आणलें नाहींस ? तिकडेच काय हितगुज केलेंस ? येथेंच गप्पागोष्टींना आगळा रंग नसता का आला ? वहिनी जाताहेत कुठें ? " वगैरे विचारून हैराण करून सोडलें. " ती आपल्या मैत्रिणीबरोबर ट्रीपला जाते आहे, मैत्रिणी बरोबर आहेत, त्यांनीं सोडलें नाहीं तिला. " असें कांहीं सांगून त्यानें होही वेळ मारून नेली !

मनोहरच्या अप्रिय भेटीनें आणि भाषेनें आर्धीच्या उकाडयांत भयंकर भर पडल्यानें शोभनेच्या मनाची नी शरीराची विलक्षण काहली झाली ! तिचा संताप अनावर झाला ! आपल्या कम्नशीबानें इतका कहर कां करावा ? हाच विचार तिचा भडका उडवूं लागला !



शोभना अगदीं अगतिक झाली आणि त्यावेळीं गाडींत असलेला भिकारी तिच्या डब्यांत शिरून या टोकापासून त्या टोंकापर्यंत जातांना

*नव्हों केविलवाणें, नव्हों आम्ही दीन ।*

हा अभंग म्हणत होता ! शोभनेजवळ त्या भिकाऱ्याला द्यायला कांहीं नव्हतें. पण त्या अभंगाच्या अर्थाचा परिणाम नकळत तिच्या मनावर मात्र होत होता ! आपल्याला समाधान वाटत आहे. आपला आत्मप्रत्यय जागृत होत आहे. असें तिला वाटत होतें ! तिचा संताप कमी होऊं लागला. विद्यावाघीणीचें दूध आपण प्यालों आहोंत ! फसव्या, स्वार्थी, आपमतलबी पुरुष जातीची याउप्पर आपल्याला गरज नाहीं. एखाद्या शाळेंत आपण नोकरी पत्करणार ! पुढचें सारें आयुष्य विद्यादानासारख्या पवित्र कार्यांत वेंचावयाचेंच !

*" पांडुरंग आम्हां पाळिता पोषिता "*

असें असल्यावर, आपल्याला चिंता कसली ?

भिकाऱ्यानें म्हटलेल्या अभंगांच्या ओळी शोभना आपल्या मनांत सहज घोळूं लागली ! जसजशी त्या अभंगांतील आत्मप्रत्ययी अर्थाशीं ती तन्मयतेनें समरस होऊं लागली, तसतशी तिला नवीनच उत्तेजक हुशारी वाटूं लागली !

जेव्हां संकल्प विकल्पांनीं जीव घाबरा होतो. तर्ककुतर्कांनीं भडका उडतो! ज्ञान अपुरें पडतें! कार्य करण्याची इच्छा आणि शक्ति असूनही त्याला योग्य अशी जागा मिळत नाहीं; तेव्हां सभोंवार चाललेल्या, आनंद, उत्साह, मौज, यांत मन रममाण होत नाहीं. पण सुदैवानें त्यावेळीं भक्तीची गांठ पडली, म्हणजे मात्र त्या भक्तीचीं योग्यता कळूं लागते. त्या भक्तीला मोल चढतें. भक्तीची महति मनाला पटते. आणि ती भक्तीच आपल्या खऱ्या समाधानाला कारण होतें. उन्नतीच्या–आणि सुखासमाधानाच्या आयुष्याचा सरळ मार्ग भक्तीच दाखवून देत.

भिकारी म्हणत असलेल्या अभंगानें शोभनेला ' आत्मप्रत्ययाची ' देणगी ओपून तशाही स्थितींत तिला नवीन जीवन दिलें ! तिचें मन तिला ग्वाही देऊं लागलें, हेंच जग आपला योगक्षेम चालवील.

पुढच्या एका स्टेशनावर गाडी थांबली. तेथें शोभनेच्या डब्यांतच एक नवी बाई चढली. तिला पोंचवायला किती तरी स्त्रिया आल्या होत्या ! त्या स्त्रिया, "आपल्याकडे येऊन, सुश्राव्य व्याख्यान दिल्याबद्दल, आणि आपल्या महिलासमाजाच्या कार्याला योग्य मार्गदर्शन करून चालना दिल्याबद्दल" त्या पाहुण्याबाईना धन्यवाद देऊन " आपल्याकडे असेंच निरंतर प्रेमळ लक्ष ठेवण्याबद्दल व जमल्यास मुक्काम करण्याबद्दल" विनंती करीत होत्या. त्याला उत्तरादाखल, "मला सवड असती तर खचीत मी मोठ्या आनंदानें राहिलें असतें. पण आज रात्रींच ××× ठिकाणीं " प्रसूतीगृहा " चा उद्घाटन समारंभ आपल्या अध्यक्षतेखालीं व्हायचा आहे. आपल्या सारखाच, तिथल्या महिलांचा माझ्यावर हक्क आहे. म्हणून जाणें भाग आहे ! " असें त्या बाई म्हणत होत्या.

गाडी पुढें चालूं झाली.

ती बाई शोभनेजवळच येऊन बसली. आतां ती किंचित् स्वस्थ होऊन आवतीभंवती पाहूं लागली ! त्या बाईचें लक्ष शोभनेकडे गेलें. शोभनेचें लक्ष

तिच्याकडे अगोदरच गेलें होते. तिचें बोलणेंही तिच्या कानांवर पडलें होतें! पण ती थोड्या वेळापासून व्याकुळ झाली होती ! एकाएकी तिच्या पोटांत दुखूं लागलें होतें. आपला प्रसूतीकाल जवळ आला कीं काय ? मुक्कामांत पोंचण्याच्या आंत आगगाडींतच तशी वेळ आली तर काय करावयाचें ? या भयंकर विचारानें तिला घेरलें होतें ! अननुभवी अल्लड कोवळी पोर ती ! तिला काय कळणार ? कोठेंतरी केव्हां तरी आपण शोभनेला पूर्वी पाहिलें आहे, असें त्या बाईला वाटलें. पोटांत येणाऱ्या कळांकडे चित्त जास्त जास्त गुंतू लागलें नसतें, तर जवळ बसलेल्या बाईला आपणही कोठेंतरी पाहिलें असावें, असें शोभनेच्याही मनांत आल्या वांचून राहातें ना ! कॉलेजांत असतांना, व्याख्यान देऊन, आपल्याकडून सरोजिनी नायडूंच्या तोडीची व्याख्याती, असें शिफारसपत्र घेऊन गेलेल्या सुलभेला शोभना कशी विसरेल ? होय ! ती बाई सुलभाच होती. तिला पाहून बरेच दिवस झाले होते, शोभनेला ! तिच्यांत आतां बराच फरकही झाला होता. किंचित् स्थूल दिसत होती ती ! पोषाखाची ठेवणही बदलली होती तिची ! पण डोळयांतली बुद्धिमतेची चमक, भाषेंतली चपळाई नी चातुरी अजून जशीच्या तशीच होती ना? कार्यरत असल्याच्या अभिमानाचा आनंद तिच्या मुखावर तुफान नाचत होता ना !

तिनें 'महिला समाज' चालवून आदर्श करून दाखविला होता. शाळा काढून त्या संस्थेचें अध्यक्षपद पटकावून ठिकठिकाणीं प्रसूतीगृहें काढायला लावून खेडोपाडीं जाऊन अडाणी बायकांतून साक्षरता प्रसाराचें काम तिनें जातीनें चालविलें होतें. इतर ठिकाणीं जाऊन व्याख्यानें देऊन, श्रीमंत शिकलेल्या कित्येक भगिनींना कार्याला जोडण्याचें सत्कार्य सारखें चालूं ठेविलें होतें ! पहिली सुलभा जवळ जवळ पार बदलून गेली होती ! हा तिचा नवा आणि लोकोपयुक्त असाच अवतार होता ! वसंताचें आणि तिचे अधूनमधून खटके उडत. भांडणें होत. जमत नसे, हें खरें; पण त्यांतच ती एकसारखी स्वतःला गुरफटून घेत नसे ! महिलांच्या उन्नतीचें कार्य तिनें अंगिकारिलें होतें आणि आपला बहुतेक सारा वेळ ती त्या कार्याकडेच देऊं लागली होती ! आणि यालाही खरें कारण तिचे श्वशूर–चारुशीलेचे वडिल आप्पा, हेच होते ! कोणाला कसे पारखावें व त्याला कोणतें काम लावून द्यावें, हें केव्हां झालें तरी आप्पासारखा अनुभवी महाभागच ठरवूं शकणार !

शोभनेच्या पोटांत जास्तच कळा येऊं लागल्या. ती घायकुतीला आली. केविलवाण्या नजरेनें इकडे तिकडे – सुलभेकडे पाहूं लागली ! बायकांच्या अडचणी, बायकांचीं दुःखें बायकांनींच जाणावींत. शोभनेजवळ तिचें असें कोणी नाहीं. ती एकटीच आहे. अवघडलेली आहे. हें सुलभेला कळायला वेळ कां लागणार ?

ती होऊन पुढें सरकली ! "एकट्याच आहांत वाटतं? बरोबर कोणी नाहीं का ! अन् असल्या अवघडल्या स्थितींत प्रवासांत आहांत त्या ?" सुलभेनें किती प्रेमळ शब्दांनीं शोभनेची विचारपूस केली ! अगदीं एकाद्या आईनें आपल्या पोटच्या पोरीला विचारावें तसें ! ऐकून शोभनेला हुंदकाच आला ! भरल्या डोळ्यांनीं तिनें सुलभेकडे पाहिलें ! डोळ्याला डोळा भिडला ! वाट चुकलेली, प्रसंगांत सांपडलेली, कसल्या तरी भीतीनें सैरावैरा वाट दिसेल तिकडे धावत सुटलेली, अशी ही एकादी हरणी असेल का? सुलभेच्या मनांत एकदम विचार आला ! अनुभवाची झळ ज्याला लागून गेलेली असते, त्यालाच दुसऱ्याची कळ चटकन् कुणी न बोलतां कळंत ! आपण पूर्वी कशा होतों ? —तसेंच या पोरीचे असेल काय ? छेः ! त्यापेक्षां पुढची हिची पायरी आहे !

सुलभा कळवळली ! अधिकच जवळ सरून सुलभेनें शोभनेच्या अंगावरून हात फिरविला ! शोभनेच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या ! ती कण्हूं लागली. कण्हताकण्हतांच तिनें जरूर तेवढी हकीगत सांगितली ! – इतर प्रवासी तर तिच्याकडे पाहून घाबरलेच. पुढचें स्टेशन येतें केव्हां आणि हा डबा आपण खालीं करतों केव्हां असेंच त्यांना झालें ! सुलभेनें तिला चांगला धीर दिला ! गोंजारलें. घाबरूं नको, म्हणून सांगितलें. स्त्रियांची अब्रू स्त्रियांनींच होईल तितक्या रीतीनें संभाळायची असते, ती ही अशी !

नवीन प्रसूतीगृहाच्या उद्घाटन समारंभाला ती अध्यक्ष म्हणून चालली होती. त्या प्रसूतीगृहांत शोभनाच पहिली दाखल होणार हें उघडच झालें ! उपदेश, प्रसुतीगृहाची आवश्यकता पटवून देणारें भाषण आणि कांहीं देणगी द्यावी लागणार, त्याबरोबर प्रसुतीगृहें जितकीं जास्त होतील तितकीं कां पाहिजेत, हें शोभनेला तेथें ठेवण्यानेंच, दाखवून देणार होतें सुलभेला !

मनोहर तिकडे पुन्हा आला नाहीं !

प्रवासाच्या श्रमानें आणि मनोहरच्या भेटीनें–भुकेनेही–शोभनेच्या पोटांत कळ येऊं लागली होती; ती कमी होऊं लागली ! सुलभेनें आपल्या बरोबर तुम्हांला नेतें, असें शोभनेला आश्वासन दिलें ! शोभनेच्या दुःखाश्रूंचें रूपांतर समाधानाच्या अश्रूंत झालें ! आपण किती उपयुक्त कार्यांत पडलों आहोंत. शोभनेसारख्या प्रसंगांत पडलेल्या तरुणींना आपला केवढा उपयोग आहे, याचें श्रेष्ठ समाधान शोभनेकडे पहात सुलभा अनुभवीत होती !

उन्हाची कमाल तिव्रता झाली कीं पर्जन्य पडतो ! बाहेर खरोखरच पाऊस पडूं लागला ! बारा महिन्याचा उन्हाळा नी एका घटकेचा पावसाळा ! उन्हानें हैराण झालेले प्रवासी पावसाची सर येतांच आनंदीत होऊन उद्गारूं लागले ! शोभनेच्या नेत्रांतून अश्रू वाहात होते–पावसाळाच तो– पण त्यानेंच तिला समाधान वाटूं लागलें होतें ! तिच्या पाठीवर सुलभेचा हात होता. त्यानें तिला केवढी तरी निश्चिंतता दिली होती !

# प्रकरण नववें

आप्पांची प्रकृति अतिशयच क्षीण झाली होती. चारुशीला त्यांच्याकडे पोंचली तेव्हां त्यांना भेटायला बरीच मंडळी आली होती. ते पाठिशीं तक्क्या घेऊन बसले राहात. भेटायला आलेल्या मंडळींशीं आप्पा अनेक विषयावर बोलत रहात एकसारखे आपणच ! तसें आतांही ते बोलतच होते.

" आतां फार बोलू नका. तुम्हीं आजारी आहांत. उगाच श्रम कां घेतां ?" असें भेटीस येणाऱ्यापैकीं कोणी सहानुभूतीनें म्हटलें म्हणजे आप्पा त्यांना हंसून म्हणत, " माझें शरीर आजारी आहे. मन नाहीं. आणि आयुष्याच्या दिव्याची ज्योत केव्हांतरी शांत होणारच. त्याकरितां माझ्यासारख्यानें जपण्याची काळजी कशाला घ्यायला हवी ? तशी काळजी घेऊं लागलों, तर

*वासांसि जीर्णानि यथा विहाय । नवानि गृण्हाति नरोऽपराणि ।*
*तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥*

या गीतेच्या शिकवणुकीचें, उपड्या घड्यावर पाणी, असेंच मी केलें असें ठरेल ! इथें ईश्वरानें मला ज्यावेळेपर्यंत ठेवलें आहे, जोपर्यंत आपण माझ्या-जवळ आहांत, तोपर्यंत बोलायला हरकत काय आहे ? ईश्वराकडून सुटणाऱ्या चिठ्ठीची मी आनंदानें आतां मार्गप्रतीक्षा करतों आहें. ती येतांच तितक्याच आनंदानें निघण्याची मी मनाची तयारीही केली आहे ! म्हणून सांगतों, आपण बोला. मलाही बोलूं द्या ! "

चारुशीला बाहेर वसंताजवळ बसली होती. मंदाकिनी आपल्या मामाला बिलगली होती. वसंताजवळ हलक्या आवाजांत चारुशीला आप्पांच्या प्रकृती

विषयीं विचारपूस करीत होती. तोही तिला तितक्याच हलक्या आवाजात सांगत होता. मधून मधून मंडळीशीं बोलतांना आप्पांचा खणखणीत आवाज बाहेर ऐकायला येत होता. त्या वेळीं तिकडे दोघांही बहिणभावंडांचे कान टवकारले जात होतेच.

" आप्पांची प्रकृति सुधारायला लागलीसं दिसतं त्यांच्या आवजावरून, नाहीं रे ? " चारुशीला वसंताला विचारीत होती.

" मंडळी असली म्हणजे ते असे बोलत राहतात. आपण आजारी आहोंत, याचें त्यांना भानही नसतें. पण ते एकटे असले म्हणजे त्यांच्या आजाराचें खरें रौद्ररूप दिसतें. तें पाहून माझ्या तोंडचें तर पाणीच पळतें ! " वसंत सांगत होता; " ताई, आप्पांचा भरंवसा मला वाटत नाहीं ! " हें सांगतांना त्याच्या डोळ्यांत टचकन् पाणी आलें ! त्याला हुंदका आवरेना ! एकाद्या अजाण अर्भकासारखा हातांत तोंड झांकून ओक्साबोक्सी तो रडूं लागला ! चारुशीलेला कांहींच्याबाहींच झालें ! तिलाही रडूं आवरेना ! मंदाकिनी तर भिऊनच गेली !

" तूं आप्पांच्या जवळ एकसारखा असतोस ना ? " रडत रडत चारुशीलेनं विचारलें, " अन् सुलभावहिनी पण ? "

" आप्पांना, सारखं जवळ कोणीच असलेलं खपत नाहीं ग ! ते म्हणतात, आजाऱ्याजवळ सारखं बसून, सगळ्यानांच आजारी कां पडायचं आहे ? ज्यानं त्यानं प्रथम आपला असेल तो उद्योग पाहायला पाहिजे ! " वसंत डोळे पुसून, घसा साफ करीत सांगत होता, " सुलभा आस्थेनें चौकशी करते एकदोनदां दिवसांतून ! नंतर ती कामाला निघून जाते. मी जवळ राहण्याचा प्रयत्न करतो; पण मला त्यांची मनांतून भीति वाटते लहानपणीं मनाची घडण झाली, ती आतांही कायमच आहे ! त्यांना मी केव्हां हवा असतो, हें मला कळत नाहीं. अशा वेळीं ते त्रस्त होतात. मी जवळ जातों, तेव्हां ते मला म्हणतात, उगाच कशाला बसलास ? जा आपल्या उद्योगाला ! माझें भित्रें मन तेवढ्याच पडत्या फळाची आज्ञा घेतें. बाहेर चैन पडत नाहीं आणि आंत आप्पांच्या जवळ मला दमही निघत नाहीं. "

आपल्या पहिल्या वसंतांत आतां आकाशपाताळ इतका फरक पडला आहे. आप्पांची तो मनापासून काळजी वाहातो आहे. त्यांच्यावरील त्याचें प्रेम

दिसून येत आहे; या गोष्टीं पाहून चारुशीलेला तशाहीवेळीं केवढें समाधान वाटलें ! किती प्रेमानें तिनें आपल्या भावाकडे त्यावेळीं पाहिलें.

मंडळी निघून गेली. वसंतानें चारुताई आल्यानें आंत जाऊन आप्पांना सांगितलें. चारुशीलेनें प्रथम आंत जाऊन हातपाय तोंड धुऊन, मंदाकिनीला हाताला धरून मग ती आंत गेली ! आप्पांना पाहून तिच्या पोटांत धस्स झालें ! आप्पा म्हणजे नुसते अस्थिपंजर उरले होते !

आपल्या चारुला पाहून आप्पांनीं किंचित् हास्य केलें. " आलीस ? " असें म्हणत जवळ बसायला आप्पांनीं लेकीला आग्रह केला. ती जवळ बसली. तिच्या पाठीशीं मंदाकिनी बसली !

" बरं वाटतंय आतां ? " चारुशीलेनें त्यांच्या कपाळावर हात ठेवित बळेंच हंसरी मुद्रा करीत विचारलें.

" तूं आलीस त्यामुळें बरं वाटलं ! " आप्पा हंसून उतरले. पण नंतर त्यांनीं आपल्या प्रकृतीचा विषय सोडून, तिची, पंडिताची, प्रसादची आणि निशिगंधांचीसुद्धां चौकशी चालविली. मंदाकिनीला जवळ बोलावलें. गादीच्या कोपऱ्याखालचे चार बेदाणे तिच्या हातीं दिले. चारुशीलेला पाहून आप्पांना अतिशय आनंद झाला होता. तो त्यांच्या मुद्रेवर स्पष्ट झळकत होता. त्यांनीं तिच्याकडे किती वेळ तरी टक लावली होती. लाडक्या लेकीकडे काय इतकें निरखून निरखून ते पाहात होते कोण जाणें ! " तूं भेटलीस. तृप्त झालं माझं मन ! आतां कसलीच आशा उरली नाहीं आपल्याला ! "

असेंच जणुं काय त्यांना तिला सुचवावयाचें होतें !

बोलून बोलून त्यांना खूप थकवा आला होता. आजारानें उचल केली. त्यांच्या जीवाची घालमेल व्हायला लागली ! चारुशीलेला बघवेना ! " काय करूं ? आप्पा असें कां करतां ? " घाबऱ्या आवाजांत तिनें त्यांच्या आंगावरून हात फिरवीत विचारलें. हाताच्या खुणांनीं त्यांनीं तिला " घाबरूं नको ! " असें सुचवून आपणच धीर दिला !

आप्पांना पाहिल्यापासून चारुशीलेच्या डोळ्यांचें पाणी खळेना ! ती आल्यापासून आप्पा तिला आपल्यापासून क्षणभरही हलूं देईनात ! वसंताला त्यामुळें तितकेंच हलकें वाटूं लागलें ! आप्पा तिच्याशीं किती किती बोलत राहायचे ! तिच्याकडून त्यांना जेव्हां कळलें, कीं पंडित सत्याग्रह करून तुरुंगांत

गेले आहेत, निशिगंधही लवकरच जाणार आहेत. तेव्हां ते म्हणाले, " तूं नाहीं का सत्याग्रह करणार ? पुरुषांच्या बरोबरीनें तुम्ही बायकांनीं देश-कार्य केलेंच पाहिजे ! मला भेटायला आलीस, ठीक झालं ! माझा मोह आतां तुम्हांला सोडलाच पाहिजे. तूं सत्याग्रह करायचें ठरविलं नसशील तर ठरव. खुशाल जा ! जरूर सत्याग्रहांत जा ! मला आनंद होईल तूं सत्याग्रह केलास म्हणजे ! "

तिच्या मनांत तें नव्हतें का ? पण आप्पांना तिला आतां सोडवेना !

चारुताईशीं आप्पा कसें वागतात, हें पाहिल्यानंतर वसंत तिला म्हणाला " ताई, तूं खरीच भाग्यवान् ! गायीनें वांसराला दूध द्यावें, गोंचिडाला तिच्या कांसेचें रक्त मिळावें, यांत वावगें काय ? आप्पांना मी ओळखलें नाहीं तुझ्यासारखें ! मी त्यांच्या आयुष्यांत एकंदरीनें गोंचीडच ठरलों ! "

आप्पांची प्रकृती दिवसेंदिवस ढासळत चालली ! चारुशीला, वसंत आणि वेळ मिळेल त्याप्रमाणें सुलभाही आप्पांच्या सुश्रुषेंत मुळींच हयगय होऊं देत नसत ! जरा हुशारी वाटून बोलावेसें वाटूं लागलें कीं, आप्पा चारुशीलेशीं बोलूं लागत.

— " म्हातारी सुंद्रा देवाघरीं गेल्याचें सांगून, सुटली बिचारी म्हणावें. सूनबाई आतां पुष्कळच निवळली आहे. समाजकार्यांत गुंगली आहे. तिनें शाळा काढली आहे; तिला एक, बी. ए., बी. टी., टी. डी. एच्. डी., या उच्च उच्च पदव्यांनीं विभूषीत झालेली हुशार आणि कर्तबगार महिला मिळाली आहे. ती आपल्या संस्था सगळ्यांच्या सहकार्यानें ऊर्जीतावस्थेला निश्चित आणणार. " असें सांगून समाधान व्यक्त करावें. –नाग्या नालायखच निघाला. या लोकांना शेतांतली काबाडकष्टाचीं कामं उरकत नाहींत. हे लोक किती पिढ्यानंतर सुधारणार देव जाणें ! म्हणून हळहळावें. –सरशी शाळेंत नोकरी धरून आहे. आपल्या पायांवर उभी आहे. ठीक आहे ! असें म्हणून तिच्याबद्दल सहानुभूति दाखवावी. वसंत शेतवाडीकडे पाहूं लागला आहे. जुळत नाहीं त्याला. पण मन घालतो. प्रयत्न करीत असतो.

— त्याला समजूत आली आहे. पुष्कळ झालें ! त्यानं पुष्कळ करावं असं वाटे ! पण आपल्यांतला प्रत्येक प्राणी आपल्या इतका सुधारेल, योग्य वागेल, तर स्वराज्य कोणी द्यायला कशाला पाहिजे आपल्याला ?" असें म्हणून

आप्पांनीं आकाशाकडे दृष्टि लावावी! आप्पाचें रोज हेंच चाले नी तें सर्वजण एकनिष्ठेनें ऐकून घेत!

—एक दिवस उजाडला! आप्पांनीं सकाळींच साऱ्यांना जवळ बोलावलें. आपल्याला बसते करविलें. आणि सांगितलें, "आज तुमचा आप्पा तुमच्यांतून जाणार. आणखी तासाचा अवकाश आहे! कोणी रडायचं नाहीं. दुःख करायचं नाहीं. मला जातांना आनंद आहे! तुम्हीं आनंद मानायला हवा! तुम्हीं आपापल्या कार्यांत रत रहा. यापेक्षां मला तुम्हांला जास्त कांहीं सांगायचं नाहीं!" आणि खरेंच, नंतर त्यांनीं कांहींच सांगितलें नाहीं, भगवत्‌गीतेचे श्लोक म्हणायला सुरुवात केली. पाठ चालूं असतांच आप्पा एकाद्या महान् साधुप्रमाणें स्वानंदीं निमग्न झाले!

चारुशीलेनें आणि वसंतानें आकांत केला! सुलभाही रडूं लागली! मंदाकिनी पण रडायला लागली! जग रहाटी खरी, पण ती अशा दुःखद प्रसंगीं सर्वांना सारखी रडायला लावतेच ही अशी!



विवाहपूर्व सहवासाचा योग अनायासेंच आल्यामुळें, प्रसादच्या मनाचें परिवर्तन द्रुतगतीनें होत होतें. बिजूला तर प्रसादसुद्धां त्याचें घर आपलें असेंच वाटूं लागलें होतें! गोड वाणीनें, सरळ चालीनें आणि निरागस कृतीनें बिजूनें प्रसादचा मनोदुर्ग जिंकलाच होता म्हणाना जवळ जवळ! प्रसादचे आजोबा आजोळीं अत्यवस्थ होते—निवर्तलेही ते. पंडित 'ब' वर्गांत असले तरी तुरुंगांतच रखडत होते; पण अपारदर्शक भिंतीच्या पल्याड—डोळ्यांआड—कसलेंही हृदयाचा ठाव घेणारें कृत्य घडत असलें, तरी मनावर साक्षात् परिणाम होऊं शकत नाहीं, आपल्या व्यवसायांत अंतराय सहसा येत नाहीं, हें जसें, तसेंच आजोबांच्या मृत्यूचा किंवा वडिलांच्या तुरुंगवासाचा परिणाम प्रसाद—बिजूच्या प्रेमसंवर्धित करणाऱ्या दैनंदिनीवर विशेषसा आघात करीत नव्हता!

बिजूशीं बोलतांवागतांना व आपल्याशीं तत्परतेनें वागणाऱ्या बिजूच्या होणाऱ्या सूक्ष्म हालचालीवर बारीक नजर ठेवतांना, बिजू दर दिवशीं आपल्या हृदयावर अधिकाधिक ताबा ठेवित चालली आहे, असें प्रसादला, केव्हांपासून तें सांगतां येणार नाहीं, पण कळूं लागलें होतें. त्याच्या हृदयरंगभूमीवरून

त्याला हवी असणारी, आवडणारी शहाणी, आतां त्याच्या आणि तिच्याही दृष्टीनें कायमची पडद्याआड झाली होती. शहाणी त्याला आवडत होती. तो बिजूला आवडत होता. शहाणी कधीं कधीं त्याच्या मनापुढें येई. तो बिजूच्या डोळ्यासमोर एकसारखा असे! आणि केव्हांही पहा, तिचें आपलें हंसतमुख नी लाडिक बोलणें प्रसादच्या दृष्टीसमोर खेळत असायचें!

— तो त्रासलेला दिसला, काळजीची छटा किंचित् जरी त्याच्या मुद्रेवर वावरतांना आढळली, तरी त्याला चहा देत असतां किती मर्यादेनें नी कळकळीनें तिनें "आज असं कां तोंड उतरलय! किती तरीं कचेरींत काम पडतं नाहीं?" असें त्याला विचारावें! मनापासून आपली काळजी वहाणारें सुंदर माणूस आपल्याला कां आवडणार नाहीं?

चाणाक्ष दृष्टीच्या धूर्त निशिगंधांचें लक्ष प्रसाद–बिजू या दुकलीवर पहिल्यापासून चांगलेंच होतें. आपली बिजू प्रसादच्या मनाचा "गड" सर करीत चालली आहे, हें ते पहात होते. गड आला पण सिंह गेला या इतिहासाची पुनरावृत्ति कशी होणार नाहीं, याबद्दल दक्षता ठेवणें निशिगंधांना जरूर होतें. त्यासाठीं म्हणा, किंवा प्रसादाला 'प्रफुल्ल' चालविण्याची अवघ्या अंगांची पुरेपूर माहिती व्हावी म्हणून म्हणा, त्यांनीं सत्याग्रहांत शिरण्याचें कायमचें टाळलें नाहीं तरी नांव देण्याचें कालावधीवर टाकलें इतके खरें!

तसेंच चारूवहिनी माहेरहून परत येईपर्यंत बिजूवर घरकामाचा साराच भार पडतो आहे, तो कमी पडावा याकरितां म्हणा किंवा बिजूला प्रसादच्या आवंतीभोंवतीं जास्तींत जास्त जितका वेळ घोंटाळतां येईल, तितका वेळ तिला मिळावा, म्हणून म्हणा निशिगंधांनीं कधीं नव्हे तें, चारुवहिनी माहेरीं जातांच, आपल्या वृद्ध आईला पत्र पाठवून मुद्दाम बोलावून घेतलें होतें. आईच्या हातचें सुग्रास खायला फारा वर्षांनंतर आपल्याला मिळूं लागलें. याबद्दल निशिगंध वारंवार आनंदोद्गार काढूं लागले. तर आपली आते स्वयंपाक घरांत शिरतांच मिळालेल्या वेळाचा बिनतोड उपयोग बिजू करूं लागली. म्हणजे प्रसादबरोबर बोलण्यांत नी त्याच्याबरोबर सिनेमाला जाण्यांत करूं लागली. तिच्या वागण्याकडे पाहून म्हातारीनें केव्हां केव्हां आपल्या लेकाजवळ "हे रे काय बाबू! बिजू इथं आल्यापासून फारच बिघडलेली दिसतेय. तरण्याताठ्या पोरींनीं लग्न व्हायच्या अगोदर असें वाईट दिसण्या-

सारखं वागणं चांगलं नाहीं ! " अशी कुरबूर करायला सुरुवात केली होती.

आईचें ऐकूनही निशिगंध कांहींच बोलत नसत. केव्हां तरी नुसतें हंसत. फारच झालें तर एकाद्या वेळीं, "तुला, मला काय करायचं आहे त्याच्याशीं ? *तुका म्हणे उगे रहावें । जें जें होईल तें तें पहावें ।* हा अभंग नेहमीं म्हणतेस तरी पुन्हां असल्या चौकशा करतेसच कां ? " असें म्हणून हंसत ! आई बिचारी गप्प बसे. तिला खरेंच वाईट वाटतें असें दिसलें म्हणजे त्यांनीं तिला म्हणावें, " आई, आजकालच्या मुली अशाच वागायच्या ! आतां तुझ्या वेळचा काळ आहे का ? आणखी एक सांगतों. आपली बिजू तशी ही नाहीं. प्रसादला आपल्याशीं लग्न करायला लावल्याशिवाय सोडीत नाहीं. लक्षांत ठेव ! लग्न झाल्यानंतर आपल्याला कसें वागावें लागणार आहे या घरांत, त्याची रंगीत तालीम ती करून पाहाते आहे, अशा दृष्टीनें तिच्याकडे पाहूं या म्हणजे झालं आपण ! "

नेहमींप्रमाणें ठरल्या दिवशीं 'प्रफुल्ल'ला द्यायला अनंतशास्त्री ज्योतिषी कचेरींत आठवड्याचें भविष्य घेऊन आले. 'प्रसाद'च्या टेबलावर त्यांनीं कागद ठेवले. औपचारिक विचारपूस केली, नंतर गप्पा झोडायला ते निशिगंधांच्या खोलींत शिरले. त्यांनीं शास्त्रीबोवांपुढें दोन कुंडल्या केल्या आणि म्हटलें, " शास्त्रीमहाराज, चावटपणा न करतां या कुंडल्या कितपत जुळतात त्या पहा नी सांगा. भरभक्कम दक्षणेशिवाय; तुम्ही नीट पाहणार नाहीं, हें मला ठाऊक आहे. आपली संभावना चांगली होईल ही माझी ग्वाही आहे. आतां पहा ! "

शास्त्रीबुवांनीं डोळ्यावरचा चष्मा कपाळावर चढवून दोन्ही कुंडल्या पुष्कळ वेळपर्यंत काळजीपूर्वक पाहिल्या आणि ठाम निर्णय दिला, " छत्तीस गुण जमतात. यांचें लग्न होणार ! उषा–अनिरुद्धाच्या कुंडल्या आहेत या. त्यांचें जमविणार नाहीं म्हणून कोणी कितीही जंग जरी पछाडलें तरी कोणाचें चालावयाचें नाहीं ! आणि वधूची कुंडली तर अशी आहे म्हणतां महाराज ! कीं काय सांगूं ? या पोरीच्या पायीं वराचा भावी खरा भाग्योदय आहे ! ती महालक्ष्मी आणि तो भगवान् विष्णु, असेंच का समजाना ! "

निशिगंधांना भविष्य ऐकून बरें वाटलें.

" पण वधू कोण आणि वर कोण ? " शास्त्रीबोवांनीं पृच्छा केली.

आपल्याला संभावना कोणाकडून मिळणार आणि किती मिळणार, हें अजमावता यावें, म्हणूनच निशिगंधांकडे त्यांची ती पृच्छा असावी !

" वर ? " निशिगंधांनीं शेजारच्या खोलीकडे अंगुलीनिर्देश करून मूक खुलासा केला.

" संपादकांचें लग्न ? वाः ! उत्तम ! मग आम्हांला लवकरच मोतीचूर यथास्थित चुरायला मिळणार म्हणतां ? छान ! संतोष आहे ! आनंद आहे ! " शास्त्रीमहाराज बेहोष होऊन म्हणाले. गडगंज संभावना होणार ही खात्रीच झाली त्यांची. त्या भरांत ते मोठ्यांदा बोलले. शेजारच्या खोलींतील प्रसादला सहज ऐकायला जाईल, इतका त्यांचा आवाज मोठा होता. तें प्रसादनें ऐकलें. त्यानें कान टवकारले ! पण आणखी शंका येऊन इकडे शास्त्रीबुवांनीं डोळे चमकावित किंचित् हलक्या स्वरांत निशिगंधाना विचारलें, "पण प्रेमाच्या पाठीमागें धावणारे आपले तरुण संपादक त्या वधूशीं लग्न करायला तयार आहेत काय ? "

शास्त्रीबुवांनीं खालच्या आवाजांत केलेल्या प्रश्नाला निशिगंधांनीं मुद्दामच प्रसादला ऐकायला जाईल, इतक्या मोठ्या आवाजांत त्यांना उत्तर दिलें ! त्यांना प्रसादचा अंदाज घ्यायचा होताच. पण हलवून खुंटा बळकटही करावयाचा होता; म्हणून ते म्हणाले, "आमचा प्रसाद ना ! याच मुलीशीं लग्न करणार ! तुम्ही पत्रिका जुळविल्यात म्हणून नव्हे, तर तो माझ्यासारखा दुर्दैवी नव्हे म्हणून ! "

" म्हणजे ? " शास्त्रीबोवांनीं मध्येंच पृच्छा केली.

" म्हणजे काय ? माझ्यावर एक सुंदर तरुणी प्रेम–खरें प्रेम–करीत होती. मला तें माहीत नव्हतें. मी दुसरीच्याच मागें होतों. माझ्याशीं आपलें लग्न होत नाहीं, मी लग्न करायला तयार नाहीं. हें कळलें तेव्हा त्या मुलीनं विहिरींत जीव दिला. ही गोष्ट मी तुम्हांला पुष्कळदां सांगितली आहे. तें कळलें म्हणून मी आजन्म ब्रह्मचारी राहिलों ! प्रसादच्या या वधूचें तसेंच आहे; प्रसादवर मनापासून प्रेम करते, मला ठाऊक आहे. प्रसाद आपल्याशीं लग्न करणार नाहीं, असें जर तिला कळलें तर ती खास रूळाखालीं घालून घेऊन जीव दिल्याखेरीज राहणार नाहीं ! इतकें तिचें त्याच्यावर प्रेम आहे, हें हें त्याला माहीत आहे ! शिवाय तो आतां चांगलाच पोळून शहाणा झाला

आहे. आवडत्या जिवाला रूळाखालीं लोटून तो जन्मभर आपल्यावर ब्रह्मचर्य पाळण्याची कष्टप्रद पाळी येऊं देणार नाहीं !" निशीगंधांनीं हा असा सुदीर्घ खुलासा करून टाकला !

याप्रमाणें बोलून इकडे दोघेही हंसले !

तिकडे प्रसादनें तें सर्व ऐकलें ! हातांतील पेन खालीं ठेऊन तो दोन्ही हातांनीं आपले केस विंचरीत विचारमग्न झाला !

त्यानंतर एकदोन दिवसांनींच, प्रसादनें, मनांतून शहाणीला निःशेष काढून टाकण्यासाठीं, पवित्र कर्तव्य म्हणून एक सहानुभूतिपूर्ण सुदीर्घ पत्र पाठविलें शहाणीला. कृष्णानें द्रौपदीशीं, तसें त्यानें शहाणीशीं भगिनीचें नवें नातें कायम केलें. बिजूशीं लग्न करायला निःशंक, निश्चित असा मार्ग मोकळा करून घेतला. बिजूच्या निर्मळ शुद्ध पवित्र प्रेमाचा– अधिकार, आपल्या हृदयावर चालूं देण्याचें प्रसादनें मनोमन नक्की करून टाकलें !

कैलासवासी आप्पांचें और्ध्वदैहिक यथासांग पार पडल्यानंतर कांहीं थोड्या दिवसानींच चारुशीला परत आली ! वसंताच्या आणि सुलभेच्याही प्रेमळ अत्याग्रहावरून ती मंदाकिनीला कांहीं दिवसाकरितां तिकडेच ठेऊन आली होती. चारुशीलेला आपल्या घरांतील वातावरण कसें आहे तें हळूं हळूं समजलें. तिला बरें वाटलें. अत्यानंद होण्यासारखी तिच्या मनाची अवस्था होती कुठें ? पंडित तुरुंगांत आजारी पडले. त्यांना डायरिया झाला. त्यांची तिथें दरक्षणीं प्रकृति ढासळत होती. नियमाप्रमाणें निशिगंध, प्रसाद आणि बिजूदेखील आग्रह धरून पंडितांना दोन तीनदां तुरुंगांत भेटून आली होती. चारुशीला आल्यावर, पुन्हां सगळींच आणखी एकदां तिच्यासुद्धां भेटायला गेलीं ! खरोखरीच पंडितांची शोचनीय अवस्था झाली होती ! पण पंडित मात्र निष्काळजी दिसले ! त्यांच्याबद्दल फारच गवगवा झाला. तेव्हां सरकारांनीं त्यांची लवकरच बिनशर्त मुक्तता केली. पंडितांचा निश्चय मात्र, प्रकृति नीट होतांच, पुन्हां सत्याग्रह करावयाचा अगदीं कायम होता. तें त्यांनीं बोलूनही दाखविलें होतें. पंडितांना घरीं आणण्यांत आलें. त्यांची प्रकृति सावकाश सुधारूं लागली ! एक दिवस सर्व मंडळी एकत्र बसली असतां, प्रसादनें प्रफुल्लचें काम चांगलें केल्याचे निशिगंधानीं पंडितांना कळवून त्यांना फार संतोषित केलें. प्रसादला उत्तेजित केलें. पुन्हां

सत्याग्रहाच्या गोष्टी निघाल्या. आप्पांच्याबद्दल पंडितांनीं फार चांगले उद्गार काढले ! निशिगंधांनीं गंभीर विषयाला कलाटणी दिली. पंडिताचें लक्ष वेधावें म्हणून ते जवळ असलेल्या बिजूला म्हणाले, " बिजू, आम्हीं लवकरच पुन्हा तुरुंगांत जाणार आहोंत; त्या अगोदर ' प्रसाद ' ला चतुर्भुज व्हायचें आहे ! तुला पसंत आहे कां तो !" ऐकून ती लाजून तेथून पळालीच ! त्यांनीं 'प्रसाद' कडे सहेतुक पाहिलें. तो मुकाटयानें तेथून उठून गेला ! पंडितांना समजलें. चारुशीलेला उमगलें ! दोघांनाही बरें वाटलें ! " ठीक आहे असें झालें तर ! " पंडितांनीं हलक्याच शब्दांत आपलें मत दिलें ! प्रसादनें " वैदिक पद्धतीनें अगदीं थोडक्यांत — समारंभाशिवाय व्हावें " असें चिठ्ठीनें कळवून बिजूशीं लग्न करायला आपली कबूली दिली !

बिजूचे आई, वडिल आले. लग्न प्रसादच्या मनाप्रमाणें झालें ! बिजूला सुखाच्या अत्युच्च शिखरावर चढल्याचा आनंद झाला ! प्रसादच्या टोलेजंग मुंजीच्या समारंभाप्रमाणें लग्नसमारंभ झाला नाहीं. पण त्याबद्दल चारुशीलेलाही विशेष वाटलें नाहीं. कोणाच्याही आयुष्यांत साऱ्या वेळीं सारख्याच येत नाहींत, ही जगरहाटी कायमचीच नाहीं का ?



प्रसादच्या लग्नाचा योग, त्याचे दोहींकडील आजोबा वारल्यानंतर आणि लवकरच आला. आप्पा असते तर किती बरें झालें असतें, असें चारुशीलेला वाटल्याशिवाय कसें राहणार ? तरीही आपलें ताजें दुःख विसरूनसुद्धां वसंत मात्र सुलभेसह प्रसाद–बिजूच्या मस्तकांवर मंगलाक्षता टाकण्याकरितां उभाउभी यायला चुकला नाहीं.

लग्न झालें. बिजूच्या वडिलांनीं आनंदाश्रूंच्या भरल्या डोळयांनीं व कंठ भरल्या शब्दांनीं जायच्या वेळीं पंडितांना सांगितलें, " बिजूबद्दल मी निष्काळजी झालों. तिचें भाग्य तिनेंच काढलें. आपल्या घरीं ती पडली. आपण तिचा स्वीकार करून मला पुनित केलेंत !" जुनीं माणसें असेच खरे उद्गार काढीत !

बिजूच्या आईनें, वयाची वडीलकी विसरून, चारुशीलेच्या पायांला स्पर्श करून पदरानें डोळे पुशीत म्हटलें, " माझी लेक आतां तुमची आहे. सुनेला लेकीसारखी वागवा, असं सांगणंसुद्धां तुमचा अपमान केल्यासारखं

होईल हें मी जाणतें. आमच्या बाबूमुळें आपल्या सारख्या थोर घरीं माझी बिजू पडली. नाहीं तर आम्हां गरिबांना नुसतं या घरीं डोकावतां तरी आलं नसतं कधीं !"

आपल्या मामा-मामीबरोबर, प्रसाददादाच्या लग्नाला मंदाकिनी आली होती. पण जातांना ती रहातेय कुठं आईजवळ ! ती त्यांच्या बरोबर जायला निघाली. तिच्या मामा-मामींनीं थोड्या दिवसांत तिच्यावर काय इतकी जादू केली कोण जाणें ! सुलभेला सोडून ती आपल्या आईजवळसुद्धां रहायला तयार होईना !

"कशाला तिला नेतोस वसंत ? मला एकेकट वाटतं. करमत नाहीं." असें चारुशीला वसंताला म्हणाली तेव्हां त्यानेंही खुलासा केला, "सुलभेचंही तसंच झालं आहे. आम्हांला मूल नाहीं. सुलभेला मुलाची हांव विलक्षण. काम करून ती घरीं आली, म्हणजे घरांत तिला उभं वारं सुटतं. चिडते, रागावते. माझ्याशीं उगाचच भांडते ! मुलं होत नसलेल्या पण आपल्याला व्हावींत असं वाटत असलेल्या बायकांचं असंच होतं. मंदाकिनी आमच्याकडे आल्या-पासूनच तिचा तिला लळा लागला आहे. तीही मामीवर खूष आहे. ती म्हणते, हीच आपली मुलगी. हिला शहाणी करूं. विलायतेला पाठवूं. मलाही ती जवळ असली म्हणजे बरं वाटतं ! आणि मंदाकिनी जवळ आहे, तेव्हां-पासून सुलभेच्या उगाच रागावण्याच्या वेडालाही चांगला आळा बसला आहे. म्हणून तिला परत न्यायची. दुसरें काय ? मंदाकिनी तुझीच आहे. तिच्यावर आमची सत्ता आहे थोडीच ? मंदाकिनीला आम्हीं घेऊन गेलों तरी तूर्त तुला नव्या सूनबाईचा विरंगुळा आहेच ना ?"

त्यावर मग चारुशीला काय बोलणार ! दिली तिनें परवानगी !

बिजू साऱ्यानांच आवडली होती. तशी ती सुलभेलाही पसंत पडली. प्रसादजवळ सुलभेनें बिजूबद्दल फार चांगले उद्गार काढले ! आपल्या आव-डत्या मामीचें बिजूबद्दलचें मत ऐकून प्रसादला त्यांतल्यात्यांत विशेष समाधान झालें !

बिजूच्या आई वडिलाबरोबर निशिगंधाची आई जायला निघाली. पण 'बिजूच्याकरितां थांबा कांहीं दिवस,' असें बिजूच्या आईनेंच तिला सांगितलें. पाठराखणीसारखी राहिली बिचारी ! जुन्या माणसाची समजूत ! आज-

कालच्या मुली लहान का असतात नी त्यांना पाठराखणी कां लागत असते? —त्यांना कुणाची कशाला गरज असणार ? निशिगंधांनीं तर प्रसाद-बिजूला कांहीं दिवसाकरितां 'मधुचंद्रा'साठीं मुंबईला सरदारगृहांत राहण्याची खास योजनासुद्धां आंखली होती ! चारुशीलेचा होकार होता. पंडितांची ना नव्हती, पण प्रसादला समजलें तेव्हां त्यांनेंच नकार दर्शवून, निशिगंधांना त्यांचा तो बेत रहित करायला भाग पाडलें होतें, ती गोष्ट वेगळी !

प्रसाद—बिजूच्या एकांत भेटीच्या दिवशींची गोष्ट !

चारुशीला उदासच होती. पण निशिगंधांच्या आईची विशेष चुळबुळ चालू होती. आपल्याला आज विशेष प्रकारानें नटलें—सजलें पाहिजे, असें बिजूला वाटत नव्हतें ! राजाला नित्य दिवाळी, त्याप्रमाणें आजकालच्या पोरी रोजच सणासुदीसारख्या जामानिमा करतात ! मग बिजूला रोजच्यापेक्षां निराळे काय करावयाचें होतें ? निशिगंधांची आई संध्याकाळीं स्वतः वेणी घालणार होती—रंगीबेरंगी लुगडयापेक्षां, पांढरें स्वच्छ तलम पातळ, बिजूला नेसायला सांगण्याचा म्हातारीचा इरादा होता. प्रसादच्या खोलींत शिरल्यावर हंसतमुख कसं ठेवायचं ? प्रसादशी लाजून कसं बोलायचं ? वगैरे वगैरे, म्हातारी बिजूला किती तरी समजावून सांगणार होती —

पण म्हातारी स्वयंपाकांत गढली. त्यांतून तिला बाहेर यायलाच किती उशीर झाला. आणि ती बाहेर आली, त्यावेळीं बिजू आपण होऊनच, सराइतासारखी माडीवर प्रसादाकडे केव्हांच गेली होती, असें तिला आढळून आलें ! म्हातारीला अचंबाच वाटला !

पण खरी आणि परीक्षेची वेळ होती ती प्रसादच्या बाबतींत ! बिजूचा त्याचा परिचय होता. दोघांची बोलणीं झालीं होतीं ! कोणीकोणाला अपरिचित राहिलें नव्हतें ! धर्मसत्तेनें बिजू प्रसादची पत्नी झाली होती. प्रेमाची खरी सत्ता आजपासून उभयतांच्या हृदय साम्राज्यांत प्रस्थापित व्हावयाची होती ! भीतीचें, चोरटेपणाचें, आचरटपणाचें, अमर्यादेचें, आतां कोणालाच प्रयोजन उरलें नव्हतें ! धर्ममान्य, राजमान्य आणि लोकमान्य तसा प्रेममान्यही उघडा दरबार खुला होण्याचा तो वख्त होता ! निःसंकोच मनानें, निर्मल—प्रेममय हास्याचें चांदणें उधळीतच बिजू प्रसादच्या समोर येऊन उभी राहिली !

तिनें प्रसादकडे किती मोहक प्रेमाचा कटाक्ष फेंकला ! प्रसादच्या सर्वांगांतून

झणझणत विद्युत्प्रवाह सणकला ! घामानें डबडबला तो; त्याला बोलायचें होतें. पण मनाप्रमाणें शब्द तोंडांतून बाहेर येईनात ! हास्याचें प्रतिहास्यानें स्वागत करावयाचें होतें; पण आलेलें हास्य त्याच्या ओठावरच थबकलें ! बिजूला– आपल्या सत्तेच्या बिजूला–आपादमस्तक स्निग्ध दृष्टीनें न्याहाळण्यासाठीं, त्याची दृष्टि वळली. पण कां कोण जाणें, ती हां हां म्हणतां बिजूच्या चरणा-जवळच खिळली ! आपला अनिरुद्ध आपल्याला अवघ्या अंगांनीं मिळाला ! आपला झाला ! या आनंदानें बिजूला वेडें केलें होतें. त्याच्याशीं काय बोलूं, कशी बोलूं, कशी वागूं ? असें तिला होऊन गेलें होतें ! तिची चपळ दृष्टि सारखी त्याच्या आवर्तीभंवती तरळत होती ! तो आपल्याला केव्हां जवळ करील ? कपोलावर प्रेमाची मुद्रा कशी उठवील ? त्यावेळीं, चमकन् आपल्याला कसें चमकल्यासारखें होईल ? आपल्या खोट्या, लाडक्या नकाराचा खरा–प्रेमाचा होकार असल्याचें, तो कृतीनें केव्हां सिद्ध करील ? अशांत ती गुंग होती ! तिचें शुद्ध सौंदर्य उमलत्या गुलाबाला खालीं पहायला लावील, असें विलसत होतें !

आणि प्रसाद ? त्याच्या मनाच्या स्मशानांत, ताईसाहेब, कुसुम देशमुख, आणि शहाणी यांच्या स्मृतींचीं पिशाच्चें अखेरची अगतिक धडपड, धिंगाणा घालीत होतीं ! 'ताईसाहेब' चांगल्या कीं बिजू ? कुसुम देशमुख उत्तम कीं बिजू ? शहाणी उत्कृष्ट का ही ? तीं पिशाच्चें खिदळत होतीं. दांत विचकीत होतीं. त्याला हिणवीत होतीं ! बिजूच्या पायांपासून कटीपर्यंत प्रसादनें पाहण्याचें धाष्टर्य केलें ! नसानसांतून कोणाहीपेक्षां बिजू शतपटीनें श्रेष्ठ आहे, असें त्याला वाटलें ! उरोजापासून मुखमंडलापर्यंत त्याच्या भित्र्या, कृतापराधी मनाच्या दृष्टीनें प्रवास संपविला ! बिजू सगळ्यापेक्षां हजारपटीनें सरस, सुंदर आहे, अशी ग्वाही बिजूच्या देहसौंदर्यानें प्रसादला त्यावेळीं देऊन टाकली !

दृष्टीला दृष्टि भिडली ! चार डोळ्यांचें मीलन झालें ! त्याचें देहभान हरपलें ! ताईसाहेबांच्या, कुसुमच्या किंवा शहाणीच्या दृष्टींत, आपली चिमुकली प्रतिमा त्याला कधींच स्थिर झालेली दिसली नव्हती ! तें उदात्त, मनोरम्य दृश्य खरोखरीच बिजूच्या विशालनेत्रांत स्थिरावलेलें त्यानें पाहिलें !

बाकीच्या तरुणींच्या मागें प्रेमानें वेडा होऊन प्रसाद धावत होता. त्यांनीं याच्या डोळ्यांत आपल्या प्रतिमा पाहिल्या असतील किंवा नसतील. पण

बिजू प्रसादलाच काय, पण त्याच्या फोटोला पाहून त्याच्यावर भाळली होती. तिनें आपल्या प्रेमाचें—सर्वस्वाचें दान त्याला मनानेंच करून टाकलें होतें. मग त्या तिच्या प्रेमळ दृष्टींत प्रसादला आपली बाहुली स्थिरावलेली न दिसेल तरच आश्चर्य नव्हतें का ? शिव–शक्तीची खरी भेट हीच होती !

प्रसादनें बिजूला आपल्या बाहुपाशांत केव्हां घेतलें, हें त्याला समजलें नाहीं. त्याच्या हातांतून सोडविण्याचा खोटासुद्धां आणि किंचित् देखील प्रयत्न केला कीं नाहीं, हें बिजूलाही कळलें नाहीं !

प्रसाद–बिजू प्रेमानें एकरूप झाल्यानंतर, ताईसाहेब, कुसुम देशमुख आणि शहाणी सावर्डेकर, यांच्या दुबळ्या स्मृतिपिशाच्च्यांनीं कायमची गति न घ्यावी तर काय करावें ? आपला नुसता शरीरसंबंध झाला आहे, मानस-विवाहाची येथें प्रचिती मिळाली नाहीं, असा समज करून, मन खिन्न होण्याचा प्रसंग आपल्याला आला आहे, असें प्रसादला दुसरें दिवशीं वाटलें नाहीं ! तो प्रसन्न, हंसतमुख, असाच दिसला ! कालचेंच अमृतमय–निरंतरचें हास्य बिजूच्या मुखावर खेळत होतें. प्रसाद आपल्या उमद्या हास्यानें बिजूच्या खेळकर हास्याचें सुंदर स्वागत करीत होता.



बिजू आपल्यावर सतत प्रेमाची हुकमत चालवीत असते, हें प्रसादला समजत होतें ! आणि मौज ही कीं, तो ती तिची प्रेमाची हुकमत निमूटपणें नी आनंदानें शीरोधार्यही करूं लागला होता.

बिजूच्या अविट प्रेमळ सहवासांत वागणाऱ्या प्रसादला दिवसाच्या व्याव-हारिक उद्योगांत कोण अफाट उत्साह वाटूं लागला होता ! त्याची धडाडी, तत्परता आणि जोम हीं घरांतील वडिलधाऱ्या साऱ्यांनाच प्रतीत होऊं लागली !

आणि केवळ घरांतच नव्हे, तर वसंतसुलभेपर्यंत आणि बिजूच्या. आई-वडिलांच्या कानांपर्यंत, चारुशीला–पंडित लवकरच आजी–आजोबा होणार आहेत, ही सुवार्ता कशी हां हां म्हणतां पोंचली होती म्हणतां ?

# प्रकरण दहावें

अनंत काळाची चाल अखंड चालू असते. मानवी आयुष्य मात्र एकाद्या मोठया स्वप्नाप्रमाणें असतें. स्वप्न केव्हां आणि कसें संपतें, हें जसें कळत नाहीं तसेंच माणूस काल असतें तें आज कसें नाहींसें होतें, हेंही उमगत नाहीं. ऐन उमेदीच्या काळाला प्रत्येकाला वाटत असतें, कीं आहे हें नवें जग आहे. नवयुग आहे पण रोज सूर्योदयापासून सूर्योदयापर्यंत कालचक्राचा एक लहानसा फेरा संपतो आणि तो काल अल्पबुद्धि मानवाला बजावीत असतो, जुन्याचा काळ जुना–नव्या काळ आजचा ! हें नवयुग आहे ! हेमंत ऋतूंत झाडांचीं पिकलीं पानें सुकून, वाळून, गळून पडतात. वसंत ऋतूंत त्या झाडांना नवीं सुंदर, नाजूक, हिरवीं हिरवीं पानें येतात ! डोळ्याचें पातें लवण्याच्या आंत नव्या जगाचें जुनें जग होतें ! नव्या जगाचीं आशादायक पावलें वाजत असलेलीं ऐकूं येऊं लागतात ! मावळल्याबद्दल शोध होत असला तरी तो आवरून त्याकडे पाठ वळते, उगवत्याचें स्वागत हंसत मुखानें करण्यास जग तयार असतें ! काळ, निर्विकार मनानें मानवी आयुष्यांत नेहमीं एकसारख्या असंख्य घडामोडी बिनहरकत करीत असतो !

या अशा घडामोडी पहायला फार दूर जायचें कारण नाहीं कांहीं ! एका क्षणाला मनसोक्त हंसायला लावणाऱ्या तर दुसऱ्या क्षणीं अश्रूंचा महासागर निर्माण करणाऱ्या घडामोडी प्रसादच्या प्रपंचांत बघतां बघतां किती नी कशा झाल्या पहा ना ? प्रसादला मुलगा झाला ! साऱ्या घरभर आनंदाचें साम्राज्य पसरलें ! बिजूचा कुसवा धन्य झाला ! तुरुंगांतून आल्यापासून पंडितांची

प्रकृति दररोज खालावत चालली होती. क्षीण होत चालली होती; तरी प्रसाद प्रपंचाचें जोखड तोलूं शकतो हें पाहून आणि त्याचें बाळ घरभर रांगूं खेळूं लागलें हें पाहून ते मनापासून संतोष अनुभवित होते! पंडितांच्या ढासळत चाललेल्या प्रकृतीमुळें चारुशीलेला काळजी सारखी मनांतून जाळीत होती. तरी प्रसादच्या बाळाला न्हाऊं धुवूं घालण्यात, खाऊखेळणीं करण्यात आणि भरविण्यात दिवस उगवतो कधीं आणि मावळतो केव्हां हेंही समजून येत नव्हतें! तसेंच आपला पूर्वीचा प्रसाद निवळला—नीट मार्गाला लागला, याचें सुखही तिला कमी वाटत नव्हतें! आणि अनुभविक शेतकऱ्याच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे, कसलाही अवखळ खोंड असला, तरी तो बैल झाला, त्याला धुरीला जुंपला, तो निमूटपणें धुरी ओढूं लागला, म्हणजे तो वठणीवर आला, अडें जसें म्हणतात, तसेंच प्रसादचेंही झालें होतें.

कालमानाप्रमाणें आंवतींभंवती पाहून प्रसाद आपल्या व्यवसायांत—पंडित, त्रिशिगंध यांचा सल्ला घेऊनच आवश्यक ते फेरफार करीत होता! पण पंडितांच्या लेखणीची सर आणि तेज हीं त्याला कशीं येणार? प्रकृतीच्या विकृतीमुळें पंडितांना लिहिणें शक्य नव्हतें. म्हणून प्रसादनें आपलें प्रफुल्ल चालतें आहे तेथपर्यंत चालूं ठेवावयाचें असें ठरविलें; नी त्यांतलें मन काढून आपल्या छापखान्याचा व्याप वाढविण्याचें धोरण ठेविलें! नांवाचा लोभ सोडला. पैशांचा मोह धरला! त्यांत त्याला लवकरच यश येणार अशी खात्री वाटूं लागली. सकाळपासून संध्याकाळपर्यंत छापखान्यांत राबावें लागत असल्यामुळें, बिजूशीं बोलायला त्याला फारशी फुरसद मिळेना, तर तो पंडितांच्या प्रकृतीची चौकशी करणार केव्हां आणि आईजवळ क्षणभर बसून सुखदुःच्या चार गोष्टी बोलणार कशा?

—मनासारखा पैसा मिळत असलेल्या धंद्यांत माणूस एकदां रंगला म्हणजे असेंच होते! —आणि जीवन संगीत मनासारखें जमावयाला भरपूर पैशांचें पाठबळ असल्यावांचून कसें चालणार?

ऋजूमार्गानें स्वतःच्या मनगटाच्या बळावर पैसा मिळवितां येऊं लागला. आतां प्रसादला आपलें नवें जग रम्यतर दिसूं लागलें! पण असें असूनसुद्धां तो जुन्या जगाला नांवें ठेवीत नसे!

बिजूला केव्हां केव्हां लहर येई; प्रसादनें कामाचा जरा खोळंबा करून

आपल्याजवळ बसावें. 'कुमारा'ला आपल्या देखत घेऊन त्याचे लाड करावें. तसें चिन्ह दिसेना म्हणजे ती त्याचा मार्ग आडवी. बळेंच त्याच्या मांडीवर कुमाराला देई आणि हंसत विचारी,——

" सांगावं ना गडे, आपला कुमार कुणासारखा दिसतोय ? "

" तूंच सांग ? तुझ्यासारखा ? "

" सासूबाई म्हणतात, आजोळच्या आजोबासारखा दिसतोय ! "

" आणि कुमारचे आजोबांना (पंडितांना) वाटतें कीं हा आपल्या वडिलांची प्रतिमा आहे ! होय ना ? "

" पण आपल्याला कसा दिसतो ? तें सांगावं ना ? "

—कांहीं कोणी म्हटलें तरी अखेर निर्णय नेहमीं अनिर्णितच राही !

—पहिलीं वहिलीं सुखाचीं तीनचार वर्षे कशीं भुर्रकन निघून गेलीं.

तेवढयांत, बिजूला आणखी एक अपत्य मिळालें. तिसऱ्याच्या शुभागमनाचीं चिन्हें दृग्गोचर होऊं लागलीं !

" आतां तुमचा सुमार सुटत चालला पोरांनो ! असेंच शेवटपर्यंत चालेल तर बेजार व्हायची पाळी येईल ! सरळ शकुंतलाबाई परांजपे यांचा आश्रय करा ! कांहीं करा. पण यापुढें तुमचे हे व्याप थांबणें जरूर आहे ! " निशिगंधांनीं हंसत हंसत प्रसादची आणि बिजूची अशा प्रकारची थट्टा करायला कमी केलें नाहींच !

आणि खरोखरच बिजूच्या बाबतींत असेंच झालें होतें ! दोनच स्थितींत ती दिसावयाची नेहमीं एकदां बाजेवर नाहीं तर दुसऱ्यांदा अवघडलेली !!

आपल्या आईला तसेंच आपल्या बिजूलाही सकाळसंध्याकाळ रांधावाढा उष्टीं काढा, असें करावें लागूं नये म्हणून प्रसादनें घरांत स्वयंपाकीणबाई ठेवली आणि वर कामाला नोकरही नेमला.

पंडितांनीं व्यावहारिक जगांतून आंग काढलें तत्त्वज्ञानाचें वाचन आणि मनन यांतच त्यांचा जास्तींत जास्त काळ जाऊं लागला. निशिगंधही त्यांच्या समवेत वाचीत, चर्चा करीत. पण प्रसाद कुठें चुकतो कीं काय ? कोणी त्याला फसवतो कीं काय ? हें पाहाण्याकडे त्यांचा नेहमींप्रमाणें ओढा होताच !

कुमार आणि प्रकाश—प्रसादचीं हीं दोन मुलें केव्हां केव्हां पंडितांच्या अंगावर लोळून, खाऊ खेळण्याचा हट्ट धरून, किंवा आपल्याबरोबर खेळण्याचा आग्रह करून खूप उच्छाद करीत ! पंडितांचें वाचन, नातवांच्या अशा बालिश खेळांनीं थांबे ! पण ते त्यांच्यावर कधींच रागावत नसत ! उलट त्यांच्याबरोबर खेळत. त्यांच्याशीं समरस होत ! अशा शांत, प्रसन्न वातावरणांतही कांहीं दिव्यसौख्य आहे, असें त्यांना वाटे ! आपण पडद्याआड गेलों आहोंत, नव्या जगाला आपली आठवण राहिली आहे कीं अजिबात विसर पडला आहे, याचें स्मरणही पंडितांना होत नसे कीं त्याबद्दल खंतही वाटत नसे !

प्रसादच्या संसारसाम्राज्यांत मंदशीतल अशी सुखदशी वाऱ्याची झुळझुळ वाहात होती ! पण त्याच वाऱ्यानें एकाएकीं मध्येंच वादळाचें स्वरूप धारण केलें. अचानक एक दिवस वसंत—सुलभेकडे उत्साहानें शिकत असलेल्या आणि भराभर वरच्या वर्गांत प्रविष्ट होत असलेल्या मंदाकिनीला ताप भरला. तिनें अंथरूण धरलें. तापांत तिची बडबड सुरू झाली. त्यांत आपल्या आईचा तिनें एकसारखा घोष चालविला. इकडे वसंतकडून काळजीचें पत्र आलें. चारुशीलेला त्यानें ताबडतोब निघून येण्यास लिहिलें ! पंडित आजारी. त्यांच्या पथ्याचें, औषधपाण्याचें संभाळण्याचें काम चारुशीला निरलसपणानें करीत होती. मंदाकिनी आजारी आहे, हें कळल्यावर तिला पाणी प्यायला देखील थांबणें शक्य नव्हतें ! चारुशीला जायला निघाली. पंडितांनींहि आग्रहपूर्वक तिला जायला सांगितलें. आपल्याबद्दल काळजी करण्याचें कारण नाहीं. सूनबाई सारें कांहीं व्यवस्थित करील. तिला आतां आपली तब्येत माहीत आहे. ती चुकायची नाहीं. असें शांतपणें सांगून पटवून दिलें. आपण लवकरच मंदाकिनीला जरा बरें वाटतांच आपल्याबरोबर घेऊन येणार असें चारुशीला म्हणाली. जीवावर धोंडा ठेवल्यासारखें झालें होतें तिला जातांना ! पण निघाली. कुमार तिची पाठ सोडीना. तो पण ‘ आजी मी येणार तुझ्याबरोबर ! ’ म्हणत रडत बसल्यावर, ती तरी काय करणार ? कुमारला घेतलें तिनें आपल्याबरोबर ! चारुशीलेनें पहिली गाडी गांठली ! मन पंडिताकडे आणि जीव मंदाकिनीकडे असें झालें होतें चारुशीलेचें !



मंदाकिनीचा ताप उतरला होता. आपल्या आईला पाहिल्यावर तिच्या तोंडावर हंसूंही झळकलें! कुमारला तिनें आपल्या अशक्त हातानें जवळ ओढलें नी त्याला पापा मागितला. त्यानें तोंड पुढें केलेंसें करून चटकन् मागें नेलें नी हंसत, तिच्या हातून तो निसटला. चारुशीलेनें मंदाकिनीचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें होतें नी हलक्या हातांनीं तिला ती थोपटीत होती. किती बरें वाटत होतें आईच्या प्रेमळ थोपटण्यामुळें मंदाला !

त्याच वेळीं दारांतून एक पांचसहा वर्षांची लहान गोडशी पोर आपल्या नीट-नेटक्या घातलेल्या वेणीवरून चिमुकला हात फिरवून चांदणीसारख्या लकाकणाऱ्या डोळयांनीं मंदाकिनीकडे आणि अनोळखी दिसणाऱ्या चारुशी-लेकडे नी कुमारकडे पहात होती ! अजून तिच्याकडे चारुशीलेचें लक्ष नव्हतें. मंदाकिनी डोळे मिटूनच पडून होती. त्या पोरीला मग विचारणार कोण ? कुमा-रचें तिच्याकडे प्रथम लक्ष गेलें ! त्या चिमुरड्या पोरीनेंही कुमारला न्याहाळलें ! काय वाटलें असेल दोघांना त्यावेळीं कोणास ठाऊक ! कुमार आपल्या आजीच्या पाठीवर जाऊन पडला. चारुशीलेनें वर पाहिलें. तिच्या दृष्टीस दारांतील बालिका दिसली. चारुला किती छान दिसली ती ! गोरी गोरी पान ! कपाळ कसें भव्य ! डोळे किती तेजस्वी ! नाजुक नी निरुंद जिवणी ! गुलाबी गुबगुबीत गाल ! चाफेकळीला लाजविणारे नाक ! डाळिंबाच्या फुलाच्या रंगाचे लालबुंध ओठ ! तलम काळ्याभोर केसांच्या दोन बाजूच्या कानामागून, सुट-लेल्या वेण्या, आंगांतला भारी किमतीचा फ्राक ! चारुशीला त्या बालिकेला पाहून चकित झाली ! भारी भारी आनंद झाला तिला पाहून चारुशीलेला !

कुमारनें हळूंच आजीच्या कानाजवळ तोंड नेऊन विचारिलें, "ती कोण ग आजी ?" चारुशीलेनें अत्यंत प्रेमळ शब्दांत तिला म्हटलें, "ये बाळ ! आंत ये ! कोण हवं आहे तुला ?"

धीर करून ती बालिका आंत येऊं लागली. तिचे लक्ष मंदाकिनीकडे होते.

"कुणाची तूं ?" चारुशीलेनें उत्सुकतेनें विचारलें.

"आईची !" चटकन् तिनें उत्तर दिलें. चारुशीलेला हंसू आलें.

"तुझं नांव काय ग बाळ ?" लाडका प्रश्न चारुशीलेनें हंसत केला.

"माझं नांव होय? देशमाने किशोरी !" तेंही तिनें झटकन् सांगून टाकलें. आतां मंदाकिनीनें डोळे उघडून किशोरीकडे पाहिले व "ये ग किशोरी !"

म्हणत तिला जवळ बोलावलें. आपलें ओळखीचें नी आवडतें माणूस; अन् त्यानें हांक मारली. किशोरी किती झपाट्यानें मंदाकिनीजवळ गेली म्हणतां!

" मंदाताई ! बरं वाटतंय तुला आतां ? " किशोरीनें किती मायाळूपणानें विचारलें. मंदाकिनीनें माननेंच तिला ' होय ' म्हणून सांगितलें. मंदाकिनीनें किशोरीला जवळ घेत आपल्या आईला सांगितलें, " आमच्या बाईंची ही मुलगी ! हिचं नांव किशोरी. किती गोड नी चुणचुणीत आहे म्हणतेस ! अन् माझ्यावर तिची अतिशय माया पण आहे ! "

" तें पाहिलंच मी आतां " अशा अर्थानें दोघींकडे पहात चारुशीला नुसती हंसली.

" आमच्या बाई—त्यांचं नांव शोभनाबाई देशमाने आहे. अतिशय चांगल्या शिकवतात बघ ! आम्हां सगळ्या विद्यार्थीनींत, बाई फार–फार आवडत्या आहेत ! " मंदाकिनी आपल्या आवडत्या बाईंची आईला माहिती देऊं लागली.

चारुशीलेनें नुसतें " हं " म्हटलें. ती अजून किशोरीकडे पहात होती. कुमारनेंही तिच्याकडे टक लावली होती. तो तर तिच्याशीं बोलायला अगदीं उतावळा झाला होता !

आपल्या बरोबरीचें भेटलें म्हणजे मुलें गट्टी करायला किती उत्सुक असतात ? किशोरीलाही पण तसें झालें होतें ! आंतरकोऽपि हेतु म्हणतात, तें याचसाठीं कीं नाहीं ?

" बाईनीं धाडलं तुला किशोरी ? " मंदाकिनीनें हंसून विचारलें.

किशोरीनें डाव्या खांद्यावरून उजव्या खांद्यावर डोकें टेकवीत " होऽऽ" म्हटलें. आणि मग आपणच सगळें सांगूं लागली; " तूं आजारी झालीस. शाळेंत आली नाहींस. आई म्हणाली मंदाताई आजारी आहे. मग मी किती किती रडलें ! "

" कां ग ? " मंदाकिनीनें हंसून अधिकच मायेनें तिला जवळ घेऊन म्हटलें.

" तूं आजारी कां झालीस म्हणून ! " किशोरी म्हणाली.

" मी पण रडलों ! माझी आई पण रडली ! आल्याबरोबर हो ! " कुमाराच्यानें रहावेना ! त्याला इसाळ आला ! त्यानें पण एकदम सांगून

टाकलें किशोरीकडे पहात पहात ! मंदाकिनीला आणि चारुशीलेला तें ऐकून हंसतां हंसतां पुरेवाट झाली !

" आमचा हा किशोर तुला छान आहे ना ग खेळगडी ! " मंदाकिनीनें किशोरीला म्हटलें. किशोरी मान डुलवीत नी हंसत ' होऽऽ ' म्हणाली !

" अन् तुला रे किशोर ! कशी आहे आमची किशोरी मैत्रीण ही ? " मंदाकिनीनें कुमाराला विचारलें ! तेंच तर त्याला हवें होतें केव्हांपासून !

मंदाकिनीनें दोघांची मैत्री करून दिली. मुलांना काय ? हां हां म्हणतां मुलांची गट्टी जमली ! हातांत हात घालून खिदळत दोघेही खेळायला पसार झालें तिथून केव्हांच ! आणि त्या दिवसांपासून त्या दोघांचा खेळाचा धुडगूस सुरू झाला. कुमार तिला सोडायचा नाहीं. किशोरी पण कुमाराला विसंबायची नाहीं. ती कुमारकडे यायची तशी कुमाराला पण रोज आपल्या घरीं न्यायची ! इकडे असलीं म्हणजे सुलभेनें दोघांना जेऊं घालावें. किशोरीच्या घरीं कुमार जाई, तेव्हां शोभना, आपल्या एकुलत्या एका लेकीच्या खेळगड्याला, तिच्या बरोबरीनें खायला दिल्याशिवाय कशी राहील ?

किशोरीला प्रथम पाहिलें तेव्हां चारुशीलेला जसें झालें, तसेंच कुमाराला किशोरीबरोबर प्रथम पाहिलें तेव्हां शोभनेची पण तशीच गत झाली ! कुमार शोभनेला किती किती आवडला पण पाहतांक्षणीं ! किशोरीचा खेळगडी म्हणून आणखी जास्त ! तो कोण—कोणाचा--कां आला आहे, याविषयीं मात्र चौकशी करण्याचें शोभनेच्या मनांत फारसें आलें नाहीं. नसत्या चौकशा करायला तिला वेळ तरी कधीं असे ?

महिन्यापंधरा दिवसांत मंदाकिनीला जेव्हां आतां चांगलें बरें वाटूं लागलें, चारुशीला परतायची घाई करूं लागली. मंदाकिनीला नेणार म्हणून तिनें वसंताला सांगितलें. पण मंदाकिनीच निघायला तयार होईना. तिची परीक्षा जवळ आलेली. शाळेंतील हुशार विद्यार्थीनी ती ! कोण सोडणार तिला ?

सुलभा जरा खट्टू मनानेंच म्हणाली, " जा हवी तर मंदाला घेऊन चारु तूं ! मी नको नेऊं म्हणणार कोण ? किती झालें तरी मातीचे चिकटविलेले कुल्ले ! गळायचेंच कधीं तरी असें ! " हे ऐकून चारूला वाईट वाटलें !

किशोरीच्या देखतच दोघींची हीं बोलणीं चाललीं होतीं. तिला वाटलें

कुमार जाणार नी मंदाकिनीही जाणार ! हट्टाच्या लाडिक स्वरांत सुलभेला किशोरीनें म्हटलें, " नको हो मावशी ! मंदाताईला पाठवूं नी कुमाराला पण ! मला कसं गमेल हो मग, हे गेले म्हणजे ? "

सुलभेला किशोरीनें ' मावशी ' म्हटल्याचें ऐकून चारुशीलेला मौज वाटली ! सुलभेच्या लक्षांत आलें. ती म्हणाली. " कांहीं नको विचार करूंस ! मी गांवमावशी झालेय ! गांवांतल्या सगळ्या मुलां-मुलींची मी ' मावशी ' आहें ! मंदाची मामी आहे ! मला जगांतली सगळीं आपलीं वाटतात ! पण माझं असं कुणीं नाहीं बरं कां या जगांत ! तूं माझी आहेस. तुला सोडणार नाहीं. असं कोण म्हण-णार आहे मला मायेनें ! " अन् तिच्या डोळ्यांत टच्कन् पाणी आलें ! चारुशीलेला कसेंसेंच झालें ! 'आपण एकटी जात्यें,' असें तिला निमूटपणें म्हणणें आलें ! शेवटीं वसंत–सुलभा यांच्या मतानें असें ठरलें कीं, चारु-ताईनेंच इतक्यांत जाऊं नये. मंदाची परीक्षा होईल. सुट्टी पडेल. तेव्हां कांहीं दिवस सगळ्यांनींच तिकडे राह्यला जावें ! पंडितांच्या प्रकृतीकडे लक्ष लागल्यानें चारुशीलेचा जीव टांगला होता. पण वसंताच्या आग्रहापुढें नी सुलभेच्या हट्टापुढें तिचें कांहीं चाललें नाहीं. आणखी तिला रहावें लागलें.

—एक दिवसाआड पत्रें येत होतीं. उत्तरें जात होतीं. पंडितांची प्रकृती खरी सुधारत होती कां बिघडत होती कोण जाणें ! प्रसाद मात्र साऱ्या पत्रांत, 'सर्वांच्या प्रकृती चांगल्या आहेत. काळजी करूं नये ' असेंच लिही. फारच झालें तर ' पंडितांची प्रकृती काल जरा जास्त होती. आज उतार आहे.' असें कळवी इतकेंच! मंदाकिनीचा परीक्षेचा अभ्यास जोरांत चालू होता ! वसंत आपल्या शेत कामांत दंग होता. सुलभेच्या 'महिला चळवळी' जोमांत होत्या. अधूनमधून आपलें कार्य दाखवायला चारुताईला सुलभा आवर्जून आपल्या बरोबर घेऊन जाई !

चारूशीला बाहेरून दाखवीत नव्हती. पण तिला बरेंच वाटत नव्हतें. कणकण येई. आंग मोडे ! तोंड कडू होई ! जेवण जाईना ! असें होतां होतां, एक दिवस ती अगदीं उन्हातान्हांतून सुलभेबरोबर बरीच हिंडून आली. येतांक्षणी ढसढसा गार पाणी प्याली. आणि त्याच संध्याकाळीं तिला सणसणून ताप भरला ! तिनें तसेंच अंथरुण धरलें ! वसंतानें डॉक्टरला

आणलें. सुलभा सारखी जवळ बसूं लागली. तिच्या आजाराचें दोनतीन दिवस डॉक्टरलाही नक्की निदान करतां आलें नाहीं. अखेर चवथ्या कीं पांचव्या दिवशीं चारुशीलेचा ताप दूषित आहे हें निश्चित झालें !

वसंत घाबरला ! प्रसादला पत्र पाठवितों म्हणाला ! पण तिकडे सगळेंच घाबरतील. पंडितांच्या आजारावर जास्तच परिणाम होईल. म्हणून इतक्यांत कळवूं नकोस, असें सांगून चारुशीलेनें त्याला मोडता घातला !

दुसऱ्या दिवशींच्या प्रसादच्या पत्रांत पंडितांचीं प्रकृति विकोपाला गेल्याचें वर्तमान आलें ! चारुताईला खरें कळविण्याचें वसंताला धाडस होईना ! किशोरी आणि कुमार ! त्यांना कसलीच कल्पना नाहीं. त्यांचे स्वच्छंद खेळ चालूं होतेच !

—चारुशीलेच्या दूषी तापाचा नववा दिवस उजाडला ! काळरात्र आली. नाडी सुटली. पायापासून शरीर गार पडत चाललें. वसंताच्या काळजीचा, सुलभेच्या सुश्रुषेचा मंदाकिनीच्या रडण्याचा, डॉक्टरी उपायांचा, कसलाही उपयोग झाला नाहीं. कालपर्यंत, "प्रसादचें पत्र आलं का ? स्वतःची प्रकृति कशी आहे ? माझ्याबद्दल कळवलं नाहीं ना ? कुमार जेवला का ? मदाताई रडूं नकोस ! मी उद्यां बरी होणार आहे !" अशीं कांहीं शुद्धींत—तर केव्हां गैरशुद्धींत चारुशीलेची बडबड चालूं होती ! पण तें सर्व हळूं हळूं बंद होत होत—शेवटीं रात्रीं बाराच्या पुढें चारुशीलेनें अनपेक्षितरीत्याच इहलोक सोडला !

तिचें मस्तक आप्पांच्या तसबिरीखालीं, पाय आईच्या तसबिरीकडे. शुद्धींत असतांना त्या दोन्हीं प्रतिमांकडे एकाग्र दृष्टीनें चारुशीला पहात असे ! तिचा जन्म ज्या ठिकाणीं; पंडितांचा 'अनोळखी पाहुणा' म्हणून ज्या जागेंत प्रथम चहा तिनें त्यांना दिला, त्याच ठिकाणीं, चारुशीलेनें आपली आयुष्याची अखेर यात्रा पुरी केली ! आपली पाठची प्रेमळ बहिण गेल्याची तशी प्रसादच्या माथ्यावरील मातृप्रेमाचें प्रेमळ छत्र कायमचें नष्ट झाल्याची, दुःखद चित्तानें, जड हातानें आपल्या सहीची प्रसादला तार करण्याचें वसंताच्या नशिबीं आलें !

  

एका प्रख्यात मराठी नव्या बोलपटाचा उद्घाटन समारंभ प्रसादच्या हस्तें होता. वैयक्तिक काळज्या आणि चिंता असल्या तरी सार्वजनिक जीवनांतल्या जबाबदाऱ्या टाळतां येत नाहींत, कीं त्या मोठेपणा देणाऱ्या अर्थात् आनंद-दायक असतात, म्हणून असल्या जबाबदाऱ्या माणसांना हव्याशाच असतात. कोण जाणें ! प्रसाद अतिशय आनंदांत होता इतके खरें ! उद्घाटन समारंभ त्यानें उत्तमप्रकारें पार पाडला ! छोटें पण सुंदर भाषण केलें. बरोबर विजू होती. तिच्या गालांवर गुलाब फुलले ! प्रसादला, आपण स्वर्गसुख अनुभवतों, असें वाटलें ! तो त्याच आनंदांत घरीं परतला ! आणि त्याच वेळीं त्याची आई–चारुशीला–निवर्तल्याची वसंताची तार त्याच्या हातीं पडली ! प्रसादला मस्तकावर वज्राघात झाला असें झालें !

आपली पाठची सख्खी बहिण गेल्याइतकें निशिगंधांना दुःख झालें ! आणि पंडितांना ? त्यांना तर आपल्यावर आकाशच कोसळलें असें वाटल्यास आश्चर्य काय ? सहनशीलतेचा सागर हेलावला ! धैर्याचा मेरुमांदार कंपायमान झाला ! आज कित्येक वर्षांत, केव्हांही, कधींही, कसल्याही कठीण प्रसंगीं, पंडितांच्या डोळ्यांतून पाणी गळलेलें कोणी पाहिलें नव्हतें ! त्यांना शांति-ब्रह्माचा नवा अवतार समजत ! सदाप्रसन्न नी हंसतमुख ! पण आज ? हाय ! त्यांची प्रेमळ सहचरी–त्यांची जिवंत पुण्याई–त्यांची भाग्यदेवता आज त्यांना टाकून गेली ! शेवटची भेट नाहीं. मंदा आजारी म्हणून कळलें काय ? चार दिवस जाऊन येत्यें, असें म्हणून चारुशीला गेली काय ? दोन दिवसाखालींच साधारण बरें वाटत नाहीं तिला, असें वसंताचें पत्र येतें काय, नी आज ही अशी तारेनें विपरीत वार्ता वाचावी लागते काय ? सारें स्वप्ना-सारखेंच झालें ! निशिगंधांना नी प्रसादलाच काय, पण खुद्द पंडितांनाही ती दुष्ट वार्ता खरींच वाटेना ! विश्वास बसेना ! पण अशा प्रकारच्या वाईट वार्ता खोटया ठरत असतात कां कधीं ?

पंडित एकांतीं मात्र खूप– खूप रडले ! "माझी पुण्याई सरली नी आयुष्यां-तली आपली कामगिरीहि संपली ! " डोळ्यांतून अविरत अश्रुवर्षाव करीत, अथंरुणावर अंधारांत रात्रभर बसून राहून, पंडित हे असे कितींदां म्हणाले असतील, हें त्यांचें त्यांनाच माहीत ! निशिगंधांच्या गळ्यांत पडून प्रसादनें तर एखाद्या अजाण अर्भकाप्रमाणें हंबरडाच फोडला ! "माझी आई गेली ! आपण

तिला काडीचें सौख्य देऊं शकलों नाहीं !" असें त्याला म्हणायचें असेल, पण शब्द कुठले बाहेर फुटतात? प्रसादच्या ह्रबरड्यानें निशिगंधांच्या हृदयाचा ठाव घेतला ! तें कसें त्याला समजावणार ? कोणाला कधीं तरी हें साधलें आहे का ? सुखाच्या काळाची धाव वाऱ्यालाही मागें सारते. दुःखाची चाल इतकी मंद असते कीं, बोलायची सोय नाहीं. आणि सुख नेहमींच बहुधा एकेकटें येतें आणि मागें वाघ लागल्याच्या घाईनें भर्रकन् निघूनही जातें ! दुःख कधींच एकटें येत नाहीं. त्याची ती रीतच नव्हे ! मोठ्या परिवारासह येत असतें तें बिऱ्हाडाला. तळ ठोकून राहतें. आणि जायला निघालें तरी त्याचीं पावलें अत्यंत सावकाशपणानें उचललीं जातात! प्रसादच्या प्रपंचांत दुःखानें असाच प्रवेश केला ! येतांक्षणीं, डोळ्याचें पातें लवण्यापूर्वीं त्याच्या आईला त्यानें उचलली ! क्रूर काळ त्याच्याकडे निर्दय नजरेनें पाहून हंसत होता. तो प्रसादला हंसून सांगूं इच्छित होता, कीं, हा दुःखाचा आरंभ आहे. मृत्यू एकाद्याच्या घरांत एकदां शिरला, म्हणजे एकाद्याचा बळी घेऊन त्याची तृप्ती सहसा होत नाहीं. त्याला आणखीही हवे असतात जीव ! काळाचे कटु शब्द त्याला ऐकावयाला गेले नव्हते ! पण जें त्यानें ऐकलें नाहीं, तें त्याच्या डोळ्यांना प्रत्यक्ष पहाण्याचा लवकरच प्रसंग आला !

पंडित आजारी होतेच. बाह्यतः ते शांत, धीरगंभीर दिसत. पण चारुशीलेनंतर ते आंतून पोखरत चालले ! खोलींतल्या खोलींत त्यांच्या एकसारख्या येरझारा चालत ! निशिगंधाशीं– प्रसादशींही ते बोलत. मंदा, कुमार ( त्यांना आणविण्यांत आलें होते ) प्रकाश, यांना जवळ घेत. बोलायचेही त्यांच्याशी ! पण त्यांचें अन्न कमी झालें ! झोंप उडाली ! त्यांना त्यांचें मरण दिसूं लागलें ! एक दिवस त्यांचा रक्तदाब खूप वाढला ! चारुशीलेला जाऊन उणेंपुरे दोन महिने झाले नसतील, एवढ्यांत एक दिवस एकाएकीं बेशुद्ध झाले ते ! निशिगंधांची आणि प्रसादची विलक्षण धांवपळ झाली ! डॉक्टर आले ! डॉक्टरांनीं निर्णय दिला, पंडित फार तर चारपांच तासांचे आतां सोबती आहेत ! तत्वज्ञानाची चर्चा करीत असत, त्यावेळीं पंडित निशिगंधांना केव्हां केव्हां म्हणतः—

" नवें जग " आपली नीटनेटकी मांडामांड करीत असून " जुनें जग " संपणें निसर्गसिद्धच आहे ! " *जुनें जाऊं द्या मरणालागुनि* " असें

एका मोठया कवीनें म्हटलें आहे याच अर्थानें ! निशिगंध आणि प्रसाद पंडितांच्या जवळ सारखे बसून होते ! त्यांची दृष्टि त्या दोघांवर होती. बोलतां येत नव्हतें पंडितांना ! त्यांच्या डोळ्यांत कसला भाव होता कोण जाणें ? अखेर वेळ आली. घटका भरली ! पंडित देवाघरीं निघून गेले !

'प्रफुल्ल' चा जादा अंक निघाला, हां हां म्हणतां वाऱ्यासारखी वार्ता शहरांत पसरली ! पंडितांच्या अंत्यदर्शनाकरितां लोकांच्या झुंडीच्याझुंडी 'प्रफुल्ल' कचेरीकडे लोटत होत्या ! पंडितांची लोकप्रियताच तशी होती ! पंडित जिवंत असतांना त्यांची योग्यता व लोकप्रियता काय होती, हें प्रसादला यथार्थ समजलें नसेल, इतकें त्यांच्या मृत्यूनें त्याला एका क्षणांत कळून चुकलें ! पंडित आपले जनक होते, पण अवघ्या जनतेचे पालक होते; ते सर्वांचे आवडते, समाजाचें विश्वासस्थान होते, हें त्याला आतां उमगलें ! स्मशानयात्रा केव्हां निघावयाची, हें प्रफुल्लच्या जादा अंकांत प्रसिद्ध करण्यांत आलें होतें ! शवाच्या कपाळीं भस्म लावण्यांत आलें. तोंडात तुळशीपत्राबरोबर सोनें–मोती घालण्यांत आलें. छापखान्यांतील कामगारांनीं शवाला पहिला हार घालून, भक्तिपूर्वक अभिवादन केलें ! ठरल्या वेळीं स्मशानयात्रा निघाली. निघतांनाच खूप लोकसमुदाय होता. तो ठिकठिकाणीं मुख्य नदीला लहानसहान नद्या मिळून प्रवाहाचें पात्र विस्तीर्ण होत जातें, तसा सारखा प्रतिपावलीं वाढतच चालला होता ! स्मशानभूमीवर तो तुफानच झाला ! कित्येक वाङ्मय संस्थांनीं, कित्येक सार्वजनिक कार्यकर्त्या संस्थांनीं, आणि असंख्य व्यापाऱ्यांनीं पंडितांच्या शवास साश्रुनयनांनीं पण अत्यंत प्रेमानें असंख्य हार अर्पण करून त्यांचा सन्मान केला ! त्याकरितां स्मशानयात्रा शहरांतल्या मुख्यमुख्य रस्त्यावरून नेणें भागच होतें. त्यामुळें ठिकाणाहून निघाल्यापासून स्मशानभूमीवर पोंचेपर्यंत चांगले पांचसहा तास लागले ! शव चितेवर ठेवण्यांत आल्यानंतर, त्यांचे गुणगान करणारी बऱ्याच थोरथोर पुरुषांचीं भाषणें झालीं ! कोणी, पंडित अजातशत्रू कसे होते, हें आपल्या अनुभवाच्या शब्दांत सांगितलें; त्यांच्या कचेरींत सल्ला घ्यायला, विचारविनिमय करायला, गप्पा मारायला, सर्व पक्षांचे, सर्व पंथांचे, सर्व थरांतले लोक नेहमीं कसे येत, त्यांचा परामर्ष पंडित आपुलकीनें आणि सहृदयतेनें कसा घेत, मतें आणि व्यक्तिमत्व, कार्य

आणि खाजगी वागणूक, यांचा मेळ ते नेहमीं कसा घालीत; याबद्दल विवेचन केलें ! दुसऱ्यानें, त्यांच्या कार्याची पद्धती, लेखनाची प्रभावी शक्ति, धडाडी, देशप्रेम, आणि राजकारणाच्या माहितीचा त्यांचा अद्ययावत्पणा कसा असे, याबद्दल वर्णन करून, तरुणांनीं त्यांचा कित्ता गिरवावा — त्यांचा मृण्मय देह आपल्यासमोरून नाहींसा होत असला, तरी ते आपल्या उदात्त चारित्र्यानें आणि थोर कार्यानें निरंतर आपल्यांतच आहेत; नवें जग, त्यांच्या चारित्र्याकडे व कार्याकडे डोळे, मन, कान उघडे ठेऊन, सावधानतेनें सतत पाहात राहील, तर नव्या जगाचें कल्याण झाल्यावांचून राहणार नाहीं, असें सांगितलें. सर्वांच्या शेवटीं निशिगंध बोलले. ते बोलायला उठले. त्यांचे सर्व शरीर कांपत होतें. पाय लटपटत होते. डोळ्यांतून अश्रूंचा अखंड वर्षाव चालू होता. डोळे पुशीत, गहिंवरल्या कंठानें, ते कसेबसें बोलूं लागले ! तो उत्कृष्ट वक्तृत्वाचा नमुना नव्हता; पण प्रत्येक शब्द, तळमळून, खळबळून तोंडांतून बाहेर येत होता. त्यांच्या शब्दाशब्दानें, प्रचंड जनसमुदाय डोळे पुशीत होता.

" परमेश्वरतुल्य मित्र कसा असतो ? आदर्श पिता कसा असतो ? खरा पत्र–पंडित कसा असतो ? एकनिष्ठ देशसेवक कसा असावा लागतो ? यांचा एकमेव नमुना म्हणून मी जर कोणाकडे बोट दाखवीन तर पंडितांकडे ! ते तत्वाला कसें चिकटून असत, व्यक्तिनिंदेचा विटाळ कधीं चुकूनही त्यांनीं आपल्या लेखणीला कसा होऊं दिला नाहीं जाणूनउमजूनच नव्हे तर अजाणतांही व्यक्तीचे वाभाडें त्यांनीं काढलें नाहींत. आपल्या ' प्रफुल्ल'पत्राचा खप तडाखेबंद व्हावा,याकरितां कसल्याहि वाममार्गाचें अवलंब करण्याचें त्यांनीं कधीं मनांतही आणलें नाहीं. वर्तमानपत्रे जाहिरातींच्या जोरावर चालत नसतात. स्वतःच्या लेखणीच्या आणि खऱ्या मताच्या–प्रभावी मताच्या–जोरावर चालवून दाखवितां येऊं शकतात, हें ' प्रफुल्ल ' चालवून दाखवून सिद्ध केलें पंडितांनींच ... ... पंडितांना मताची कदर होती. व्यक्तीचें प्रेम होतें— आपल्या पत्राच्या ध्येयवाक्याला डांबर फासले न जाईल, याची डोळ्यांत तेल घालून त्यांनीं आमरण दक्षता बाळगली! टोपणनांवाचा बुरखा घेऊन प्रतिपक्षाला नेस्तनाबूद करावें म्हणून शिखंडीपणा त्यांनीं कधींहि पत्करला नाहीं !

याप्रमाणें निशिगंधांनीं आपल्या जिवलग मित्राची, साह्यकर्त्याची,

त्र्यात्याची, अखेरची सेवा, मनोभावानें, एकनिष्ठेनें, वेंचक वाङ्मयसुमनें, त्यांच्या शवावर उधळून पार पाडली !

ब्रह्मकवच फुटल्याचा आवाज ऐकल्यानंतर, सर्वंचजण ओल्या डोळ्यांनीं, दुःखी हृदयांनीं आणि मंद पावलांनीं, जवळ जवळ निस्तब्ध असे, स्मशान-भूमीवरून परतले !

जुनें मार्ग टाकीत 'नवीन'च्या प्रांतांत काल आपलें पाऊल पुढें टाकण्यांत निर्विकारपणानें दक्ष होताच !



# प्रकरण अकरावें

अवघ्या पंधरा वर्षांच्या काळांत किती तरी उलथापालथी झाल्या होत्या! शोभना देशमानेनें 'कन्या विद्यालया' ची स्वतंत्र स्थापना, मुंबईतील बी.ए., बी.टी.,टी.डी.,एच. डी. झालेल्या नी शिक्षणशास्त्रांत व कार्यांत उत्कृष्ट अनुभव घेतलेल्या अशा पाठारे प्रभु जातींतील आपल्या एका मैत्रिणीच्या सहकार्यानें स्थापना करून ती संस्था चांगलीच भरभराटीस आणली होती. संस्थेची टोलेजंग इमारतसुद्धां उभांविली होती! सामान्य जनतेला तें विलक्षण वाटण्यासारखें असलें तरी ध्येयनिष्ठ व्यक्ति निरलसपणें राबत असली म्हणजे ती असा चमत्कार सहज घडवून आणतेंच आणतें !

शोभनेची एकुलती एक लाडकी लेक–किशोरी या वेळीं वीस वर्षांची झाली होती. कॉलेजांत जात होती! किशोरीच्या अंगप्रत्यंगांतून तारुण्य नुसतें थयथय नाचत होतें. तिची मूर्ति घडवितांना तिच्या निर्मात्यानें नमुना म्हणून सुश्लोककुमारांत वर्णिलेल्या साक्षात् रतीचीच प्रतिमा पुढें ठेविली असावी. या शिवाय, किशोरी म्हणजे शोभनेचा कलिजा! हृदयाचा गाभा! आनंदी किशोरीकडे पहात पहात आपल्या कन्याविद्यालयाच्या वाढीकरितां उद्योग करीत असतां शोभनेला काडीइतकेही श्रमल्यासारखें वाटत नसे कधीं !

बरोबरच्या आणि हाताखालच्या सहकारी शिक्षकीणी शोभनेचा हेवादावा करीतच! पण ती त्याबद्दल खंत करीत नसे; सर्वांची वासलात सहज ललिनें हंसत हंसत लावीत असे! पण तीच शोभना, आपल्या लाडक्या लेकीला कांहीं एवढं तेवढं झालें, तिला कोणी बोललें, तिचा जाणून न जाणून

पाणउतारा केला, कीं तिला सारें ब्रह्मांड आठवे! पहिल्या पहिल्यानें ती तिला एकटीसुद्धां कुठें बाहेर जाऊं देत नसे. आणि त्याला तसें कारणही होतें. आपला समाज इतका सुधारलेला, आणि पुढारलेला खरा; तरी पण समाजाची दृष्टि अजूनही निवळली आहे, उदार झाली आहे असें शोभनेला दिसतच नसे!

" ही अध्यापिका चांगली आहे. कामसू आहे. कर्तबगार आहे," असें एका बाजूला, तिला ऐकायला जाईल, अशा रीतीनें जो समाज बोलायचा; तोच समाज, " ही कुंकू लावते. उंची कपडे घालते, डोक्यांत फुलें घालते; पण तिचा नवरा कुठे असतो ? तो तिच्या जवळ दिसत नाहीं, हें काय गौडबंगाल आहे ? आणि तिची किशोरी एकुलती एक लेक असली म्हणून काय झालें! काय ते लाड! काय ते थेर! नटवते काय ? पोरीला जशीं वाऱ्यावर सोडली आहे उधळायला! अन् पोरगी तर काय; एक मुलखावेगळं रत्नच आहे! केंस काय कापते, पुरुषासारखा पोषाख काय करतें ? आंगांत शर्ट काय घालते, पायांत आचरट पोरांसारखा सैल पायजमा काय चढवते ? आणि हें लोकांच्या मुलींना ज्ञानदान करणाऱ्या तिच्या आईला खपतें! मुलगी कॉलेजांत जायला लागली, म्हणून काय, अगदीं जगावेगळा आईच्या का मुलीच्या हातीं स्वर्ग आला आहे कीं काय ?"

हे आणि अशासारखेंच, लोक शोभनेला ऐकायला जाईल अशाच आवाजांत कुजबुजतांना शोभना पुष्कळदां ऐके! वाटेनें जातां–येतां ती सरळ नाकासमोर पाहून चालत असली, नी आपल्याच विचारांत गढली असली, तरी तिच्या कानांना अप्रिय असे शब्द ऐकावे लागत! तिचें मन प्रक्षुब्ध होई. पण ती प्रयत्नानें मनाचा समतोलपणा राखी! पण उमलत्या कळीला कीड लागूं नये म्हणून माळी जसा जपतो, तसें, किशोरीला आपल्या जन्माचें रहस्य कळून तिला दुःख होऊं नये, याकरितां ती किशोरीला कुत्सित कुजबुज करणाऱ्या समाजापासून फार दूर ठेवण्याची खबरदारी घेई!

किशोरी जशी दिसायला सुंदर तशीच बुद्धीनें सरस होती. कॉलेजांत हुशार विद्यार्थीनींत तिची गणना होत असे. कॉलेजच्या इतर चळवळींत ती पडत नसे. शोभनाही त्याकरितां तिला प्रोत्साहन देत नसे. ती कविता मात्र करीत असे. आणि जितक्या रसाळ कविता ती करी तशा त्या ती गाऊनही दाखवीत

असे ! एक उत्कृष्ट उदयोन्मुख गाणारी कवयित्री म्हणून किशोरी आपल्या कॉलेजांतच काय, पण बाहेरही गाजूं लागली होती. कॉलेजांतला किंवा शहरांतला सार्वजनिक गणला जाणरा वाङ्मयविषयक सभा–संमेलनासारखा समारंभ असो, त्या ठिकाणीं किशोरीचे काव्यगायन हें निश्चित असायचेंच !

किशोरीचे काव्यगायन चालूं झालें म्हणजे, ती वागते कशी, पोषाख करते कशी, सायकलवरून शहरांतल्या रस्तोरस्तीं वेळीं अवेळीं उगाचच चक्रा घालते कशी, हें कुणाच्याच ध्यानीं राहत नसे ! किशोरीच्या काव्यगायनाच्या वेळीं मंत्रमुग्ध नागाप्रमाणें श्रोते डुलत रहात इतकेंच काय, पण कोणत्याही समारोपाचे शेवटीं किशोरी " वंदे मातरम् " गीत इतक्या तन्मयतेनें आणि उत्तेजित स्वरानें म्हणे, कीं, त्यावेळीं, उभे राहून तें राष्ट्रगीत गंभीर होऊन ऐकणाऱ्या श्रोतृसमुदायाला असेंच वाटे कीं, आपल्या राष्ट्राला नवचैतन्याचा नवा संदेश देण्याकरितांच कीं काय ही कोणी साक्षात् स्वर्गांतून देवताच आपल्यांत अवतीर्ण झाली आहे ! आपल्या किशोरीचें काव्य-गायन ऐकावें अशी शोभनेला कितीही उत्कंठा असली, तरी ती तें ऐकायला जात नसे. पण काव्यगायन करून किशोरी घरीं आली म्हणजे शोभना तिची दृष्ट काढायला कधींही चुकत नसे ! किशोरीच्या कविता आवडीनें वाचणारा तिचा भगतगण फार मोठा होता. ती मंडळी एकसारखी किशोरीला आपल्याकडे बोलवायची. किशोरी त्यांच्याकडे जायला तयार असे, पण शोभनाच तिला बाहेर धाडीत नसे. मात्र तिचे मित्र नी मैत्रिणी घरीं आल्या तरी तिला चालत ! पेटीवर बसून स्वतः रचलेलीं गाणीं किशोरी मधुर कंठानें गात आहे, तिचे मित्र आणि तिच्या मैत्रिणी जिवाचे कान आणि मनाचें भान करून ऐकण्यांत गुंग आहेत, हें पाहून शोभना स्वतःला विसरून जाई ! किशोरी दमली. श्रमली. तिला भूक लागली असेल, याची जाणीव आईच्या मायाळू हृदयाला होई. ती चटकन् उठे ! स्वतः कांहीं नित्य नवे गोडधोड करी, नी " हं, पुरें झालं आतां ! आतां अगोदर खायला चला ! " असें म्हणून किशोरीला आणि तिच्या मित्र–मैत्रिणींना जवळ जवळ आंत हाकूनच नेई !



प्रसादला एकादा त्याचा जुना जिगरदोस्त फारा वर्षांनी भेटून त्यानें,

'प्रसाद' तुझे कसें काय आहे ? बरें चाललें आहे ना ?" असें खऱ्या भावानें विचारचें असतें, तर तो म्हणाला असता—

"भरपूर पैसा मिळविणारा, चारचौघांत ज्याचे नांव घेतलें जातें तो सुखी असावा म्हटलें, तर आपण त्या सर्व दृष्टींनी खास असुखी नाहीं !" मनुष्याच्या देहांतील दर सात वर्षांत अणुअणुंत बदल होतो. मनुष्याचा तो पुनर्जन्मच होत असतो; या दृष्टीनें पाहतां, माझा आतांपर्यंत तसा दोनदां पुनर्जन्म झाला आहे. अनुभवांत, आवडीनिवडीत आणि विचारांतही तशीच विलक्षण क्रांती झाली आहे ! वडिलांच्या कृपाछत्राखालीं असतांना बेजबाबदारीच्या सर्वतंत्र आनंदाची लयलूट केली. आतां मी जबाबदार झालों आहें. कुमार, प्रकाश आणि सुधा,ही मुलें माझ्या कृपाछत्राखालीं बेजबाबदारीचें सौख्य स्वैरपणानें उपभोगीत आहेत. " आणि माझी बिजू–खरोखरीच नांवाप्रमाणेंच ती अजून बिजली आहे. आकाशांत बिजली चमकते. डोळे दिपवितें, मनाला आनंद देते. पण ती जवळ आली कीं, आंग होरपळविल्याशिवाय रहात नाहीं. तिचे इतकें जवळचें सान्निध्य फार भयंकर ! तोच अनुभव माझी बिजू आमच्या संसारांत मला उठल्या बसल्या देत असते !

–ती निर्बुद्ध म्हणावी तर बुद्धीची चमक दाखविते ! सुबुद्ध म्हणावी तर आपल्या निबुर्द्ध वागणुकीनें मति गुंग करून सोडते ! मायाळू म्हणावी तर कर्कश कडकलक्ष्मीचा अवतार केव्हां घेईल याचा नेम नसतो ! तशी कर्कशा आहे म्हणून कपाळाला हात लावावा तर मायाळूपणाची साक्षात् मूर्ति तिच्यापुढें निस्तेज होते एकाद्या वेळी ! घरांतल्यापेक्षां छापखान्यांत, कारखान्यांत, किंवा बाहेरच जितका वेळ घालवितां येईल तितका बरा ! असें मला वाटतें. पण ती अशी मख्ख आहे, कीं, माझ्यापासून क्षणभर दूर राहायला तयार असत नाहीं. एकसारखी मला आपल्या नजरकैदेत ठेवण्यांस बहादूरीण आहे ती ! वैतागून रागाचा एकादा शब्द तोंडातून बाहेर पडूं द्या, कीं संपलेच ! डोळयांतून गंगायमुना लावल्याच वाहायला तिनें ! एकादा प्रेमानें शब्द बोलायला जा, ती हिरमुसलेली, रागावलेली, घुमी होऊन, खुशाल तोंडावर पांघरूण घेऊन झोपेचें सोंग घेऊन निजणार नाहीं. असें व्हावयाचेंच नाहीं !

ऐन तारुण्यांत असतांना जग प्रतिक्षणीं अत्यंत वेगानें पुढें चाललें आहे, आपणहि त्या बरोबर धांवलें पाहिजे, तरच आनंदाचें धनी होऊं असें वाटत असे, तसा वागत होतों. पण आतां मी कुठें आहे, आणि जग कुठें आहे, हेंच मला कळेनासे झालें आहे !

" घरांतल्या सगळ्यांच्या बऱ्या-वाईटाचा धनी-जबाबदार मी ! पण माझी जबाबदारी घ्यायला, माझ्याजवळ कोण आहे? जबाबदार होते त्यावेळीं त्यांची किंमत कळत नव्हती, आतां त्यांची मला हरघडी नड भासते ! एक लाडकाका आहेत; पण त्यानांही आमच्या बिजूनें घराबाहेरचा रस्ता आपल्या अधिकारांत दाखवून दिला ! आणि त्यांनींही आपल्या उतारवयांत असा कांहीं विलक्षण चमत्कार करून ठेवला आहे कीं, त्याबद्दल विचारच करतां येत नाहीं ! असें कांहीं सारेंच विलक्षण झालें आहे ! "

— आणि प्रसादच्या प्रपंचांत असें सारेंच विलक्षण न होईल तर काय होईल? पंडित वारले नी प्रपंचाचा भार त्याच्यावर एकदम पडला ! तो एकदम शहाणा झाला. जबाबदारीची जाणीव त्याला आली. तिची काळजी त्याला लागली ! चारुशीला गेली नी त्याबरोबर घरमालकीण बिजू बनली ! मोठेपणा आल्याचा तिला आनंद वाटला ! ती तोऱ्यानें नी ऐटीनें वागूं लागली ! गोगलगायी-सारखी गोजीरवाणी दिसणारी बिजू आपलें खरें स्वरूप प्रकट करूं लागली ! अगोदरच गरीबींतून श्रीमंतींत आलेली. सर्व सत्ता लवकरच हातीं आलेली. त्यांतून दोनतीन मुलांचें आईपण मिळालेलें ! बिजूचा जमाना सुरूं झाला नी घरांत एकेका चमत्काराला आरंभ झाला ! तिच्या हाताखालीं दोन दिवसापेक्षां स्वयंपाकीण टिकेना. तीन दिवसापुढें मोलकरीण ठरेना ! आणि कसलाही मुर्दाडमनाचा आणि अज्ञानदशेला आलेला चाकर असला तरी बिजूच्या तोंडाच्या तोफेपुढें आणि राबवून घेण्याच्या अस्मानीसुलतानीपुढें आठ दिवसा नंतर तग तगवील असें होईनाच !

— प्रसादची धाकटी बहिण मंदाकिनी, आपल्या हुशारीच्या बळावर आणि मामा-मामींच्या प्रेमाच्या जोरावर, पुढील उच्च शिक्षणाकरितां लवकरच अमेरिकेला गेली. ती अजून तिकडेच होती. म्हणूनच बिजूच्या करड्या अमलाच्या तडाख्यांतून ती बचावली. तिच्या प्रसादाची पहिली पाळी निशिगंधांवरच आली ! ते बिजूचे बंधू, त्यांनींच तिला आजच्या वैभव-सिंहासनावर बसवि-

लेलें ! पण शिडीला लाथाडण्यासारखे निशिगंधांच्या बाबतींत शेवटीं बिजूनें केलें ! आणि तेंही फार कठोरपणानें. त्यांच्या चारित्र्याला काळिमा फासून ! पंडित–चारुशीलेनंतर निशिगंधांना आपलें असें–जीवाचें म्हणायला कोण होतें ? आणि लगेच तें त्यांनीं ओळखलेंही होतें. त्यांचा जीव प्रसादवर आणि त्याच्या मुलांवर होता. तरीसुद्धां प्रपंचांत आतांशा विरक्तपणानेंच तें वागत असत !

—प्रसादच्या घरीं एक विधवा स्वयंपाकीण होती. गरीब, दुःखीकष्टी जीव. कामधाम झाल्यावर कधींमधीं निशिगंधाजवळ ती बोलत बसे ! त्यांनीं, तिच्या कांहीं भाऊबंदकीच्या कामांत मन घालण्याचें ठरविलें होतें. त्या कामाबद्दलच त्या दोघांचें बोलणें चाले ! केव्हां केव्हां बिजूजवळ निशिगंधांचें ती बाई आनंदानें भलेपण वर्णन करी ! त्या दोघांना एकांतांत बसतांबोल-तांना बिजूनें पुष्कळदां पाहिलें होतें. त्यांत आणखी स्तुतीची भर पडली ! झालें ! बिजूला एवढें कारण पुष्कळ झालें ! त्या स्वयंपाकीणबाईचा आणि निशिगंधांचा कांहीं निराळाच संबंध असावा, असें ज्याच्या त्याच्याजवळ बिजूनें आचरटपणानें बडबडावयास सुरुवात केली ! इतकेंच नव्हे तर बिजूनें तिला आपल्या अधिकारांत तडकाफडकी काढूनच लावलें ! इतकेंही करून ती थांबली नाहीं ! तर बायकोशिवाय असलेला–ब्रह्मचाऱ्याचें सोंग आणलेला आपला हा आतेभाऊ असला तरीही बाबूदादा, केव्हां नी काय आपल्यावर सुद्धां भलता प्रसंग आणील, हें समजत नाहीं ! आपल्याला त्याची भीति वाटते ! असें प्रसादजवळ बरळायला बिजूनें कमी केलें नाहीं ! अगोदर पुरुषांची जात आणि त्यांतही उतारवयांतच पुरुष फारच चळतात असें बिजूचें म्हणणें ! प्रसादनें मनावर घेतलें नाहीं. उलट तिला दबावण्याची पुष्कळ कसोशी केली. पण ती कां स्वस्थ बसणार ? एक दिवस तिनें तोऱ्यांत खुद्द निशिगंधा-नांच सुनावलें ! "बाबूदादा, तुला नाहीं बायको. मी घरीं अशी ही एकटी ! मला बाबा तुझी भीति वाटते ! नी तुझ्याबद्दल विश्वासही वाटत नाहीं ! कसं निभणार आपले या एका घरांत मग ?"

अभिमानी पुरुष तो ! पिवळ्या नागिणीनें चावा घ्यावा तसें झालें त्याला ! "जिथें फुलें वेंचली तिथें गारगोट्या वेंचायची वेळ आली ! आपले दिवस संपले ! आपली आपल्या बहिणीला भीति वाटते ?" निशिगंध त्या

घरांतून एका क्षणाची फुरसद न घेतां बाहेर पडले! पुन्हा त्या घरीं पाऊल ठेवायचें नाहीं, अशी त्यांनीं प्रतिज्ञा केली. प्रसाद त्यांच्या पायां पडला. लहान मुलें रडूं लागलीं. पण त्यांनीं कोणालाच जुमानलें नाहीं. "आपण कुठेंही गेलों नी कसेंही वागलों, तरी इतउत्तर आपल्याबद्दल बिजूसारख्याच कुठल्याही स्त्रिया शंका घेत राहणार!" या कल्पनेनें त्यांना भंडावलें! यामुळें म्हणा कीं, आयुष्यभर ज्या वृत्तीला जबरदस्तीनें दाबून टाकलें होतें, त्या उसळल्या म्हणून म्हणा, निशिगंध घराबाहेर पडले तरी फार दिवस एकाकी राहूं शकले नाहींत! घराबाहेर पडल्यानंतर प्रथम ज्या खानावळींत त्यांनीं प्रस्थान ठेवलें; त्याच खानावळीच्या मालकीणीनें त्यांना लवकरच आपलेंसें केलें! तेही राजीखुषीनें आणि अक्कलहुषारीनें तिच्या स्वाधीन झाले! ती वयानें तरुण नव्हती. देखणीही नव्हती. पण निशिगंधांना ती अप्सराच दिसूं लागली. तिला, त्यांच्या जवळची पैशांची जाडजूड पिशवी दिसली! लोक मात्र त्यांना उद्देशून बोलूं लागले, "हा म्हातारा या वयांत चळला! पुरुषांचा भरंवसा कोणत्याही वयांत बाळगूं नये म्हणतात; तें त्रिकालाबाधित सत्य आहे! निशिगंधांनीं नांव घालविलें. लौकिक बुडविला! आणि म्हातारपणीं खातेऱ्यांत डुकराप्रमाणें लोळण्याची याला हौस आली!—"

"जग सुधारलें पाहिजे. नीतिमान झालें पाहिजे. कर्त्यांचें रक्त शुद्ध राहिलें पाहिजे, तरच देशाचा तरुणोपाय आहे," हें जगाला सतत सांगण्यासाठीं ज्या निशिगंधांनीं पंडिताच्या खांद्याला खांदा लावून आपली तिखट लेखणी वर्षानुवर्षें 'प्रफुल्ल'मध्यें झिजविली; जगाला आपण पुढें पुढें उन्नतीच्या मार्गानें रेटीत नेत आहोंत, असा अभिमान बाळगला! त्याच निशिगंधांनीं उतार वयांत शेवटीं अशी कृति अंगिकारली कीं त्यांच्या त्या वर्तनामुळें जग कुठें आहे, हें त्यांना व इतरांना सांगताच येऊं नये!

प्रसादचा कुमार आतां एकोणीस वर्षांचा होता. तो कॉलेजांत प्रविष्ट झाला होता. प्रकाश हायस्कुलांत आणि सुधा शाळेंत जात होती! बाह्यतः सारें ठाकठीक होतें! कालमानाप्रमाणें मुलें आईचेंही ऐकत नव्हतीं आणि प्रसादलाही जुमानींत नव्हतीं! सिनेमा, हॉटेलें, जलसे, संमेलनें, गॅदरिंगज्, छोटेमोठे प्रवास—मित्र—मैत्रिणींचा मेळावा जमवणें! खाणें—पिणें आणि मजा मारणें! अशा ऐषआरामी, पण परिणामी घातुक अशा वागण्यामध्यें त्या

बेगुमान मुलामुलींचा काल मोठ्या मजेंत जात होता! त्यांना बोलणार कोण? आणि कोणी बोललें तरी बोलणाराचें ऐकणार कोण ?



आपल्या 'सोलो' मोटरसायकलवरून कुमार झपाट्यानें चालला होता रस्त्यानें! निशिगंध घरीं येत नसत; पण कुमार मात्र अधून मधून त्यांच्याकडे जात असे. ते त्याला मोकळेपणानें आणि प्रेमानें वागवीत. तोही खुल्या मनानें त्याच्याशीं बोले–वागे! आज तो त्यांच्याकडेच निघाला होता. केंस चापूनचोपून नीट बसवलेले, आंगांत अर्ध्या बाह्यांचा शर्ट आणि पायांत अर्धी विजार. मनगटावर सोन्याचें सुंदर घड्याळ! डोळ्यावर सोनेरी फ्रेमचा चष्मा! या थाटात स्वारी होती. कुमार जरी तसा जरा जास्त भडक वागत असला, आपल्या आईकडून त्यानें रूप घेतलें असलें, आणि स्वभावाची जात आपल्या वडिलांपासून उचलली असली, तरी त्याच्या आजोबांचे कांहीं खास गुणही त्यानें संपादन केले होते यांत शंका नाहीं. दिलदार, मनाचा मोकळा! गुणांचा चहाता आणि मैत्रीला सदा भुकेलेला असे तो! आईच्या वेडया धाकाबाहेर तो गेला होता. प्रसाद त्याला कधीं फारसे बोलतच नसे. तो आपल्या घरीं कधीं मित्राचा तर केव्हां मैत्रिणींचाही मेळा जमवी. स्वानुभवावरून प्रसादला आतां पुरतें पटून गेलें होतें, कीं बालपणीं मुलांना आपला बाप परब्रह्म वाटतो. पंधरा ते वीस वर्षांच्या वयांत असतांना, आपल्या बापाच्या कर्तबगारीकडे मुलें सादर कौतुकानें पाहात असतात! पुढें ऐन गद्धेपंचवीशींत प्रवेश झाला म्हणजे आपण शहाणे, आपण विद्वान, आपण सर्वज्ञ, असा स्वतःबद्दल समज करून घेऊन, बाप बेअकली आहे, असें बोलायला कमी करीत नाहींत. शेवटीं जबाबदारीचें जूं मानेवर चढलें नी त्या भारानें कंबरेची कमान झाली, म्हणजे बापानें वेळोवेळीं ज्या अनुभवयुक्त सल्ला दिल्या असतील, त्यांची आठवण येऊन, आपण समजत होतों, तसा आपला बाप बेवकूब, बेअकली नव्हता, तर खराच फार मोठा होता; अशी प्रचिती पटते! अशा रीतीनें वडिलाची वास्तव योग्यता मुलाना समजण्याची योग्य वेळ असतें. म्हणून, भलतें नी भलत्या वेळीं बोलून उपयोग नसतो! प्रसादच्या अगदीं उलट बिजूचें होतें. मुलें तिला जुमानीत नसत. पण ती मात्र त्यांना बोलतां राहात नसे.

—बिजूच्या बोलण्यानें तिचा मूळ स्वभाव मुलांना चांगला कळून चुकला होता. त्यामुळें तिच्या बोलण्याचा मुलांवर परिणाम न होतां, उलट ती हास्यास्पद होई. कुमार केव्हां आपल्या मित्र- मैत्रीणींना घरीं बोलावीं, आईला त्या वेळीं कांहीं तरी खायला- प्यायला करायला सांगे. ती तें करीही पण त्या आधीं, "तुझे थेर वाढत चालले ! तूं काय जहागीरदार आहेस कां एकादा संस्थानिक लागून गेला आहेस? वाटेल तेव्हां वाटेल त्या लोकांना, हव्या त्या वेळीं बोलावून गिळायला घालूं लागलास, तर उद्यां उलटीं अंबारी हातीं आणशील आमच्या !" हें असें कुमारला ऐकवीच ! बरें, कुमारकडे, त्याची मित्रमंडळी आली, नी त्यानें आपल्या आईकडून सगळ्यादेखत आपली शोभा व्हायला नको, म्हणून आपल्या आईला कांहीं न सांगण्याचा सावधपणा ठेवला तर, बिजू नेमकी त्या वेळीं, त्याच्या खोलींत हजर राही आणि, "काय रे हें कुमार ! इतकी तुझी मित्रमंडळी तुझ्याकडे येतात. बसतात. बोलतात. त्यांना कांहीं खायला प्यायला द्यायचं नाहीं का? असा कसा रे तूं मनाचा नी मुलुखाचा दरिद्री ! नुसत्या बोलण्यानें नी गप्पांनीं पोट भरतं वाटतं मित्रांचं ?"

—कुमारकडे त्याच्या मैत्रिणी जातां येतांना कधीं प्रसादनें सहज पाहिल्या, त्यांत कोणी ओळखीचीशी वाटली पण कोण कोणाची तें आठवेना, म्हणून बिजूला "कोण ग त्या मुली मघाशीं येऊन गेल्या ?" असें अभावीतपणानें प्रसादनें सहज विचारावें कीं झालेंच !

"कां ? दुसऱ्याच्या तरण्याताठ्या पोरींची कशाला चौकशी हवी आहे इतकी ? या वयांत शोभतं कां हें ? मला नाहीं हें खपायचं ! सांगून ठेवत्यें" असें प्रसादला लगेच ठणकावलेंच बिजूनें म्हणाना !

पोरी घरीं आल्या म्हणजे बिजूनें त्यांना कुरवाळायला कमी करायचें नाहीं, गेल्या कीं त्यांना नी आपल्या मुलांना लाखोली वहायला सोडायचं नाहीं ! घरच्या या मौजा, कुमार निशिगंधांना हंसत हंसत सांगून त्यांनाही हंसायला लावी ! आज घरीं असेंच कांहींतरी घडलें होतें, तें निशीगंधांना सांगायलाच कीं काय कोण जाणें, त्यांच्याकडे जायला कुमार निघाला होता.

अलिकडे घरापासून निशिगंधांकडे जाण्याचा त्याचा एक रस्ता ठरल्यासारखा झाला होता. कारण होतें त्याला ! एका रस्त्याच्या एका कोपऱ्यावर एक बंगला होता. त्या बंगल्याच्या माडींतून कधीं पेटीचे सुस्वर तर कधीं मधु-मधूर कंठांतून गाण्याची निघालेली गोड लकेर, कुमाराला ऐकायला येई ! रसिक बापाचा रसिक मुलगा तो ! तें गाणें पुन्हां पुन्हां ऐकावें, कोण गाते हें पहावयाला मिळेल तर काय बहार होईल ? अशा रसिक भावनेनें तो भारला होता. आणि म्हणून त्यानें तो रस्ता कायम केला होता. धावत्या मोटारसायकलवर असला तरी, जातां येतां, कुमारची दृष्टी, त्या बंगल्याच्या, डोळ्यांना आनंद देणाऱ्या, पडदे लागलेल्या त्या खिडकीकडे वळेच वळे ! आतां तसेंच झालें. त्या बंगल्याजवळ त्याची मोटारसायकल आली. पेट्रोलच्या धुरामुळें फट्फट्फट् आवाज होतोच आहे. हात पोंगा वाजविण्यांत गुंतलाच आहे आणि दृष्टि खिडकीकडे तरंगतच आहे. तशांतही गाडीचा वेग कमी करून ती कोपऱ्यावरून वळविण्याचें कुमारच्या मनाला भानही आहेच! गाडीचा वेग कमी झाला, हातांनीं ती वळविली, पण त्या वेळीं कुमारची दृष्टी खिडकीकडे वर लागलेली ! बंगल्याच्या उघडयां फाटकांतून बाहेर पडणाऱ्या सायकलीचें पुढचें चाक, कुमाराच्या मोटारसायकलच्या मागील चाकाच्या मडगार्डवर धाड्दिशीं डोळयाचें पातें लवण्याच्या आंत केव्हां आणि कसे आदळलें, धक्यानें सायकल कशी आडवी झाली, नी त्यावरील व्यक्ति हां हां म्हणतां केव्हां नी कशी जमिनीवर कोसळली आणि तिनें एकदम हृदयद्रावक करुण किंकाळी कशी फोडली, हें कुमाराच्या किंवा कोणाच्याच लक्षांत आलें नाहीं. किंकाळी कानांत पडते न पडते इतक्यांत, कांहीं तरी अपघात होतो आहे नव्हे, झाला ! हें लक्षांत येणें आणि आपली मोटारसायकल थांबवून उतरणें या दोन्ही क्रिया कुमारकडून एकदमच घडल्या ! त्या गडबडीचा परिणाम व्हावयाचा तोच झाला ! कुमारनें गाडी थांबविली शिताफीनें; पण त्याला नीट उतरतां आलें नाहींच त्याचा झोंक गेला. त्यासरसां बंगल्याच्या प्रवेशद्वाराच्या कठड्यावर जोरानें तो चांगलाच आदळला !

त्याला बराच मुका मार बसला ! त्याही स्थितींत कोणाला धक्का लागला, कोण पडले, किंचाळलें, हें त्यानें पाहिलें.

ती व्यक्ति उठून उभी राहात होती. कपडयाला लागलेली धूळ झाडीत होती. तसें त्या व्यक्तीला विशेष लागलें होतें असें नाहीं. कोण होती ती व्यक्ति ? त्या बंगल्यांत शोभना देशमाने रहात होती. किशोरी सायकलवरून बाहेर फिरायला निघाली होती ! किशोरी ! आणि कुमार ! !

दोघांनीं परस्परांकडे पाहिलें ! किशोरीनें कुमाराला मुळींच ओळखलें नाहीं ! पण कुमारनें मात्र, "अरे काव्यगायन करणारी महशूर किशोरी ही !" असें सादर मनांत उद्गार काढलेच ! आदरानें नी खजील झालेल्या नजरेनें तो तिच्याकडे पाहूं लागला. तिची मनःपूर्वक क्षमा कोणत्या शब्दांनीं मानावी, या विचारांत तो पडला ! किशोरी त्याच्याकडे प्रथम क्रुद्ध दृष्टीनें, आणि नंतर क्षमा करण्याच्या बुद्धीनें पाहात राहिली ! " तुमचीच कांहीं चूक नाहीं. माझीही थोडी चूक आहे ! जाऊं द्या—क्षमा करा ! " या अर्थाचे उद्गार, दोघांच्याही मनांत उद्गारावे असे आले. पण कोणीच बोलले नाहीं. आपण लहानपणीं एके ठिकाणीं खेळलों, बागडलों आहोंत. पाहिलें.आहे एकमेकांना ! हेंही त्यांना यावेळीं आठवणें शक्य नव्हतें ! पण तरीही त्यांनीं क्षणमात्र एकमेकांना न्याहाळतांना दोघांच्याही मनांत एकच कल्पना आली आणि ती म्हणजे

*रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान्*
*पर्युत्सुकिभवति यत्सुखितोऽपि जन्तुः ।*
*तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वं*
*भावस्थिराणि जननांतरसौहृदानि ॥*

क्षमा याचनेच्या शब्दांची देवाण घेवाण करून आपापल्या दिशेनें चालूं लागावें, असें किशोरीच्या मनांत आलें. झालेंहीं असतें तसें; पण किशोरीनें अगोदरच एक भयंकर किंकाळी फोडून, बघ्ये लोक गोळा करण्याची करामत करून ठेविली होती ना ? हां हां म्हणतां रस्त्यावरचे रिकामटेकडे लोक जमले. किशोरीची किंकाळी ऐकून, शोभना हातांतलें काम तसेंच टाकून " कुणी काय केलं माझ्या किशोरीला ? " असें ओरडतच—तिला दुखावणाऱ्याचे बाभाडे काढण्यासाठीं वाघीणीसारखी धावतच तिथें आली ! त्या दोघांना मग

विचारतो कोण तिथें ? बघ्ये लोक बडबडूं लागले, " या चटोराला पोलिस चौकीवर पोंचाविलें पाहिजे." " माझ्या पोरीच्या जिवावर कां रे बाबा, उदार झालास ? इतकं बेफाम व्हायला काय झालं तुला ? " किशोरीला जवळ करीत कुमारावर चवताळलेल्या शोभनेनें लाखोली सुरू केली ! साराच गोंधळ ! सारेंच विलक्षण ! अशा वेळीं तसें न होईल तरच आश्चर्य !



## प्रकरण बारावें

" माझ्या हातून अहेतुकपणें झालेल्या चुकीबद्दल आपण दिलीत ही–इतकी शिक्षा पुरी झाली मला वाटतें ! " शोभना शिव्या देतां देतां जरा थांबली असें पाहून कुमार किंचित् हंसरा भाव दर्शवीत म्हणाला, " शिवाय, यांच्याप्रमाणें ( किशोरीकडे दृष्टिक्षेप करून ) माझ्या डोक्यालाही आपल्या बंगल्याच्या कठड्यानें अगोदर थोडी फार जबर शिक्षा ठोठावली आहेही ! " असें म्हणत विस्कटलेल्या आपल्या केसांतून कुमारानें सहज हात फिरविला ! हात पाहिला तों हाताला रक्त माखलेलें त्यानें, किशोरीनें व शोभनेनेंही पाहिलें.

" जाऊं दे आई. त्यांचीच चूक नव्हती सगळी ! मला ही माझी सायकल आवरतां आली नव्हती– " किशोरी कुमारकडे क्षमेच्या दृष्टीनें पहात आईला बोलली ! रक्त पाहून शोभनेचाही रागाचा पहिला आवेग झट्दिशीं ओसरला. तिचेंही कनवाळू स्त्रीहृदय कळवळलें ! तिचें बोलणें बंद झालें. तरी देखील मुसमुसणें अजून चालू होतेंच !

" आणखी मी क्षमा करा म्हणूं काय ? " कुमार आणखी म्हणाला. पुढें काय बोलावें हें शोभनेला सुचेना. " हा मुलगा, उलटा कांगावा करीत नाहीं, चूक करून पळून जाण्याची घाई करीत नाहीं; चूक कबूल करतो. आपण रागाच्या भरांत अद्वातद्वा टाकून बोललों, तें निमूटपणें शिक्षा म्हणून ऐकून घेतो आणि शेवटीं, आपलें समाधान व्हावें म्हणून आपली क्षमाही मागतो ! फालतु तरुण पोरें असें कधीं वागायचीं नाहींत. हा तरुण अगदींच निराळा दिसतो– "

" पोलिसांत पोंचवून सरकारी शिक्षा मी भोगावी अशी इच्छा असेल, तरीही मी त्याला सादर होईन. कारण सुप्रसिद्ध काव्यचंद्रिका किशोरींचा गुन्हा माझ्या हातून घडला आहे. " कुमार म्हणाला ! शोभना विरघळली ! किशोरी तर पुरतीच चीत झाली ! शोभनेच्या डोळ्यांत पाणी तरंगलें ! किशोरीच्या प्राणावरचें संकट टळलें म्हणून कीं कुमाराचें निधड्या छातीचे ते उद्गार ऐकून हें मात्र कळणें दुरापास्त होतें.

" उदार अंतःकरणाचा उमदा तरुण आहेस तूं ! नसत्या पेंचांत तुला घालून आम्हांला काय मिळवायचं आहे ? " शोभना सहानुभूतीच्या स्वरांत पुटपुटली ! " जा बाबा, आपल्या रस्त्यानें ! चल किशोरी आंत. तूं पण अशी सदा वेंधळ्यासारखी वागून माझ्या जिवाला सुरी लावतेस बघ ! " कुमार अजून तेथें उभाच होता !

" आतां कां उभा ? जा आतां ! अन् पुन्हां जरा जपून गाडी चालवीत जा." शोभनेनें पुन्हां कुमाराला म्हटलें, " माझ्या पोरीच्या प्रेमामुळें तिच्याबद्दल काळजी लागते, तिला एवढं तेवढं दुःख झालं तर तेवढ्यानें सुद्धां मला ब्रह्मांड आठवतं याची कोणाला कशी कल्पना येणार ? "

" मला किशोरीची क्षमा मागायची आहे ! " कुमार म्हणाला.

" त्याचं आतां काय प्रयोजन राहिलें आहे ? " गोड आवाजांत किशोरी उत्तरली !

" जरा चमत्कारिक नी त्रासदायक प्रकारानें आपली भेट झाली, याबद्दल मला झालेला निरतिशय आनंद व्यक्त करायचा आहे ! आणि तो आपल्या परवानगीशिवाय व्यक्त करून आपल्याला मनापासून धन्यवाद द्यायचे आहेत ! यासाठींच, मला सुखरूप जायची परवानगी मिळाली असतांही मी उभा राहिलों ! "

शोभनेला तें ऐकून हंसूं आलें. डोळ्यांत आसूं आणि तोंडावर हंसूं ! किशोरीला—कां कोण जाणें !—कुमाराच्या त्या गोडव्या भाषेनें आनंदीत केलें ! शोभना किशोरीला हाताला धरून परत बंगल्यांत गेली. तिची सायकल उचलून आंत आणायला नोकराला तिनें फर्मावलें. आपली मोटारसायकल सज्ज करून, कुमारही रस्त्याला लागला. रस्त्यानें कुमाराची गाडी भर वेगानें त्याच्या शरीराला पुढें नेत होती आणि त्याच वेळीं त्याचें मन तितक्याच वेगानें

परतून, किशोरीच्या आंवतीभंवतीं हिंडण्याकरितां उडया मारीत होतें.

कुमार एका कॉलेजांत आणि किशोरी दुसऱ्या कॉलेजांत असल्यामुळें किशोरीचें गुंगविणारें काव्यगायन एकदोन वेळां ऐकल्यापासून तिची ओळख करून घ्यावी, अशी त्याला कधींपासून चुटपूट लागली होती. बऱ्याच दिवसांचा त्याचा तो हेतू सफल झाला ! योग आला. पण जरा चमत्कारिक रीतींनें ! त्यानें गुलाबाचें फूल जवळून पाहिलें. पण कांट्यांनीं त्याला त्याच वेळीं रक्तबंबाळ-ही चांगलेंच केलें !

आपल्यामुळें किशोरी सायकलवरून पडली. तिच्या सुकुमार देहाला खरचटलें. असें असून ती आपल्यावर रागावली नाहीं. आपल्याला सावरण्याकरितां उलट आपली बाजू घेऊन अपल्या आईची ती समजुत घालीत होती. आपल्याकडे क्षणमात्रच, पण ती तिनें अशा कांहीं प्रेमळ नजरेनें पाहिलें कीं, तेवढयांत तिनें आपल्या सर्व अंतरंगाचा ठावच घेतला ! तिची आर्जवी स्निग्ध दृष्टि, आपलीच क्षमा मागण्याकरितां तिच्या नाजूक—लाललाल ओठांची चाललेली हालचाल, हे सर्व पुन्हां पुन्हां त्याच्या डोळ्यापुढें देखावे येत होते ! त्या प्रत्येकांच्या पुढें "हें कां ? असें कां ?" या प्रश्नांची मालिकाही उभी राहात होती ! किशोरीच्या कल्पनेनें कुमाराला इतकें वेडून टाकलें कीं, तिच्या जवळून निघतांना आपण जाणार होतों कोठें, हें तो अजिबात विसरला ! मोटार सायकलचें तोंड ज्या दिशेला उचलतांना झालें होतें, तिकडेच तो निघाला आणि निघाला तो आपला सरळ परत घरीं पोंचला !

—दारांत त्याची आई उभी होती ! रागानें नुसती फणफणली होती. कुमार समोर दिसला. त्याच्यावरच ती कडाडली ! "कुठें रे जात असतोस कारट्या ! वेळ नाहीं. काळ नाहीं. आपली उचलली सायकल कीं निघाला तरगो करीत वर तोंड करून गांवभर भटकायला ! वेळेला जेवायला कुणी एक येईल तर शपथ ! माझीं हाडं घुसळायला आलां आहांत सारे जन्माला ! एक दिवस सुखानं ताजा घांस घेऊं देत नाहींत ! ......" एक न् दोन ! बिजूचा तोफखाना तो ! कुमाराला नित्य ऐकायची ती संवयच होती ! त्याला त्याचें विशेष वाटलें नाहीं. त्याच्या चटकन् मात्र लक्षांत आलें, आपण निशिगंधाकडे जात होतों तों तसेंच घरीं परत आलों ! आणखी एक त्याला कल्पना आली. त्या कल्पनेनें त्याला हंसू आलें. " किशोरीच्या दारांत घडलेला

प्रसंग, आपल्या या दारांत घडला असता तर काय झालें असतें ? आपल्या आईनें आपल्यालाच काय, पण किशोरीलासुद्धां अर्धेकच्चें खाऊन टाकलें असतें ! आम्हां दोघांनाही पोलीस चौकी दाखविली असती ! आपली आई आणि किशोरीची आई ! किती दोघींत अंतर ! ती रागावली ! बोलली. संतापली ! पण आपल्या डोक्यातलें हाताला लागलेलें रक्त पाहिलें, तेव्हां माउलीच्या डोळयांत टच्कन् पाणी आलें. कळवळला तिचा जीव ! किती प्रेमळ माऊली आहे बिचारी ! आणि ह्या आमच्या आईसाहेब ! आपल्या डोक्याला झालेली जखम, तिला दाखविण्याची सोय नाहीं. ती कळवळायच्या ऐवजीं वाटेल तसें तोंड सोडील आपल्यावर इतकेंच करून राहायची नाहीं. आपली सायकलच फुंकून टाकायला भाग पाडील ! " असें विचार आले आणि गेले ! त्यानंतर लगेच किशोरीची मूर्ति त्याच्यापुढें विहार करूं लागली ! तिचे ते डोळे ! तिची ती लाडिक हालचाल ! त्याच्या किती ओळखीच्या, परिचित् सुंदरसुंदर मैत्रिणी होत्या. त्या सगळयाजणींना जें नव्हतें तें सारें सारें किशोरींत सामावलें आहे, दुसऱ्या साऱ्या मैत्रिणींपेक्षां किशोरी रूपगुणांनीं उंचउंच आहे, हें कुमाराचें मत कायम-वज्रलेप झालें ! आपल्याला जें माणूस मनापासून आवडतें त्याच्याशीं तुलना करण्यासारखें त्रिखंडांत तरी कोणी असतें कां ? त्यारात्रीं कुमाराच्या स्वप्नांतही किशोरी दर्शन द्यायला हंसत हंसत आली !



—" तो कोण असावा ? " किशोरीलाही कुमाराच्या दर्शनानें झपाटल्या-शिवाय सोडलें होतें थोडेंच ! आपल्या आईबरोबर ती मुकाट्यानें बंगल्यांत शिरली खरी, पण जाणाऱ्या कुमाराकडे वळून पाहण्याचा मोह तिला आवरत नव्हता ! " कोण होता तो ? त्याचं नांव आपल्याला समजलं नाहीं ! आपण कां त्याला विचारलें नाहीं ? अपराध त्याचा नव्हता ! पण आई त्याला किती टाकून बोलली ! आपल्या मायेनेंच ती बोलली ! दिसला कसा राजबिंडा ! पोषाख किती उमदा ! सडेतोड पण नम्र ! लहान वयं पण विचार किती थोर ! माझ्या चुकीकडे कानाडोळा अन् आपला अपराध प्रांजलपणानें कबूल करून क्षमा मागायची तयारी ! असं कोणता तरुण करील ? आपलं मित्रमंडळ काय थोडंथोडकं आहे ? 'पण त्या तरुणाची

सर त्यांतल्या एकाला तरी करतां येईल कां ? मी किंचाळलें ! लोक गोळा केले ! आपली आई धावली ! बोलायला लागली त्याला ! त्याच्या डोळ्यांत रागाची लकेरी येऊन गेली ! पण किती अल्पकाळ ! खालचा ओंठ त्यानें आपल्या वरच्या दांताखालीं करकचला. तों आपला माझ्यावरील राग आवरण्यासाठींच नव्हे का ! खरा वीरकुमार आहे तों ! काव्याचा नायक करण्याचे गुण आहेत त्याच्या जवळ ! " वीरकुमार ! " कविता रचावी, इतकी स्फूर्ति दिली त्यानें आपल्याला ! आपल्या एकाही मित्रानं कीं चाहत्यानं आजपर्यंत आपल्याला काव्य रचण्याची अशी स्फूर्ति दिली होती कां कधीं ?

किशोरीला कुमारानें खरोखरच इतकें भारून टाकलें ! काव्याला जो विषय होतो, काव्य करायला जो स्फूर्ति देतो, त्याची महती—कवि—कवियित्रींच्या हृदय साम्राज्यांत केवढी असेल, हें एक त्यांचे तेच जाणोत !

" त्या तरुणानें आपली क्षमा कशी मागितली ? आपल्याला तो ओळखतो ! आपल्या भेटीनें आनंद झाल्याचें त्यानें सांगून धन्यवाद दिले ! त्याचें बोलणें विनोदगर्भ आनंद देणारें होतें. बोचणारें टोंचणारें नव्हतें ! आपल्याला खरचटलं याबद्दल त्याची दृष्टि दिलगिरी दाखवीत होती ! पण त्याच्या डोक्यांतून रक्त ओघळलें, त्याची त्यानें थोडी सुद्धां फिकीरच केली नाहीं कीं एवढीही किंमत दिली नाहीं !

——उदार हृदयाचें वीरकुमार असेच असतात !—तो तरुण तसाच आहे ?— मग " अपरिचित वीरकुमारास—" अशी त्याच्यावर कविता रचून त्याचा गौरव नको का करायला ? "पण तो कोण असावा ?" तो पुन्हा भेटेल का आपल्याला ? भेटला तर बोलेल का आपल्याशीं ? आपलें नांव सांगेल का मला ? त्याच्यावरची आपली कविता आपण त्याला ऐकवूं ! काय वाटेल त्याला ? त्याचें नांव कांहीं कां असेना. आपण त्याला ' कुमार 'च करून टाकूं ! " पहिल्या भेटीपासून तसाच किशोरीच्या मनानें हाच ध्यास घेतला होता. सत्कवीचें काव्य काल्पनिक असलें तरी तें सत्यच ठरतें ! अमर बनतें, त्याचें कारण काय असेल ? कुमारचें नांव किशोरीला माहीत नव्हतें ! तिच्या दिव्य स्फूर्तीनें तिला ते सुचविलें होतें. आणि तें त्याचें खरेंच नांव नव्हतें का ?

ज्याचा ध्यास लागतो, तो दिवसाढवळ्या दृष्टीपुढें वावरतो; तसाच तो स्वप्नांतही मग आपल्यापासून तो दूर होत नाहीं. किशोरीच्या स्वप्नसृष्टींतही

कुमारची साजरीगोजरी मूर्ति दत्त म्हणून तयार होतीच ! जें माणूस आपल्या स्वप्नांत येतें, त्याच्या स्वप्नांत आपण त्याला दिसावें, याकरितां स्वप्नांतून जागें झाल्यावर, डोकें असेल तिकडे पाय आणि पाय होतें त्या बाजूला डोकें करून, पुन्हा झोंपी जावें; म्हणजे आपल्या स्वप्नांत जो येतो त्याच्या स्वप्नांत नेमकें आपण प्रवेश करतो; स्वप्नमीमांसकांमध्यें अशी एक कल्पना रूढ आहे ! हा प्रकार तिकडे कुमारानें किंवा इकडे किशोरीनें केला असो वा नसो; पण दोघेहि परस्परांच्या स्वप्नांत वावरले खरे ! आणि किशोरी जातिवंत कवयित्रीच पडली. कुमार स्वप्नांत कां होईना, पण तिच्या समोर आल्यावर, ती त्याच्याशीं बोलल्याशिवाय नी त्याला आपल्याशीं बोलता केल्याशिवाय राहील का ? स्वप्नांत किशोरीपुढें कुमार उभा होता. हंसरा दिसत होता. पण खरा हंसरा नव्हता तो !

" पुन्हां भेटला नाहींस तूं ? "

" कशाला भेटायचं ? "

" मला भेटावंसं वाटतं तुला ? "

" ॲक्सिडंट व्हावा अशी पुन्हां इच्छा आहे वाटतं ? "

" हो ! ॲक्सिडंट केलास तरी चालेल ! "

" हो, म्हणजे तुझी आई आहेच वाघिणीप्रमाणें खाऊं कीं गिळूं मला करायला ! नी तूं गालांतल्या गालांत हंसून माझा उपहास करायला! होय ना ?"

" तूं माझा आहेस ! "

" खोटं ! "

" खोटं कां वाटतं तुला ? "

" ज्याचं नांवगांवसुद्धां माहीत नाहीं, त्याला ' तूं माझा आहेस ' असं एकादी तरुणी खुशाल म्हणायला लागली, तर त्याला ' खोटं ' म्हणूं नये तर काय ? "

किशोरीनें तोंड वाईट केलें.

कुमार खो–खो हंसायला लागला !

" वाईट वाटलं तुला ? "

" चल ! बोलूं नकोस माझ्याबरोबर !—"

" कां ? "

" नारीहृदय तुम्हां पुरुषांना कधीं कळतं का ? "

" म्हणजे ? "

"तुझ्याबद्दल मला आपुलकी वाटते ! तुला पाहिल्याक्षणीं, तूं माझा आहेस ! तुला कुठें तरी पाहिलें आहे. आपण केव्हां तरी, कुठें तरी किती किती खेळलों बागडलों आहोंत ! रडलों, रुसलों आहोंत. तूं माझा नी मी तुझी ! असें मला वाटावं नी तुला कांहींच वाटूं नये ! मग कशाला बोलायचं तुझ्याशीं ! "

" पुरुष म्हणजे बोलून चालून शिपाई गडी ! त्यांना बायकांचं मनही कळत नाहीं आणि त्यांच्या बोलण्यांतलें नाजूक पांचपेंचही कधीं उकलत नाहींत ! इतकंच नव्हे, तर आपल्यावर कोणी स्त्री प्रेम करते हेंही कधीं उमगत नाहीं !"

" म्हणून काय तुम्हां पुरुषांना आम्ही बायकांनीं गाढव ठरवायचं कीं काय ?" किशोरीच्या ओंठावर हें वाक्य आलें. पण तसेंच तिनें आंत लोटलें. नुसती कुमाराकडे पाहून हंसली ती !

" काय, मी तुला तुझा वाटतो ? माझ्यावर प्रेम आहे तुझं ? "

" बायका बोलून दाखवीत नाहींत ! वागून दाखवितात ! "

" मी तुला कां आवडलों ? "

" तूं दिसतोस किती छान ! "

"स्त्रियांच्या रूपावर पुरुष आसक्त होतात हें मला माहीत आहे ! पण बायका पुरुषांच्या रूपाला भाळतात, हें मी तुझ्याच तोंडांतून पहिल्यांदा आज ऐकतों आहें ! "

किशोरी जरा गोंधळली. निरुत्तर झाल्यासारखी झाली. पण चट्कन् तिला सुचलें. ती हंसून म्हणाली, " ता वरून ताकाची कल्पना येते ना ? तुझ्या थोड्या बोलण्यावरून नी खऱ्या पुरुषासारख्या वर्तनावरून, तुझ्यांतले उदात्त गुण मला समजले नाहींत, अशी का तुझी कल्पना आहे ! "

कुमार मनापासून हंसला ! स्त्रिया उपजत चतुर असतात, हें त्याला पटलें ! किशोरी गालांतल्या गालांत हंसली ! तिनें ओळखलें. आपला कोटी-क्रम कुमाराला आवडला ! दोघांनीं स्निग्ध दृष्टीनें एकमेकांकडे टक लावली !

" त्या दिवशीं तूं माझी क्षमा मागितलीस ! पण कुमार मी अजून कांहीं तुझी क्षमा मागितली नाहीं ! -- "

" स्त्रिया अशाच असतात ! "

" आतां मागतें क्षमा ! "

" घाव गेल्यावर घण घालण्यांत काय विशेष ? "

" चुकलें मी ! "

" दर वेळीं चूक करावी नी लगेच ती कबूल करावी तुम्हीं बायकांनींच!"

" जाऊं दे तें ! आतां जरा नीट बोलशील ? – "

" काय बोलूं ? – "

" बरं लक्ष लावून ऐकशील ? "

" काय ? "

" मी तुझ्यावर एक छानदारशी कविता केली आहे ! – "

" हं ! – असं ? – "

" मग ऐकणार ना ? – "

" हो! इतक्या सुंदर मुखांतून आपली स्तुति, व्हायला लागलेली ऐकायला मिळाली तर कोण ऐकणार नाहीं " असें म्हणून पुन्हा कुमार हंसला !

किशोरीही आनंदानें हंसत सुटली ! ती इतक्या मोठ्यानें हंसत होती, कीं तिचें स्वप्नांतलें हंसणें, जवळ असलेल्या तिच्या आईला स्पष्ट ऐकायला येत होतें ! " खुळी कुठली ! स्वप्नांत देखील अशी हंसत सुटते ! " आपा स्याशीं हंसत, आनंदानें नी प्रेमानें आपल्या पोरीकडे पहात, शोभनेनें किशोरी-ला हळू हातानें जागी करीत म्हटलें. "किशोरी ! किशोरी ! अग हें ग काय? झोपेंत काय अशी हंसतेस ?" किशोरी जागी झाली ! तिचें स्वप्न संपलें! तरी त्याची गोड आठवण तिला कितीपण सुखी करीत होती. तिनें कुमाराला शोधून काढायचा मनाशीं अगदीं पक्काच निश्चय केला !



दोघांची एकदां भेट तर झाली. ओळख झाली. परिचय वाढला. परि-चयाची परिणाति प्रेमळ मैत्रींत व्हायला वेळ लागला नाहीं. एकमेकांच्या घरीं वारंवार जाणें येणें होऊं लागलें. ज्याच्या त्याच्यावर व जेव्हां तेव्हां मनमानेल तशी खेकसून, नी संतापून सगळ्यांना सळो का पळो करून सोडणारी बिजू पण तिही तिच्या कुमाराकडे किशोरी घरीं यायला लागल्यापासून तिच्यावर आपली खुष असे. तिच्याशीं गोड बोलायची, आपल्या जवळ

बसवून तिला खायला आग्रहानें द्यायची. तिच्याकडून गाणीं देखील म्हणून घ्यायचीं. इतकेंच काय पण तिच्या जवळ कुमाराला देखील खूप खूप वाखाणायची. चार दिवस ती जर फिरकली नाहीं, तर "का रे कुमार, तुझी ती किशोरी कशी आली नाहीं अलिकडे ?" अशी आतुरतेनें बिजू चौकशी हटकून करीत असे! किशोरीकडे टक लावून ती एकसारखी पहात असे! मग किशोरींत जास्त असें तिला काय वाटत असे कोण जाणें !

—आपल्या किशोरीला कुमार आवडतो. तो आला, बसला, म्हणजे तिला भारी आनंद होतो, हें शोभनेनें प्रत्यक्षच पाहिलें. पहिल्यांदा तिरस्कार, नंतर सहानुभूति आणि शेवटीं कुमाराबद्दल आपुलकी, कुमाराच्या बाबतींत असेंच शोभनेचें झालें होतें ! वरचेवर पाहून पाहून कुमारासंबंधीं शोभनेच्या मनांत अज्ञात—ज्याचा उलगडा तिला करतां येईना— असे कांहीं गूढ विचारही येत असत. "कुमार आपला आहे !" एकदां ही कल्पना तिला क्षणभर रमवी ! तर दुसऱ्या वेळीं 'पण आपल्याला त्याच्याबद्दल कांहीं तरी त्रासदायक वाटतें!' असेंही वाटून मग किती तरी वेळपर्यंत तिला उगीचच हुरहुरल्यासारखें होई ! कुमार किशोरीशीं बोलण्यांत दंग असला आणि शोभनेकडे त्याचें लक्ष नसलें, म्हणजे अशा वेळीं शोभना कपाळावर तिरस्काराची एकादी रेषा चढवून कुमाराकडे किती वेळ तरी पाहात राही ! पण असें असूनही किशोरीच्या आवडीसाठीं कुमाराचें स्वागत करण्यांत शोभना कधीं कसूर करीत नसे !

एकाद्या वेळीं रोजच्यापेक्षां कुमाराला यायला वेळ झाला, म्हणजे तेवढ्यानेंही किशोरीचा जीव अगदीं कावराबावरा होई. आंतून बाहेर, तिच्या सारख्या येरझारा चालायच्या ! शेवटीं दमून नी रागावून, 'आतां कुमाराची वाट नाहींच पहायची ! न का येईना !' असें पुटपुटत आणि पाय आपटीत ती माडीवर जाऊन आपल्याशींच धुमसत बसे ! नंतर कुमार आला म्हणजे त्याच्याकडे हंसून पाहात, शोभना त्याला म्हणे, "आज उशीर रे केलास कुमार ? तुझी किशोरी रागावली आहे ना तुझ्यावर ! इतका वेळ ती तुझ्याकरितां एकसारखी आंत बाहेर करीत होती ! अजून चहासुद्धां घेतला नाहीं तिनें ! पाय आपटींत आतांच माडीवर गेली आहे ! जा वर !"

कुमार हंसत नी डोक्यावर<sup></sup>ल केसावरून हात फिरवीत, एकेक दोनदान

पायऱ्या सोडून जिना भरेदिशीं चढूं लागे ! कुमाराला पाहिलें कीं किशोरीनें ओढून चंद्रबळ आणावें. पण त्या प्रकारचा तिनें उसना आणलेला राग तेव्हांच कुठच्या कुठें पळून जाई ! राहिलाच तर कुमाराच्या एकदोन गोड गोड शब्दांनीं तिच्या रागाची क्षणार्धात दाणादाण उडून जाई !

" चहा घेणार ? "

" तूं घेणार ? "

" हो ! "

" पण करणार कोण ? तुझी आई ? "

" हूं "

" मग नको ! "

" कां ? "

" मोठ्या माणसांना त्रास देणं आवडत नाहीं आपल्याला ! तूं केलास तर घेईन !—"

" मला चहा करतां येणार नाहीं वाटतं ?—"

" शिकलेल्या मुलींना कांहींच करतां येत नाहीं असें मला वाटतें !—–"

" मग पहाच तर !—–"

किशोरी—कुमार यांच्यामधला हा संवाद जवळ जवळ ठरलेला असे ! किशोरीनें चहा करून आणून द्यावा आणि विचारावें,

" कसा झाला आहे चहा ?—–"

" जात कसब आहे तें ! तें कुठं लपतें ?—"

" पण चहा कसा झाला आहे सांग ना ?—–"

" खरं सांगूं ? तुझ्या कवितापेक्षां तूं चहाच जास्त चांगला करतेस ! "

" अगदीं अरसिक आहेस तूं ! " किशोरी फणफणे !

" नुसत्या कवितेलाच नांवाजलं म्हणजे रसिकपणा ठरतो वाटतं ?" कुमार हंसत हंसत म्हणे ! किशोरीला जास्तच खिजवी !

" माझी नवी सुंदर कविता बघ आणि मग सांग—"

" कवितेला काय पहायचं ? तिच्या आईपेक्षां का ती अधिक सुंदर असणार आहे ? ? "

" म्हणजे ? " किशोरी गोंधळून जाऊन कांहीं तरी प्रश्न करी !

" तुझ्या कविता चांगल्या असतात ! पण त्यापेक्षां तूंच अधिक सरस आहेस ! तुझ्या कवितेंतल्या वेंचक मोहक शब्दांपेक्षां तूं बोलतांना ज्या गोड गोड शब्दांची हवी तशी उधळपट्टी करतेस, त्याचेंच तेज मला जास्त आवडतें ! काव्यगायनाच्या वेळीं कविता ऐकेन. आतां अशी समोर नुसती बैस ! बोलत रहा ! बस्स ! "

ती हंसे ! तोही हंसत राही !

ऋतु बदलतांना कित्येकाना बेचैन होते ! पुष्कळ अशक्ततांच्या प्रकृतींत बिघाड होतो—सर्वांना कसेसें होत असतें ! तरुणतरुणी एकत्र आली, हिंडूंफिरूं लागली; बोलूं हंसूं लागली, म्हणजे त्यांच्याकडे पाहाणारांच्या दृष्टीलाही बेचैनीचा आजार जडतो ! किशोरी-कुमार शहरांतून एकत्र हिंडूंफिरूं लागली; त्यांचें बोलणें—हंसणें लोक पाहूं लागले. फिरायला दोघे, पोहायला दोघे, सायकलींची दोघांची शर्यत, केव्हां कुमाराची मोटरसायकल किशोरी चालवते आहे, मागल्या कॅरिअरवर कुमार बसला आहे, केव्हां तो मोटारसायकला हाकतो आहे, किशोरी त्याच्या पाठीशीं वाऱ्यावर पदर उडवीत बेगुमान बसली आहे, हें पाहून बघ्यापैकीं कोणी नाक मुरडीत. कोणी मान तुकवीत. कोणी आपापसांत कुत्सित कुजबुज करीत ! कांहीं-ना मजाही वाटे ! " ठीक आहे ! छान ! दिवस आहेत यांचे ! करूं द्यात मौज दोन दिवस ! " असे मनापासून उद्गारत ! कुठें तरी रस्त्यांच्या कडेला बोलण्याच्या नादांत तास न् तास त्यांचे जात ! येतो कोण, जातो कोण, कोण काय बोलतो, याकडे त्यांचे लक्ष जातेंच कशाला ? किशोरीच्या काव्यगायनाचा कुठेंही कार्यक्रम असला, तरी बरोबर कुमार असल्याशिवाय, किशोरीचे काव्यगायन रंगायचेंच नाहीं ! त्यानें आपल्या मोटरसायकवलरून तिला नेलें पाहिजे ! साऱ्या शहरांत धूम बोलवा पसरली होती कीं किशोरी—कुमार लवकरच विवाहबद्ध होणार आहेत म्हणून !

किशोरी—कुमार निःशंक मनानें हंसत खिदळत वाटेनें जात असतांना त्यांच्याकडे पाहून एकादा आपल्याशींच म्हणे, " प्लॅटोनिक लव्हचा हा पुरेपूर नमुना दिसतो आहे! यांत वावगें काय आहे!" पण दुसऱ्या एकाद्याच्या मनांत असेंही येऊन गेल्याशिवाय रहात नसे, " प्लॅटोनिक लव्हच्या पुरस्काराचा हा नुसता देखावा आहे ! ॲरिस्टॉटलचें मत हे लोक लवकरच खरें करून

दाखविणार खास ! ” आणि खरी गोष्टही अशी होती कीं कुमाराचें प्रेम किशोरीवर जडत चाललें होतें, तशी किशोरीही कुमारावर उलट प्रीति करूं लागली होती ! आपलें लग्न व्हावें, असें दोघांनाही मनांतून मनापासून वाटूं लागलें होतें. अजूनपर्यंत त्यांच्या त्या अबोल प्रेम – प्रीतीला वाचा मात्र फुटली नव्हती इतकेंच !

जी गोष्ट सारा गांव बोलूं लागला होता, तिची दखल कुमाराच्या आणि किशोरीच्या घरीं कोणालाच नसेल असें कसें होईल ? आपली सून म्हणून किशोरी आपल्या घरीं येणार,ही कल्पना बिजूला फारच आवडली! त्या दृष्टीनेंच ती किशोरीकडे केव्हां पासून तरी पाहूं लागली होती. इतकेंच नव्हें तर ती कधीं घरीं आली म्हणजे, “ ये सूनबाई ! ” असें हटकायलाही तिनें आरंभ केला होता ! प्रेमळ सास्वा कशा असूं शकतील, तें किशोरीला स्वोदाहरणानें दाखवून देण्याचा बेत बिजू करीत असावी. तिचा मूळ स्वभाव उमटलाच तर तो दिसायचा कुमाराला, ‘ हें पहा कुमार ! किशोरी कवियित्री आहे ! इकडे जसं मला धसमुसळ्यासारखं वागवतात, तसं तूं किशोरीला वागवलेलं माझ्या नाहीं अं कामाला यायचें ! आतांपासूनच बजावतें तुला ! ” असें बिजू कुमाराला हटकून म्हणायचीच. प्रसादला हें समजलें होतें. पण त्या गोष्टीकडे अजून त्यानें तसें लक्ष दिलें नव्हतें. आपली किशोरी कुमाराशीं कशी वागते, त्यावरून एक दिवस कुमाराशीं “ आपण लग्न करणार ! ” असें कधीं तरी आपल्याला ती सांगणार, हें लक्षांत न येण्याइतकी शोभना अज्ञ नव्हती ! ती सारें ओळखून चुकली होती !

–“कुमार आपला जांवई झाला तर ?” हा एकच प्रश्न ! पण तो शोभनेच्या मनाची घालमेल करून सोडी ! तिला आनंद होई, पण क्षणमात्र ! साऱ्या पुरुष जातीवरचा तिचा विश्वास आणि आदर केव्हांच पार नाहींसा झाला होता! त्यामुळेंच तिच्या जीवाची घालमेल होत असेल का ? “ कुमार किशोरीला कसा वागवील ? तिला सुख देईल कीं आपल्या आयुष्याचा उन्हाळा झाला, तशीच वेळ ती तिच्यावर आणील ?” अशा भयंकर विचारानें शोभनेच्या जीवाचा थरकांप होई ! त्यापेक्षां आपली किशोरी जन्मभर कुमारीच राहिली तरी चालेल ! असेंच शोभनेला वाटे ! पण ती बोलणार कसें हें ?

—संदिग्धता संपली होती पर्यायाच्या शब्दांचा आणि कृतींचा प्रांत ओलांडला गेला होता ! मनें मनाशीं बोलूं लागलीं होतीं. डोळे डोळ्यांना संदेश पोंचवूं लागले होते. संवादी सूर हृदयाहृदयाला ऐकायला येत होते ! किशोरी कुमाराशीं आपल्या माडीवर बोलत बसली होती. शब्द दोघांचेही अडखळूं लागले होते. काय बोलावें हें सुचत नव्हतें दोघांना ! डोळे धुंद होत होते ! सर्वांगांतून कसल्या तरी अननुभूत अशा गोड गोडशा झिणझिण्यांच्या लहरीवर लहरी उठत होत्या. शरीराचा शरीराला स्पर्श झाला. दूरपणा लोपवून परस्परांना लगटावें, असें दोघांनाही होऊन गेलें होतें ! प्रेमाचा उदय झाला म्हणजे त्याच्या उच्चाराची गति खुंटते ! तसेंच झालें होतें दोघांना ! धाडस कोणी करावें ? पुढाकार कोणी पत्करावा ? प्रश्न होता ! प्रेमाचें काव्य किशोरीच्या नसानसांतून नाचत होतें ! प्रीतीची रसिकता कुमाराच्या रोमरोमांतून थयथयत होती ! कुमार—पुरुष तो ! त्याला वाटलें, प्रीतीच्या भेटीची परम मंगल वेला ती हीच ! हा शुभमुहूर्त सावधान राहून साधला पाहिजे ! पुढें झाला तो ! त्यानें किशोरीचा हात धरला ! तिनें ही अडथळा केला नाहीं ! आतां तो तिला आपल्याजवळ ओढणार, तों शोभना चहाफराळाचें वर घेऊन त्याच वेळीं तेथें आली ! "खालीं चहाला यायची नाहीं कां आठवण ?" शोभनेचे हे शब्द दोघांच्याही कानीं पडले !

—किशोरी कुमाराच्या हातांतून आपला हात सोडवून चटकन् दूर सरली !

शोभनेनें तें पाहिलें की नाहीं कोण जाणें !

ती वात्सल्यानें दोघांकडे पाहून हंसत होती !

—दोघांनाही हंसूं आलें—पण कां ?

---

# प्रकरण तेरावें

आपल्यावर अथांग माया करणारी आई असली. तरीसुद्धां ती आपल्या हाताशीं आलेल्या ऐन स्वर्गसुखाच्या वेळीं आड आली, हें किशोरीला आवडलें नाहीं. आपला विरस झाला, म्हणून आईचा तिला भारी राग आला ! किशोरीप्रमाणेंच कुमाराचीही अवस्था झाल्यास नवल नाहीं ! त्यानें आणि तिनें हंसून कशीबशी ती वेळ निभावून नेली. पण भडकलेल्या मनाचें तुफान तारू आणि शरीराच्या कणकणांतून उसळणाऱ्या उत्कट प्रेमाच्या अनिवार झिणाझिण्या त्यांना आवरतां आवरतां, लपवितां लपवितां, त्या एकाच क्षणांत कुमार किशोरीची पण कोण त्रेधापिरपीट उडाली !

आणि खरें म्हटलें तर शोभनासुद्धां त्या वेळीं तेथें यायची नव्हे. पण हीं दोघे वर बोलत असतां, तिच्या शाळेंतल्या प्रमुख सहकारीबाई कांहीं महत्त्वाच्या कामाकरितां खालीं आल्या होत्या. त्यांच्याकरितां त्यांनीं चहाफराळाचें केलें. आणि मुलांना खालीं बोलावण्यापेक्षां आपणच त्यांना वर नेऊन द्यावें म्हणजे उगाच आपल्या बोलण्यांत व्यत्यय नको, नी मुलांनाही संकोच नको ! अशा विचारांनीं ती चहाफराळाचें वर घेऊन आली होती ! शोभना अशी सकारण वर आली ! पण या दोघांचा अकारणच विरस झाला ! शोभना आली. तिनें चहाफराळाचें ठेवलें आणि लगेच, बाई तिच्यासाठीं खोळंबल्या होत्या त्याकरितां ती तशीच लगबगीनें खालीं गेली !

चढलेला उन्माद विरला होता ! दोघांनींही चहा घेतला ! फराळाचें त्यांनीं कांहीं घेतलेच नाहीं. इच्छाच उरली नव्हती त्यांना ! त्यांना खात्रीच वाटली,

यावेळीं फराळाचें गोड लागणार नाहीं !

कोणी कोणाशीं बोलत नव्हतें. कुमार तर खिडकीबाहेर पाहाण्याचें निमित्त करून किशोरीकडे पाहण्याचें आवर्जून टाळीत होता. आणि त्याच वेळीं रस्त्यानें जाणारा कोणी रंगेल गडी अगदीं रंगांत येऊन कोठें तरी, केव्हां तरी, कोणी तरी म्हटलेली, ऐकलेली—

*जरा हळूं जपून चल बाई ग ॥*
*करुं नको उगीच अशी घाई ग ॥*
*कांटेकुटे लपले ठायीं ठायीं ग ॥ जरा हळूं० ॥*
*जरा हळूं जपून चल– बाई, ग ॥*

ही लावणी मारे मोठ्या झोकांत म्हणत जात होता !

कुमारानें ऐकली ती लावणी ! किशोरी ऐकत होती कीं नाहीं, कोण जाणें ! कुमाराला तशांतहि हंसू आलें. त्यानें खिडकींतून वळून किशोरीकडे पाहिलें न पाहिलेसें करून तिला म्हटलें,

"ऐकलंस किशोरी ?"

"काय ?"

"अस्सल मराठी काव्य ! उदासरम्य आहे ! पण किती सार्थ आहे ! अन् जणुं तुझ्याकरितांच कोणीतरी रचलें आहे असें वाटतें !" कुमार म्हणाला.

"मी नाहीं ऐकलं तें ! कुणी म्हटलं ? केव्हां ? काय तें ? —"

"आतां रस्त्यानें एक वेडापीर गात गेला ना ! वेडा दिसला, पण त्याचे बोल मात्र शहाण्याला घेण्यासारखे होते !"

"पण काय तें ? —"

कुमारानें ऐकलेल्या लावणीतील "जरा हळू जपून चल बाई ग ! कांटे-कुटे लपले ठायीं ठायीं !" हे आठवले तसे चरण म्हणून दाखविलें !

ऐकून किशोरी जरा चमकली पण लगेच म्हणाली, "हंः ! वेडयाच्या बरळण्याकडे लक्ष देण्यांत अर्थ काय ?"

"मग तुझ्यासारखी शहाणी काय सांगणार ?"

" ऐकायचं आहे ? "

" अननुभवी नुसते सुरावर म्हटलेले गोड–गोड शब्द ? "

" मी अननुभवी ? नी तूं काय ? अनुभवाच्या भाराखालीं वाकलेला वृद्ध आजोबा वाटतं ? "

तें बोलणें मग तितक्यावरच थांबलें ! मग कोणी बोलेना आणि बोलले असते, तरी त्यांत रंग भरला नसता ! बैठक बिघडली ती बिघडलीच ! नंतर दोघेही उठून फिरायलाच बाहेर पडले ! कोंडलेल्या जागेंत गुदमरलेल्या तरुण जिवांना बाहेरच्या मोकळ्या हवेची आवश्यकता होतीच नाहीं तरी ! निराश–उदास झालेल्या मनाला उल्हसित– प्रसन्न करण्यासाठीं, फिरतांना नाना विषयांची त्यांनीं पुन्हां पुन्हां कितीदां तरी उजळणी चालविली.

वाटेनें चालतांना वाटेल त्या विषयावर मोकळेपणाचा आव आणून जरी तीं बोलण्याचा प्रयत्न करीत होतीं, तरी पण दोघांच्याही हृदयांतल्या आंतल्या कप्प्यांत— " आई ऐनवेळीं तेथें कशी आली ? " " तरुण–तरुणींच्या सुखद लीलांना अडथळा करणारीं मोठ्यांची, " *तीं तीं पदें फिरून येतीं । त्या त्याच अर्थाप्रती दावितातीं !* " अशी ही अनादिसिद्ध रीतच आहे का काय?–" आपल्यालाही हे असे अडथळे वरचेवर हे लोक आणणार काय ?" —" तरुणतरुणींच्या मार्गांत असे खडेकांटे मोठे लोक कां पसरतात ? त्यांत त्यांना काय लाभ होतो ?" या सारख्या विचारांची मालिका आलटून पालटून एकसारखी किशोरीच्या नी कुमाराच्याही मनांत धुमाकूळ घालीत होतीच !

नंतर आपापल्या लहानपणच्या लहानसहान--पण रम्यतर--गमतीच्या गोष्टी-कडे दोघेही वळले ! "लहानपणीं तूं खोडकर होतीस का भित्री ? आपण व्रात्य कसे होतों ? आपल्या व्रात्यपणाचेंही कसें घरीं कौतुक होत असे." अशा प्रकारच्या गोष्टी सांगून कुमारनें किशोरीची करमणूक केली !

–लहानपणीं आपण कशा अति भित्र्या होतों; हें किशोरीनें कथन करतांना एक लहानशीच गमतीची गोष्ट कुमाराला सांगितली, " मी अगदीं लहान होतें. असेन दोन फार तर तीन वर्षांची. तेव्हां आमच्याकडे एक पाहुणे आले होते. मला आठवतं त्यांचं नांव–बापू म्हणत असत. आई त्यांना बापू म्हणे ! मीहि म्हणूं लागले बापू ! एक दिवस काय झालें; मी आंत

आईजवळ खेळत होतें. आई स्वयंपाक करीत होती. खेळता खेळता मी सहज बाहेर आलें. पहातें तों काय ! बापूंनीं भिंतीजवळ खालीं डोकें नी वर पाय केलेले ! मीं घाबरून किंचाळलेंच एकदम ! माझी बोबडीच वळली ! " आई ! बापू ! आई बापू ! " करीत पळालेंच आईकडे ! आई धांवत बाहेर आली, काय झालें तें पहायला. बापू शीर्षासन करीत होते ! ते सरळ झाले ! त्यांना पण हंसू आवरेना ! आईला कळल्यावर ती पण हंसायला लागली मनापासून !

"ते कां हंसतात, मला कळेना ! त्या वेळीं भीतीनें कशी किंचाळलें हें अजून मला आठवतें !—किशोरीची ती गोष्ट ऐकून कुमारलाही मनापासून हंसू आलें ! त्यानें हंसत म्हटलें, " माझ्या मोटरचा धक्का लागून जेव्हां तूं पडलीस आणि किंचाळलीस, त्यावरून तुझ्या भित्र्या किंकाळीची साक्ष पटली मला ! " तिरप्या डोळ्यांनीं कुमाराकडे पहात तोंडाला हातरुमाल लावून किशोरी मनापासून हंसली ! त्याची ती आठवण आवडली तिला ! इवल्याशा गोष्टींनीं त्यांचीं मनें खरोखरीच खुललीं ! दोघांनाही मग तशा गोष्टींच्या नादांत कांहीं वेळापूर्वी घडलेल्या नावडत्या प्रसंगाचा विसर पडला !

" साऱ्याच बायका अशा भित्र्या असतात का ? जन्मभर तशाच भित्र्या राहतात का ? " कांहीं एक कल्पना येऊन कुमारानें गंमतीनें प्रश्न टाकला ! " प्रसंगापूर्वी बायका भित्र्या असतात ! पण प्रसंगांत पडल्यावर त्यांच्याइतका धीटपणा, मोठमोठे वीर पुरुषसुद्धां दाखवूं शकणार नाहींत ! " किशोरीनें जसें कांहीं सुभाषितासारखें टिचून सांगितलें. त्यानें किशोरीकडे सादरतेनें पण प्रश्नचिन्हांकित पाहिलें.

" खोटं वाटतं तुला ? " किशोरी म्हणाली, " उदाहरण दाखवायला दूर नको जायला !—माझी आई आहे ! ती लहानपणीं भारी भित्री होती म्हणे ! पण ती इतक्या कांहीं कठीण प्रसंगांतून गेली आहे—मला माहित नाहींत,—ते—पण तिच्यासारखा धीटपणा असलेला पुरुष मी कांहीं अजून पाहिला नाहीं ! "

किशोरी जरा गंभीर झाली एकदम ! पुन्हां गाडी भलत्याच रुळावर जाण्याचा रंग दिसूं लागला ! त्याला वळण देणें जरूर होतें. कुमारानें कल्पना

सुचावेली, "एकाद्या सिनेमाशोला जाऊं या !– " आणि लगेच त्यांचे पाय सिनेमागृहाच्या रस्त्याकडे वळलेही ! कसला इंग्लिश शो होता कोणास ठाऊक ! बाहेर चिक्कार गर्दी होती आणि तीही कॉलेज तरुणांची ! कोणीतरी किशोरीला पाहिलें ! झालें ! एकादी सुप्रसिद्ध सिनेमा नटी दिसली, कीं तिला पाहायला जशी गर्दी जमावी, तसे किशोरीच्या भोंवती—काव्यचंद्रिका ना ती सुप्रसिद्ध ?– विद्यार्थ्यांनीं हां हां म्हणतां गर्दी केली ! तिकडे हाऊस-फुल्लची पाटी लागली ! सिनेमा शो नाहीं तर किशोरीचें दर्शन ! जो तो फाऊंटनपेन आणि नोटबुक, किशोरीपुढें करून तिची स्वाक्षरी मिळविण्यासाठीं धडपडूं लागला ! गाडीबरोबर नळ्याची यात्रा ! कुमारवरही तोच प्रसंग !

लोकप्रिय व्यक्तीचे जिणें मोठें कठीण ! त्यांना हवा असेल तेव्हां एकांत कोणी मिळूं देईल तर शपथ ! याही ठिकाणीं ' *ती तीं पदें फिरून येतीं । त्या त्याच अर्थाप्रति दावितातीं !*' याचा प्रत्यय किशोरी–कुमाराला घ्यावा लागला इच्छा नसतांना !



शोभनेच्या, बी. ए., बी.टी., टी. डी. एच् डी. असलेल्या विद्वान सहकारीबाई गुलाबबाई–मोठ्या कर्तबगार आणि चळवळ्या होत्या. त्या शाळेंत असल्या म्हणजे त्या जितक्या उत्तम शिकवीत, तितकीच बहुमोल कामगिरी त्या शाळेला भरभराटीस नेण्याकरितां बाहेर पडल्यानंतरही करीत ! कन्याविद्यालयाच्या अंतर्गत कारभारावर आणि मुलींच्या अभ्यासावर लक्ष द्यावें असें शोभनेनें ! आणि बाहेर पडून, मोठमोठ्या श्रीमान् धनिकांना भेटून, त्यांना विद्यालयाबद्दलची माहिती देऊन, जें उणें असेल, त्याची जोड धनिकांकडून मिळवावी, अशी तिच्या गुलाबबाईनींच ! थोडक्यांत म्हणजे शोभना आणि गुलाबबाई एकमेकींना चांगल्याच पूरक होत्या आणि म्हणूनच त्यांचें कन्याविद्यालय एकसारखें भरभराटत चाललें होतें. विद्यार्थीनींच्या वाढत्या गर्दीमुळें तयार झालेली इमारत पुरेनाशीं झाली होती. ती वाढविण्याकडे लक्ष पुरविणें अगत्याचें होतेंच; पण विद्यार्थीनींना खेळायला प्लेग्राऊंडचीही वाण भासत होती. तशीच एक चांगली स्वतंत्र अशी लायब्ररी पण हवी होती. अशीं मोठमोठीं कामें फीमधून, आणि अल्पस्वल्प मिळणाऱ्या किरकोळ देणग्यांतून कां तडीला जात असतात ?

'कन्याविद्यालया'च्या नव्या वाढदिसाच्या आंत, एक लायब्ररीरूम–कोणाच्या तरी सहाय्यावर जोडायचीच, असा गुलाबबाईनीं संकल्प केला होता; आणि त्याप्रमाणें त्या प्रयत्नाला लागल्या होत्या. एकदां गुलाबबाईनीं संकल्प केला–कामाची दिशा आंखली आणि त्या उद्योगाला त्यांनीं हात घातला कीं, त्या कार्याची पूर्तता त्यांना केलीच म्हणून समजावें! त्यांच्या हाताला तसें यश तर होतेंच. पण त्या आपल्या प्रयत्नांची शिकस्तही तितकीच करीत असत!

विलायतेंत राहून त्यांनीं नुसतें पुस्तकीज्ञानच पैदा केलें नव्हतें, तर हातीं घेतलेल्या कामांत चिकाटीनें यश मिळवून देणारा पाद्रीपणा कसा करावा लागतो, ह्याचें शिक्षण त्यांनी चांगलेंच संपादिलें होतें! असें असल्याशिवाय कां मोठमोठीं कार्यें जगाला दाखवून, मोठेपणा मिळवितां येत असतो? सध्यां त्यांनीं लायब्ररीरूमचें कार्य करून घेण्याकरितां आपल्या प्रसादला हेरलेंही होतें आणि घेरलेंही होतें! प्रसादचा मासा आपल्या गळाला लवकरच लागणार, हा भरंवसा गुलाबबाईंना वाटूं लागला होता!

प्रसादची पहिली भेट गुलाबबाईनीं अशाच एका आपल्या ओळखीच्या आणि प्रसाद ज्यांचें ऐकतो, अशाला बरोबर नेऊनच घेतली होती! पण त्यानंतर प्रसाद आपल्याला वेळ केव्हां आहे, केव्हां भेटूं शकूं, हें सांगे; त्या त्याप्रमाणें गुलाबबाई बिनचूक त्याच्या भेटीला जात! आतांपर्यंत त्या दोघांच्या अशा किती वेळां तरी भेटी झाल्या होत्या.

पंडितांनीं आयुष्यभर देशाला आपलें तन-मन-धन दिलें होतें. प्रसादनें मात्र अजून देशाकरितां कांहींच केलें नव्हतें! धनांत भर टाकण्याकरितांच सारें लक्ष गुंतविलें होतें. बिजू त्या पैशावर हवीतशी लोळूनही असंतुष्ट राहून पुन्हां प्रसादला जेव्हां तेव्हां फटकारीत असेच! कुमार, प्रकाश आणि सुधा हीं मुलें मात्र श्रीमंत बापाच्या जिवावर मनमानेल तशी अहोरात्र आपल्या जीवाची मुंबई करीत होतीं! सारांश इतकाच, कीं प्रसादचें वैभव संसारांत विलसत होतें. देशाला त्याचा वांटा अजून मिळायचा होता! मिळाला नव्हता!

पंडितांचें आणि चारुशीलेचें कांहींतरी स्मारक करावें, अशी कल्पना प्रसादच्या मनांत पुष्कळ दिवसापासून अधूनमधून घोळत असे. तो एकाद्या वेळीं आपल्या स्नेह्यासोबत्यांजवळ बोललाही असेल ती कल्पना! हा धागा

गुलाबबाईंच्या हातीं आला होता. तशीच प्रसादची बहिण मंदाकिनी हिला उच्च शिक्षणाप्रीत्यर्थ परदेशी जाऊं दिली होती त्यानें, हीही माहिती गुलाबबाईंनीं प्रसादकडे जाण्याअगोदर संग्रहित करून ठेवली होती.

चारुशीलेचें स्मारक म्हणून लायब्ररीरूम बांधून देण्याचें अभिवचन गुलाबबाईंनीं मिळविलें, प्रसादकडून गोडगोड बोलून अखेर ! आणि त्या लायब्ररीरूममध्यें चारुशीलेचा मोठा एन्लार्जमेंटही ठेवण्याबद्दल आग्रह केला आणखी! पंडितांचें स्मारक प्लेग्राऊंडच्या रूपानें करायला प्रसादला भाग पाडावें, असें गुलाबबाईंच्या मनांत आलें ! पण त्या बोलल्या नाहींत. एकाच वेळीं अनेक मागण्या केल्या तर न जाणों, एकही साध्य होणार नाहीं; ही जाणीव गुलाबबाईंना न ठेऊन चालण्यासारखें नव्हतें ! लायब्ररीरूम बांधून देण्याची कल्पना गुलाबबाईंनीं प्रसादपुढें एकदम मांडली म्हणतां कीं काय ! छेः ! तशा त्या महाधोरणी आणि दूरदर्शी ! दुसऱ्या भेटीच्या वेळीं, मिळालेल्या थोडक्या वेळाचा त्यांनीं फायदा घेतला तो कन्याविद्यालयाच्या वार्षिक समारंभाचें अध्यक्षपद स्वीकारावें, अशी त्याला विनंती करून प्रसादला खुलविण्यांत आणि आपल्या विद्यालयाविषयीं आपुलकीनें पहायला लावण्यांत !

—प्र. पं. क्षीरसागर या धनिक सज्जनांनीं आपल्या विद्यालयाला लायब्ररीरूम बांधून देण्याचें अभिवचन दिल्याची शुभवार्ता गुलाबबाई शोभनेला कळवायला आणि त्यांना वार्षिक समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती केल्याचें आणि त्यालाही त्यांनीं मान्यता दिल्याचें सांगायला शोभनेकडे आल्या होत्या. आणि तो दिवस म्हणजेच तो सुप्रसिद्ध—कीं कुप्रसिद्ध—किशोरीकुमाराच्या फार दिवस ध्यानांत राहणारा दिवस ! भल्या आणि बुऱ्या कसल्याहीं परिस्थितीचें जाळें, असंख्य आडव्या—उभ्या—तिरप्या—वांकड्या धाग्यानीं विणले जात असतें ! किशोर—कुमारी आपल्या प्रेमाचें महावस्त्र सरळ आडव्या—उभ्या धाग्यांनीं विणण्याच्या उद्योगांत असतांना त्याचवेळीं परिस्थिति दुसरे धागे त्यांत जोडण्याची तयारी करीत असेल का ?

—प्र. पं. किंवा पी. पी. क्षीरसागराचें नुसतें नांव ऐकून शोभनेच्या मनावर कसलाच परिणाम होणें शक्य नव्हतें ! कोणी तरी धनिक असेल, इतकीच तिची कल्पना ! आपल्या विद्यालयाच्या तो उपयोगी पडायला तयार झाला, याबद्दल समाधान वाटायला कांहींच हरकत नव्हती शोभनेला ! दोघींनाही

त्या घटनेबद्दल व त्या घटनेला कारण होणार असणाऱ्या बद्दल गुलाबबाई नी शोभना या दोघींना सारखाच आनंद झाला !

——वार्षिक समारंभाची कसकशी तयारी करायला हवी, यावरही त्या दोघींची त्या दिवशीं बरीच बोलणीं झालीं !

——प्रसादनें सहज म्हणून विचारलें तेव्हां आपल्या शाळेंत किती अध्यापिका आहेत, कोण आहेत, कशा लायक आहेत, हें सर्व गुलाबबाईनीं त्यांना सांगितलें. त्यांत अर्थात् शोभना देशमानेचा प्रमुखपणानें उल्लेख आलाच होता ! आपल्या बरोबरीच्या शोभनाबाई आहेत, त्यांच्या सहकार्यामुळेंच विद्यालयाची भरभराट साधणं सुलभ झालें आहे, इतकें सांगायला कमी केलें नाहीं. गुलाबबाईनीं विद्यालयाबद्दलची साद्यंत हकीकत सांगितली ती ऐकून प्रसादला बरें वाटलें. पण विशेष कांहीं वाटलें नाहीं. जास्त चौकशीहि त्यानें शोभनेबद्दल केली नाहीं. कशाला करील ? शोभना कोण हें त्याला कसें कळणार ? आणि अनोळखी अध्यापिकेची चौकशी तो अकारण कां करील ?

गुलाबबाईना माहित नव्हतें किंवा प्रसादलाहि कल्पना नव्हती तरी कवि निसर्ग–गुणगुणत होताच——

*तीं तीं पदें फिरून येतीं !*
*त्या त्याच अर्थाप्रति दावितातीं ।*

● ● ●
● ● ●

किशोरी कुमाराकडे आली होती. कुमार माडीवर होता. पण किशोरी सरळ पहिल्यांदा त्याच्याकडे गेली नाहीं. अगोदर बिजूला भेटली. बाकी ती तशी निघाली असती, तरी बिजूनें तिला जाऊं दिलें नसतेंच तसें ! बिजू-जवळ बसली, बोलली. तिच्या आग्रहावरून एक कवितासुद्धां म्हणून दाखविली किशोरीनें ! सासूचा बहुमान केला सूनबाईनीं याचाच बिजूला आनंद झाला ! कुमारकडे जाण्याचा राजरोस परवाना मिळाला, त्याबद्दल किशोरीला आनंद वाटला ! राजरोस परवाना घेऊन ती कुमाराकडे वर गेली.

——आणि प्रसाद छापखान्यांतून त्याच वेळीं सहज कशाला घरीं आला ! सौभाग्यवतीची स्वारी बहुता दिवशीं खुषीत असल्याचें पाहून प्रसादला

आश्चर्यच वाटलें ! विचारायचें मनांत आलें; पण न जाणों, विचारलें कीं एकादे वेळीं बिनसायचें आणि फट् म्हणतां ब्रह्महत्या होतें, तसें व्हायचें ! म्हणून त्यानें कांहीं बोलणें केलेंच नाहीं. पण बिजूनें प्रसादला फार वेळपर्यंत बुचकळ्यांत ठेवलें नाहीं. लाडांत येऊन तिनें प्रसादशीं बोलायला सुरवात केली, " पाहिलीत कां ती ? "

" कोण ती ? "

" इश्श ! कोण म्हणजे ? किशोरी घरीं आली आहे ना ? "

" असं का ? मी नाहीं पाहिली ! "

" पहावी ना तिला एकदां ! "

" घरीं येणाऱ्या दुसऱ्याच्या मुलीला मी पाहिलेलं खपत नाहीं ना तुला ? आकाशपाताळ एक करतेस कीं ! मग कशाला पहा ! " शांतपणानें प्रसाद उत्तरला ! पण काय झोंबलें बिजूला ! तिनें गरगरगर डोळे फिरविले प्रसादकडे पाहून आणि कडकडली त्याच्यावर !

" सांगायला गेलं कीं टांगायला न्यायचा हा न्याय चांगला आहे म्हणायचा तुमचा ! हात धर म्हटलं कीं तो तोडूनच काढायचा याला म्हणतात ! "

" मी कांहीं चुकलों काय ? "

" लाथ मारली नाहींत अजून—छेः चूक कसली ? "

" क्षमा मागूं का बाईसाहेबांची ? "

" डोळ्यांत बोट खुपसा नी मग फुंकर घाला कीं ! " बिजू धुसफुसत म्हणाली, " जेव्हां तेव्हां हें अस्स ! कधीं म्हणून माणसानं गोड बोलूंच नये का ? "

" माझ्या मनापुढें हाच प्रश्न नेहमीं असतो उभा ! "

" बरं बरं ! समजली अक्कल ! आतां एक विचारतें, किशोरीला पाहाणार आहांत कीं नाहीं ? "

" हा माझ्यावर जुलूम आहे असं नाहीं वाटत ? "

" सुनमुख पाहाणें जुलूम आहे कां ? "

" सुनबाई ? आपल्या घरांत कोणाचं लग्न झालें आहे बोवा ? मला

तर ठाऊक नाहीं ! मला न विचारतांच कुमाराचं लग्न लावून टाकलेलं दिसतंय ! ”

“ अहाहा ! दिवे ओवाळा अकलेवरून ! ”

“ लग्नाआधीं सून येत असतें असं समजण्याची अक्कल आम्हांला नाहीं बोवा ! वाईट वाटतं त्याबद्दल ! ”

“ कुमार किशोरीशीं लग्न करणार आहे, हें तरी ठाऊक आहे कां इकडे ? ”

“ कुमारानं पसंत केली तिला ? ”

“ राजाला दिवाळी कशाला माहीत असेल ? ”

“ तुझ्या पसंतीला पडली सून ? ”

“ हो; त्याखेरीज कां मी इकडे तिला इतक्या हौसेनें नी आनंदानं पहा म्हणून सांगायला सजलें होतें ? पोरगी कशी नक्षत्रासारखी आहे ! ”

“ सासूनं सून पसंत केली. नवऱ्यानं बायको पसंत केली ! झालं ! आतां माझं काय काम ? मी ओझ्याचा बैल. पैशाची गोणी आण म्हटलं कीं आणावी. ओत म्हटलं कीं ओतावी ! बस्स ! ”

“ आतां मला जास्त चिडवूं नये--बजावतें अगोदर ! मग माझ्या तोंडाला सुमार नाहीं रहायचा ! ”

“ बाईसाहेबांची आज्ञाच आहे तेव्हां पाहिलं पाहिजे किशोरीला ! ”

प्रसाद मनासारखं बोलला. बिजूला बरं वाटलं ! तिच्या रागाचा पारा जरा खालीं आला तेवढयानें !

“ असं माणसासारखं बोलत जा कीं माझ्याशीं कधीं तरी ! ”

“ बरं !—”

“ मग आतां माडीवर जाऊन पहा बरं तिला—”

“ किशोरी कोणाची हें माहीत आहे तुला ? ”

“ म्हणजे ? त्या कन्या–विद्यालयांत कोण शोभनाबाई म्हणून मास्तरीण-बाई आहेत म्हणतात, त्यांची मुलगी नव्हे का ती ? मला जेवढी माहिती आहे तेवढीही इकडे असूं नये ? अन् म्हणे हे मोठे ! ”

“ मास्तरणीची मुलगी होय ? अस्सं ! ”

“ बरं तिची जात, गोत, कूळ, घराणं याची कांहीं माहिती ? ”

“ तें मी पहायचं असतं का? मग तुम्हीं कर्ते पुरुष घरांत कशाला हवेत ?

नुसते दोन वेळां जेवायला, नी बायकोचा असा उठल्यासुटल्या पाण-उतारा करायला ? ”

“ पण आतां सारं कांहीं परस्पर ठरूनसुद्धां गेलं आहे ना ? — मग आतां उगीच भलत्या चौकशा करण्यांत हंशील काय ? ” प्रसाद कांहीं आपल्याशीं पण बिजूला ऐकायला जाईलसें पुटपुटला, “ बाकी, वधू-वरांच्या जाती पहा, कुळं पहा, चौकशी करा. गण- गोत्र धुंडाळा ! पत्रिकांचा पिच्छा पुरवा, हें राहिलं आहे कुठें म्हणा ? जुन्या वेडगळ आचरट चाली! केव्हांच त्या सगळ्यांना गाडलं आहे सुज्ञांनीं ! तरुण- तरुणी राहूं शकतात ना गुण्या-गोविंदानें ! आमचे लाडकाका नी विठाकाकू नांदतातच कीं नाहीं आनंदांत ? कोणी कोणाबद्दल घासाघीस केली होती कधीं ? तुमच्या आमच्या वेळचे का दिवस आहेत आतां ? — ”

“ माझ्याशीं नसता वाद घालायला नको ! किशोरीला पाहायचं असलं तर पहा. नाहीं पाहिलं तर माझं कांहीं एक वेंचत नाहीं ! ” असें म्हणून बिजू फणफणत तिथून चालती झाली ! “ आतां पुन्हां कधीं काहीं गोडी गुलबाईनें सांगायला आलें तर माझं नांव बदलीन ! ” जातां जातां तिनें प्रसादला हें ऐकवलें. किशोरी कवयित्री आहे. कुमार तिच्याबरोबर फिरतो ! ती त्याच्याबरोबर असते ! उद्यां तीं दोघे लग्न करतील, किंवा काय वाटेल तें करायला तयार होतील, याबद्दल प्रसादला बरेंच माहीत होतें. पण आपल्या कुमारला सांगासुचवायची, हें कर, तें करूं नकोस, असें सांगण्याची त्याला छातीच नव्हती ! कुमार आपलें ऐकायला तरी तयार होईल कीं नाहीं, हीच त्याला शंका होती. कुमार आपला मुलगा आहे. आपण आपल्या तारुण्यांत काय केलें ? कसें वागलों ? ज्याला जसें, ज्यावेळीं वागतां आलें नाहीं, त्याला तसें त्यावेळीं वाग असें दुसऱ्याला सांगण्याचें, धारिष्ट कुठें असतें ?

—पुष्कळदां आपल्या घरीं येऊनही किशोरीला प्रसादनें पाहिलें नव्हतें. आतां अनायासें यावेळीं ती घरीं आलीच आहे; तेव्हां तिला पहावें, थोडेसें तिच्याशीं बोलावें, बरोबरीच्या नात्यानें, सन्मानानें बोलायला काय हरकत आहे मनांत आलें आणि प्रसाद किशोरीला पहायला वर निघाला. प्रसाद नी

बिजू यांच्यामध्यें किशोरीच्या पाहाण्यावरून जेव्हां खालीं जंगी वादळ उठलें होतें, तेव्हां त्या दोघांचें माडीवर काय चाललें होतें ?

दोघांच्या प्रेमाला वाचा फुटली होती ! उघड शब्दांची देवाण-घेवाण दोघांतही मोकळया मनानें चालली होती.

" मी तुला आवडतो ? "

" तुला मी आवडतें ? "

दोघांचें एकाक्षरी उत्तर " हो ! "

" तूं कुठची ? "

" तूं कोणाचा ? "

या प्रश्नाला उत्तर " करायचं काय त्याच्याशीं ? "

" मग आपण एकमेकांना कां आवडलों ? "

कुमाराला उत्तर सुचेना !

किशोरीनें कवितेंत उत्तर दिलें ! स्वतःच्या नव्हे ! कै. अनंततनयांच्या ! अशा वेळीं आत्पवाक्याचाच खरा उपयोग असतो ना !

किशोरीनें कविता म्हटली—

*" पूर्वीची न ओळख जरी ही ।*
*वर वधूस प्रेमें पाहीं । नवलची !*
*आवळेंगिरीं, लवण सागरीं, एक होतां ही । खावया*
*मधुरता येई ॥ नवलची ॥*

प्रेमाचें गहन गूढ हें असेंच आहे ! त्याला ओळख नको ! जात नको ! परिचय नको ! बोलणें नको कीं कांहीं नको !

कुमाराला आतां स्फुरण आलें. तो म्हणाला, "तरीच बरं का, महाकवी शेक्सपिअर अशाच प्रेमवेडयांना उद्देशून उद्गारला आहे,

The dunatic, the lover and the poet are imagination & of all compact !

दोघांनाही तें पटलें. आवडलें ! कारण दोघेही तसेंच प्रेमवेडे बनले होते !

" मी भेटायच्या अगादेर, आपल्या प्रेमाला भागीदार तूं शोधले होतेस का ? "

" आणि तू ? "

" हो ! कापडाच्या दुकानांत गेल्यावर मनपसंत कापड सांपडेपर्यंत आपण थोडया का कापडाच्या घडया उलथ्या पालथ्या करतों ? मी केलें आहे तसें ! "

" हो ! अन् मी पण ! "

" शेवटीं दैवयोगानें– प्रेमाच्या प्रेरणेनें आपण असें समोरासमोर आलों ना ? — "

दोघेही नाजूक हंसली. प्रीती भरल्या चारी डोळयांच्या भेटी झाल्या ! अन् त्याच वेळीं प्रसाद किशोरीला पहायला तेथें उपस्थित झाला ! प्रसादच्या पायांच्या चाहुलीनें तीं भानांवर आलीं ! पुन्हां विक्षेप !

" *तीं तीं पदें फिरूनी येतीं । त्या त्या अर्थाप्रति दावितातीं !* "

हा अनुभव दोघांची पाठ कुठली सोडायला ? — कां असें व्हावें ? कोण सांगणार ?



## प्रकरण चौदावें

किशोरीच्या नादाला लागल्यापासून कुमाराच्या अगोदरच्या मैत्रिणींपैकीं एक दोन मैत्रिणींना त्याचा फारच राग आला होता. एकीचा कुमाराच्या श्रीमंतीवर डोळा होता म्हणून त्याच्याशीं लग्न व्हावें असें तिला वाटत असे. दुसरीला त्याच्या बुद्धीमत्तेनें भारले होतें. आपण कुमाराला वरलें तर त्याच्या संगतींत प्रेमाचा संसार होईल अशी दुसरीची भावना होती. पण अलीकडे सगळ्याजणींनाच किशोरीनें कुमाराला महाग करून टाकला होता. एक दोघींनीं मात्र त्याचा पिच्छा पुरविण्याची प्रतिज्ञा केली होती. आपल्यापेक्षां किशोरींत जास्त काय आहे ? ती कुमाराला हवीशीं वाटावी नी आपणाला त्यानें विसरावें, असें कां ?

किशोरीशिवाय कुमार एकटाच आहे, अशी संधी साधून पहिलीनें त्याला गांठले. खूप त्याचा वेळ घेतला. बोलण्यानें, हंसण्यानें, हावभावानें त्याचें मन खेंचण्याची शिकस्त चालविली. पण त्या बहाद्दरानें युक्तियुक्ती करून तिच्या हातावर तुरी देऊन तिला सहीसलामत वाटेला लावले ! पण दुसरी तशी लेंचीपेंची नव्हती. महा वस्ताद होती ती ! कुमाराला तिनें गांठून अशीं कांहीं जाळीं पसरायला सुरुवात केली कीं ज्याचें नांव तें ! नारी-जनांशीं नरांची प्रीति सहसा स्थिर असूंच शकत नाहीं, असें कालिदासानें जें एकदां सुभाषित लिहून ठेवलें आहे, तें किशोरीच्यासंबंधांत कुमार आपल्या या मैत्रिणींच्या मोहिनीनें अल्पकाळांत सत्य करून दाखविणार, असा रंग दिसण्याची वेळ आली ! दिवसांतून दहा पातळें नी तितकींच

झंपर्स बदलावींत; तोंडावरच्या पावडरीच्या शोभेला यत्किंचितही बिघडवूं देऊं नये—

—सिनेमाला चलण्याचा लाडका लडिवाळ हट्ट धरून त्याला आपल्या बरोबर बाहेर काढावें, किशोरीला अजिबात तो कसा विसरेल, आपल्याकडेच त्याचे सारें चित्त, सारा वेळ कसा वेधेल, याकरितां आपल्या जवळचीं सर्व आयुधें ती एकसमयावच्छेदें करून उपयोगांत आणीत होती. त्याच सुमारास तिच्या सुदैवानें—कशा कारणामुळें कोण जाणें—किशोरी कुमाराकडे येऊं शकली नव्हती ! त्यालाही तिच्याकडे जायला मिळालें नव्हतें ! त्याला तिचें स्मरण होतें. पण त्याची मैत्रिण, किशोरीचें चिंतन तो करूं लागेल इतकी उसंतच त्याला देत नव्हती ! पुरुषाची जात ! किशोरी दृष्टि आड झाली. पहिली मैत्रिण समोर येऊन ती कुमाराच्या सभोंवार पिंगा घालूं लागली. कुमाराचें मन विरघळूं लागण्याच्या टोंकावर येऊन टेकलें !

एकदां कुमाराची ही नवी मैत्रिण माडीवर हंसत जात असतां प्रसादनें व बिजूनें एकदमच तिला पाहिलें. तेव्हां थोडा वेळ जाऊं देऊन प्रसादनें मिस्किलस्वरांत बिजूला विचारलें, " आतां दुसरी आणखी कोण तुमच्या चिरंजीवांनीं तुमच्याकरितां ही सून पैदा केली ? ती किशोरी कुठें गुप्त झाली ? तुमची सून मग ही का ती ? हीही तुम्हांला पसंत आहे ना ? " जाणूनउमजून नागिणीच्या शेपटीवर प्रसादनें पाय दिला. पण तिनें फणा काढून फूत्कार करीपर्यंत तो तेथें मग थांबतो कशाला ? पळाला तो ! तोच दिवस, तीच वेळ, तीच बैठक ! खालून दोघांकरितां वर चहा आला होता. कुमारचें आपल्या मैत्रिणी समवेत चहापान चालूं होतें. दोघांमध्यें मजेचा संवाद चालला होता. मैत्रिणीच्या बोलण्यांत कुमार इतका समरस होऊन गेला होता कीं, त्याला त्या वेळीं जर कोणी किशोरीबद्दल प्रश्न टाकला असतां, तर किशोरी या नांवाची कोणी तरुणी आपल्याला कधीं पाहावयाला तरी मिळाली होती का ? असाच प्रश्न त्याला क्षणभर पडला असतां ! "कुमारला आपण जवळजवळ जिंकला !" असा भरंवसा तिला वाटूं लागला! "ही आपल्या जन्माची प्रीतीची सांगातीण," अशी कल्पना कुमाराच्या मनांत हेलकावत असेल— "किती छान चहा आहे नाहीं ?" असा हंसत प्रश्न करीत आपल्या कपांतला चहा कुमाराच्या अर्ध्या झालेल्या

कपांत ती ओतीत आहे—ह्या वेळीं—अगदीं ह्याच वेळीं कुमाराला भेटायला म्हणून किशोरी दडदड जिना चढून वर आली !

कुमाराचा विरह तिला असह्य झाला होता. जितके दिवस तितकींच युगें कुमारच्या भेटीशिवाय लोटली असावींत, असें किशोरीला होऊन गेलें होतें ! इतक्या आवेगांत ती वर आली होती आणि पहाते तों तिच्यापुढें हें दृश्य ! किशोरी चमकली ! कुमार गोंधळला ! त्याच्या मैत्रिणीच्या हातांतील कप खालीं गळूनच पडला ! चहा सांडला ! कपबशींचे तुकडे तुकडे झाले. किशोरीनें वरच्या दातांखालीं खालचा ओंठ करकचला ! संतापातिरेकानें त्या दोघाकडे क्षणमात्र पाहिलें, आणि ती त्याच पावलीं आली तशी पण फणफत परतली ! ताड्ताड् जिना उतरून निघून सुद्धां गेली ! चुकूनसुद्धां तिनें मागें वळून पाहिलें नाहीं !

भानावर आलेला कुमार, " किशोरी ? किशोरी ! चाललीस का ? परत तर ये ! माझं ऐक जरा—" वगैरे बडबडत तिच्या मागें धावला ! पण ती त्याच्या दृष्टीआड केव्हांच झाली होती ! किशोरीच्या कटाक्षासरशी आपलें सारे प्रयत्न मातीमोल झाले, हें शल्य त्या मैत्रिणीच्या जिव्हारीं झोंबलें ! ती रडली. पण तिची समजूत करण्या इतका भानावर होता कुठें कुमार ? कुमाराकडे करुण दृष्टीनें पहात आणि किशोरीला शिव्याशाप देत कुमाराची ती मैत्रीण तेथून केव्हां निघून गेली, हेंही कुमाराला कळलें नाहीं.

किशोरीचा गैरसमज दूर करण्यासाठीं नी तिची मन धरणी करण्यासाठीं कुमाराला तात्रडतोब किशोरीकडे जावें असें वाटलें ! पण त्याची छाती होईना. इकडे ही मैत्रिणही दुखावली गेली याचें त्याला वाईट वाटल्यावांचून राहिलें नाहीं; पण किशोरी आपल्यावर रागावली, यामुळें तर आपल्या हृदयाला भयंकर जखम झाली असेच कुमाराला वाटलें.

दोन दिवस मध्यें कसेंबसें जाऊं देऊन, किशोरीजवळ काय—कसें बोलायचें—वागायचें, हें पुरतें मनाशीं ठरवून कुमार किशोरीच्या घरीं जायला तर निघाला ! त्यावेळीं किशोरी आपल्या जुन्या मित्रांच्या गराड्यांत गवसली होती. तिनें त्या सर्वांना बोलावून आणलें होतें की तेच होऊन तिच्याकडे आले होते कोण जाणें ! एकेक जण अशा पोषाखांत, झोकानोकांत आणि तोऱ्यांत येऊन बसला होता कीं, त्यांच्याकडे पाहाणारास वाटलें असतें, कोणा राज-

कन्येचें स्वयंवर थाटलें आहे, आणि ठिकठिकाणचे राजपुत्र त्यासाठीं तेथें उपस्थित झाले असून प्रत्येकाला वाटत आहे, स्वयंवराची माला किशोरी आपल्याच गळ्यांत घालणार आहे. एकजण, किशोरीच्या काव्याचें नवें पुस्तक आपण प्रकाशित करावें, म्हणून तिची परवानगी मागून किशोरीचें मन जिंकण्यास आला होता. दुसऱ्यानें, किशोरीनें सिनेमांत काम करावें-एका कंपनीला तिची जरूर आहे, तिनें कबूल करावें, पुढली सर्व व्यवस्था आपण करूं, हें सुचविण्यास आणि तिनें मान्यता देऊन पैसा आणि कीर्ति दाराशीं चालून आली आहे, तिचा अव्हेर करूं नये, अशी आग्रहाची विनंति करायला आला होता. बाकीचे चारसहा तरुण, त्या दोघांबरोबर फक्त किशोरीला पाहाण्याच्या कुतुहलानें आले होते ! पुष्कळ लोक सिनेमा नटीच्या बिन्हार्डी याच दृष्टीनें नाहीं का जात? आणि तिथल्या खऱ्या खोट्या गोष्टी आपल्या स्नेह्यांना सांगून चारचौघांत आपला मोठेपणा मिरवीत ! तशांतला प्रकार होता !

येथेंही चहा, फराळाची धामधूम माजून राहिली होती ! किशोरी घरीं आलेल्या साऱ्याशींच खुल्या दिल्यानें, बोलत होती, हंसत खिदळत होती.

अशा या वेळीं कुमार किशोरीकडे तेथें आला ! किशोरीनें त्याच्याकडे पाहिलें. पण न पाहिलेसें करून दाखविलें ! आपला सूड घेण्यासाठीं तर किशोरीनें मुद्दाम हा डाव रचला नाहीं ? कुमाराच्या मनांत हें आल्याशिवाय राहिलें नाहीं. कुमार आला. बसला. त्याच्या हृदयाला झोंबलें हें ! पण त्यानें प्रयासानें आपल्या चेहऱ्यावर अंतरंगांतली चलबिचल उमटूं दिली नाहीं. तो आल्यावर तर किशोरी मुद्दामच आणि जास्तच एकेकाबरोबर अघळपघळ बोलूं लागली. हंसू लागली. मध्येंच कुमाराकडे पाही. मनांत हंसे ! मान वेळी, आणि त्याच्याकडे दुर्लक्ष करी. ”

प्रयत्नपूर्वक कुमाराच्या ध्यानांत आपलें वागणें यावें, याबद्दल किशोरी कोशीस करीत होती. तिची खात्री होतीच कीं, कुमार आपल्याकडे आल्याशिवाय राहणार नाहीं. आपलें पाय धरल्यावांचून सोडणार नाहीं. तिच्या कल्पनेप्रमाणेंच तो आला होता ! त्याच्यापुढें तिनें असा मीनाबाजार मांडला होता ! आपलें हें वागणें तोडीस तोड झालें, ही कल्पना किशोरीला आनंद देत होती. आम्हीं बायकाही कांहीं कमी नसतो ! हें कुमाराला आपण कृतीनें दाखविलें. भलें झालें ! असें जरी किशोरीला वाटलें तरी तिला

एक चमत्कार जाणवला. कुमाराच्या घरीं आपण संतापलों–जळफळलों! पण कुमार आपल्या येथें निर्विकार शांत आहे! तो कसा? चिडत कां नाहीं? त्याला आपली वागणूक असह्य होऊन जावेसें कां वाटत नाहीं? स्त्रियांना दुखवावें पुरुषांनीं आणि स्त्रियांनीं दुखवलें असतां निधड्या छातीनें सहन करावेंही पुरुषांनींच! कुमारानें किशोरीच्या मनांत हे विचार घोळायला लावले आपल्या वागण्यानें! सारें तरुण किशोरीचा निरोप घेऊन निघाले! कुमारानेंही हंसत हंसत किशोरीचा निरोप घेतला! सर्वांच्या मागून तो जिना उतरत होता! आतांपर्यंत किशोरीनें उसने आणलेलें अवसान गळालें! तिनें हलकेंच मागून त्याच्या कोटाच्या टोंकाला धरून ओढलें! त्यानें मागें वळून पाहिलें. किशोरीच्या डोळ्यांत अश्रूंचे मोतीं चमकत होतें! तो थांबला. मुकाट्यानें परत येऊन बसला!

" तूंच मला शेवटीं जिंकलंस!" किती वेळानें तरी आनंदानें स्फुंदत किशोरी उद्गारली! " तुला माझा राग आला नाहीं?"

" वेडी! इतर तरुणांबरोबर कितीही मन मोकळेपणानें तरुणी वागत असल्या तरी, त्या सगळ्यांना कां आपलें प्रेम देत असतात! त्यांच्या खऱ्या प्रेमाचा लाभ ज्याचा त्यालाच होत असतो! सगळ्यांशीं तूं इतकी चांगली वागूं शकतेस! याचा मी राग धरीन का आनंद मानीन? मला खरोखरीच आनंद झाला!" मनापासून कुमार म्हणाला आणि साभिमान हंसला!

" आणि म्हणूनच मी म्हटलें, तुला मी जिंकायच्या ऐवजीं तूंच मला जिंकलेंस!" किशोरी निरभिमानपणें उद्गारली!

दोघेहि कितीतरी वेळ एकमेकांकडे प्रेमभरानें पहात राहिलें!

  

' कन्या विद्यालयाचा ' वाढदिवससमारंभाचा दिवस होता तो! प्रवेश-द्वारावर भव्य कमान उभारली होती. बाहेरच्या पटांगणांत आणि व्याख्या-नाच्या दिवाणखान्यांत रंगीबेरंगी पातळ कागदाच्या पताका फडकत होत्या. अध्यक्षासाठीं उंच व्यासपीठ तयार करण्यांत आलें होतें. थोरांचीं वचनें, सुभाषितें, व त्यांच्या भव्य तसबिरांनीं कन्या विद्यालयांतील व्याख्यान हॉलची

शोभा शतगुणित झाली होती जिकडे पहावें तिकडे टापटीप, सुव्यवस्था आणि आकर्षता दिसून येत होती !

व्यासपीठावर सिंहासनसदृश्य अशी मखमालीची उंच खुर्ची अध्यक्षाकरतां ठेवण्यांत आली असून, तिच्या डाव्या उजव्या बाजूला दोन खुर्च्या होत्याच. पण अध्यक्षीय खुर्चीच्या पाठीमागेंही कांहीं बऱ्याचशा खुर्च्या शहरांतील प्रतिष्ठित व विद्यालयाशीं संबंध असणाऱ्या सन्मान्य अशा थोर थोर स्त्रीपुरुषां-करितां मांडण्यांत आल्या होत्या.

लहानमुलींना घरून आणणारी आणि पोंचविणारी म्हातारीबाई ती आपली सरशीच होती ! ( शोभनेनेंच तिला आपल्याबरोबर आणलें होतें येतांना ) तीही चांगलें लुगडें नीटनेटकें नेसून, गुलाबबाई आणि शोभना, केव्हां काय सांगतात, याकरितां त्यांच्याकडे पहात पहात त्या दोघींच्या जवळपास सावधपणानें घुटमळत होती !

हिरव्या कांठाची, पण एकजात पांढरी शुभ्र पातळें, कन्या विद्यालयाच्या सर्व विद्यार्थीनींनीं आज परिधान केलीं होती ! ( हें त्या विद्यालयाचें वैशिष्ठ्य होतें. ) परिधानांत मात्र एकसूत्रीपणा नव्हता ! कोणी गोल नेसल्या होत्या, तर कित्येकींनीं जुन्या तऱ्हेचें कासोटयाचें सोंग कायम केलें होतें. मात्र साऱ्या जणींच्याच वेणींच्या लांब शेपटया, जांभळ्या, तांबडया, हिरव्या फितीसह पाठीवर रुळत होत्या !

दिवसाची रात्र करून बाहेरची सारी व्यवस्था गुलाबबाईनीं सुंदर आणि आकर्षक ठेवण्यांत खूप मेहनत घेतली होती, तर इतर सर्व विविध नी आकर्षक कार्यक्रम तयार करण्यांत, शोभनेनें कसलीही कमतरता ठेविली नव्हती !

एकंदरींत विद्यालयाच्या वाढदिवस समारंभाची उठावणी उत्कृष्ट होईल अशीच व्यवस्था होती, यांत शंका नाहीं.

समारंभाची वेळ जसजशी जवळ येऊं लागली, तसतशी निमंत्रित मंडळी येऊं लागली. मुख्य द्वारावर, एका बाजूस गुलाबबाई व दुसरीकडे शोभना उभी होती. दोघीही आलेल्यांचें सुहास्य वदनानें नमस्कार करून मनःपूर्वक स्वागत करीत होत्या ! सन्मान्य पाहुण्यांना त्यांच्या • त्यांच्या जागा

दाखविण्याचें काम नेमलेल्या शिक्षकीणीकडे असे, त्या तें दक्षतेनें बजावीत होत्या !

चार माणसें हाताखालीं घेऊन, स्वतः उन्हांत उभे राहून गुलाबबाईनीं समारंभाकरितां विद्यालयाची शोभिवंत सजावट स्वतः सजविली होती अवघ्या दोन दिवसांत ! स्वतः उसंत घेतली नाहीं, हाताखालच्या कामकऱ्यांना घटकाभर इकडे तिकडे रमूंगमूं दिलें नाहीं ! गुलाबबाईंच्या कडव्या अमलाखालीं चुकावणे कामकरी दोन दिवसांत जेरीला आले ! पण त्यांच्याकडून गुलाबबाईनीं चोख काम करून घेतलें !

आणि शोभनेनें काय कमी श्रम केलें ? अहवाल तयार करायचा, मुलींच्या गाण्याकडे लक्ष पुरवायचे ! एक इंग्रजी नाट्य प्रवेश आणि एक मराठी नाटकांतला भाग, तिसरा संस्कृत नाटकांतला प्रवेश, त्याची निवड करण्यापासून, मुलींची निवड करून, पाठ करवून, अभिनय शिकवून, नित्य तास–दोन तास नियमित तालमी घेण्यापर्यंत शोभनेनें पुरेपूर श्रम घेतले होते !

अध्यक्ष येण्याची वेळ झाली. चालकांची दृष्टि अध्यक्षांची मोटार दिसते काय, हें पाहूं लागली. पोंगा वाजला, दुरून मोटर दिसली कीं, आली मोटार आले अध्यक्ष, अशा पुटपुटण्यांत त्यांची तारंबळ उडून जाऊं लागली ! निमंत्रित सन्मान्य अध्यक्ष अगदीं वेळेवर समारंभाच्या ठिकाणीं उपस्थित झाले आहेत, असें कधीं होते काय ? तसे ते वागले तर मग ते सन्मान्य कसले ? आणि निमंत्रीत अध्यक्ष तरी कसले ?

परंतु कन्याविद्यालयाच्या चालिकांच्या सुदैवानें आज तसें झालें नाहीं ! आजच्या समारंभाचा नियोजित अध्यक्ष प्रसाद क्षीरसागर होता. त्यानें कोणालाच काळजींत पाडलें नाहीं कीं तिष्ठत ठेवलें नाहीं. विद्यालयांतल्या मोठया घड्याळांत ठणठण ठोके पडले आणि प्रसादची मोटार विद्यालयाच्या प्रवेशद्वारावरील शृंगारलेल्या कमानींतून स्वागत स्वीकारीत डौलानें आंत शिरली !

गुलाबबाई पुढें झाल्या. मोटारींतून उतरत असलेल्या प्रसादचें त्यांनीं स्मित वदनानें हार्दिक स्वागत केलें ! प्रसादच्या पाठोपाठ बिजू पण उतरली ! तिचेंही यथोचित स्वागत गुलाबबाईनीं करून, तिच्या हाताला धरलें ! टाळ्यांच्या प्रचंड कडकडांत प्रसाद व्यासपीठावर चढत होता; टेबलावरील, कागद, दौत, टाक, पाण्याचें भांडें, घड्याळ, हीं नीटनेटकीं आहेत काय, हें

पाहण्यांत गुंतलेल्या शोभनेनें प्रसादकडे सहज मान वर करून पाहिलें—आणि काय ?—काय झालें हें सांगतां येणेंच अशक्य आहे ! तिच्या डोळ्यापुढें अंधेरीच आली ! त्यावेळीं तिनें स्वतःला कसें सांवरलें असेल, हें तिचें तिलाच माहित ! प्रसाद ? इथें ? अध्यक्ष ? आपण स्वप्नांत आहोंत कीं जागें हेंच तिला कळेना !—बऱ्या होत आलेल्या जखमेवरील खपली कोणी तरी न कळतां खस्कन् उचकटावी, म्हणजे जशा वेदना होतील—तसेंच शोभनेला त्यावेळीं झालें !



नियोजित अध्यक्षांचा अल्पपरिचय आणि अध्यक्षपद स्वीकारण्यासंबंधानें विनंती—सूचना; त्या सूचनेला अनुमोदन वगैरे वगैरे सभा—समारंभाचे ठराविक नी औपचारिक विधि झाले. प्रसाद अध्यक्षीय स्थानावर विराजमान झाला ! प्रसादसंबधीं आवश्यक तेवढी माहिती गुलाबबाईनीं गोळा करून त्याचें टांचण तयार केलें होतें. त्यावरून बोलण्याचें कार्य त्यांनीं शोभनेवर सोपविलें होतें. गुलाबबाईनीं तें ऋजूमनानेंच केलें होतें. पण तेंच आनंददायक कार्य प्रसादला पाहिल्यावर शोभनेला प्राणसंकट झालें होतें. याची गुलाबबाईना कल्पनाही नव्हती !

आरंभींच लहान मुलींनीं सुस्वर आवाजांत शारदा स्तवन नी अध्यक्षांना अनुलक्षून असलेलें स्वागतपर पद्य गायिलें. आपल्या पतीचें असें स्वागत होत असलेले पाहून बिजूला अतिशय आनंद वाटला ! ती प्रसादकडे हर्षयुक्त नजरेनें पहात होती. त्याच्याकडे इतक्या आनंदानें पाहण्याचा सुप्रसंग बिजूला आज कैक वर्षांनींच मिळाला होता ! ती अगोदर समारंभाला यायलाच तयार नव्हती. प्रसादच्या आग्रहचा तिच्याजवळ कांहीं उपयोगच नव्हता आणि त्यानें तो केलाही नव्हता. पण गुलाबबाई ज्या वेळीं रीतसर निमंत्रण द्यायला प्रसादकडे गेल्या होत्या, त्या वेळीं बिजूशीं परिचय करून घेऊन त्यांनींच तिला आग्रहपूर्वक विनंती केली होती. मुलींची शाळा. बहुतेक बायकाच जमायच्या; तेव्हां जायला कांहीं हरकत नाहीं, म्हणून समारंभाला येण्याचें गुलाबबाईजवळ तिनें कबूल केलें होतें. त्या प्रमाणें ती आली होती !

म्हाताऱ्या सरशीनें आपल्या चारुताईच्या प्रसादला—तो आतां इतका मोठा

बापया झाला होता तरी सुद्धां पाहिल्या बरोबर ओळखलें. "या बया ! हे तर आमच्या चारुताईचे परसाद ! लै न्हान व्हतं तवा आपुन कडीवरनं ख्येळिवलं व्हतं ह्यास्नी ! मोटं, त्ये कवा बी आन् कुटं बी मोटच व्हत्याती ! आज माझी चारुताई जिती असती आन् तिनं ह्ये आपल्या पोराचं कौतिक बघीतलं असतं, म्हंजी त्या माउलीच्या सुखाला सारी पिरतीमी बी पुरली नसती ! माझ्या या बळी राजाला एकांद्याची वंगाळ नजर पर लागायची !" सरशी आपल्याशींच पुटपुटली ! डोळे भरून ती प्रसादला पहात होती किती वेळपर्यंत !

चारुशीलेच्या आठवणीनें सरशीच्या एका डोळ्यांतून दुःखाश्रू, आणि प्रसादचें होत असलेलें स्वागत पाहून दुसऱ्या डोळ्यांतून आनंदाश्रू एकदमच घरंगळले ! प्रसादला दृष्ट लागूं नये म्हणून तिनें आपल्या दोन्हीं कानशिलावर बोटें मोडून, दुरूनच 'अलाबला' केलें ! जवळ जाऊन ओळख द्यावी, आपण प्रसादचें कौतुक करावें असें वाटलें तिला. पण तशी वेळ ही नव्हती. फुरसदही नव्हती. शिवाय तिला हिय्याही करतां आला नसतां ! गरीब माणसांचें प्रेम असें व्यक्त होत असतें !

त्या समारंभाला निशिगंध उपस्थित होते. त्यांना निमंत्रण तर होतेंच. आणि त्यांच्या विठाबाईकडे, आजच्या समारंभाप्रीत्यर्थ असलेल्या अल्पोपहाराची व्यवस्था पण होती ! विठाबाईकडे निशिगंध जाऊन राहिल्या पासून, तिच्या व्यवसायांत आपल्या प्रेरणेनें आणि सक्रीय प्रोत्साहनानें क्रांति करून टाकली होती. विठाबाईची खानावळ योग्य व्यवस्थेच्या अभावी डबघाईलाच आली होती. पण निशीगंधांनीं यक्षिणीची कांडी फिरविली आणि जादू व्हावी तसें झालें. खाणावळींत कॉलेजविद्यार्थ्यांची चिकारगर्दी होऊं लागली. उपहारगृहाच्या अनेक शाखा निर्माण केल्या. त्याकडे— आजपर्यंत इराण्याकडे लोटणारी गर्दी नव्या उपहारगृहांकडे खेंचू लागली. स्वच्छता, टापटीप, ताजे खाद्यपदार्थ, रेडिओ, वर्तमानपत्रांची जोड, आणि ऑर्डर ताबडतोब अमलांत आणून गिऱ्हाईकांना खूष करणारीं स्वच्छ पोषाखांतलीं हंसतमुखाची नोकर मंडळी मिळाल्यावर, गिऱ्हाईकांना आणखी काय पाहिजे ? शहरांतल्या कोणत्याही सार्वजनिक संस्थेचा लहानमोठा समारंभ असो, त्याची अल्पोपाहाराची ऑर्डर विठाबाईकडे यायचीच; अशी करामत निशिगंधांनीं आप-

त्या म्हातारपणीं केलीं होती ! निशिगंध आपल्या पंडितपुत्राचें कौतुक अपत्य-वात्सल्यानें अवलोकन करण्यांत गुंग झाले होते ! व्यासपीठावरील अध्यक्षीय खुर्चीवर विराजीत असलेला प्रसाद म्हणजे आपल्या प्रियकर पंडितांचा छोटासा नमुना ! स्वरूप तसेंच. ऐट तीच. रुबाब– तसाच ! पण – पंडीतांचें तेज नाहीं. त्यांचें ओज नाहीं ! समोरचा हा प्रसंग आणि पंडितांच्या संगतींत पाहिलेले अनेक उत्साहदायक प्रसंग ! निशिगंधांचें मन दोहोंची तुलना स्वतः-शींच करीत होतें. त्या प्रसंगांच्या– पंडितांचा दुर्दम उत्साहाच्या– तेजस्वी भाष-णांच्या स्मरणानें निशिगंधांना एका बाजूला भडभडून येत होतें; तर दुसऱ्या बाजूला चालू प्रसंग–प्रसादचें चालू कौतुक– त्यांच्या जळत्या हृदयावर बारीकशी गार गार फुंकर घालीत होता !

बापा सारखा मुलगा नाहीं, आजा सारखा नातू नाहीं ( कारण कुमारला ते वरचेवर पहात असत. ) असें आपल्याकडे कां व्हावें ? कुलपरंपरा– कर्त्या पुरुषांची तेजस्वी परंपरा उत्तरोत्तर वाढती– गाजती न होतां, उतरणीला कां लागते ? त्यांचा दोष कोणाकडे ? अशाच वेडया विचारांत निशिगंध गढले होते ! कसलीं तरी शल्यें हृदयाला बोचताहेत, खुपताहेत, हें त्यांना कळत होतें. पण असें कां ? या प्रश्नाला त्यांना उत्तर सांपडत नव्हतें !

टाळ्यांच्या गजरांत प्रसाद बोलावयाला उभा राहिला. कॉलेजच्या जगांत त्यानें वक्तृत्व गाजविलें होतें. पण आतां तो तें साफ विसरला होता. सुलभेकडून वक्तृत्वाचे धडे घेण्याचा प्रयत्न केला होता; त्याचेंहि त्याला आतां विस्मरण झालें होतें ! पंडितांनीं गाजविलेल्या कांहीं जंगी सभा त्याला आठवत होत्या. आपले पंडित केवढे मोठे होते, त्यांचा प्रभाव केवढा होता, त्यांची स्फूर्ति, त्यांचा आवेश, त्यांचे सामर्थ्य, त्यांचा प्रभाव, यापैकीं आपल्याकडे काय आहे ? त्यांनीं बुद्धिसामर्थ्यावर आणि हृदयाच्या जीवंत तळमळीवर, सारें जग पादाक्रांत केलें होतें !— आणि आपण ?— आपण पैशांच्या जोरावर आजचा सन्मान विकत घेत आहोंत. या असल्या विकत सन्मानाला मोल काय ? तेज कुठलें ? प्रसाद बोलला. चांगलें भाषण झालें त्याचें. पण आत्मविश्वासाभावी त्याची तारंबळच उडाली ! आपण किती लहान आहोंत, आपलें मोठेपण कसें उसनें आहे, आपलें सामर्थ्य कसें

तोकडें आहे, याची मनोमय जाणीव त्या वेळींही प्रसादला चांगली झाली ! तरीपण निभावलें !

पण त्या सर्व समारंभ प्रसंगांत जर कोणाला जीवंत यमयातना भोगाव्या लागल्या असतील, तर त्या शोभनेच्या एकुलत्या एक जीवाला ! ज्यानें आपल्या सुंदर आयुष्याचा सत्यानाश केला–ज्यामुळें आपलें जन्माचें हाल–वनवास झाले–ज्यामुळें अज्ञातवासांत–एकाकी–सौभाग्य असून विधवेचें जिणें–कंठावें लागलें, जो आपला कट्टा शत्रू, हाडवैरी, त्या प्रसादची तोंडभर स्तुति करायची, त्याचा मोठेपणा वर्णन करायचा ! हें शोभनेच्या नशिबीं आज आलें होतें ! अचानक हा प्रसंग तिच्यावर होता ! पोटांत दुःखाचें, मागल्या तापदायक आठवणींचे कढावर कढ येत होते–आणि शोभना तोंडानें प्रसादची स्तुति करीत होती, त्याचा परिचय करून देतांना ! गुलाबबाईंनीं त्यांच्या माहितीचें टांचण तिला दिलें होतें ! खरेंच प्रसादच्या माहितीच्या टांचणाची शोभनेला जरूर का होती ! एकापेक्षां एक अवघड अशा कठिण प्रसंगांच्या पायऱ्या शोभनेला चढाव्या कां लागत होत्या ? शब्दागणिक ती अडखळत होती. वाक्यागणिक ती कोरडया पडणाऱ्या ओठावरून आंत ओढली जाणारी जीभ बळेंच बाहेर आणून फिरवीत होती. प्रतिक्षणीं तिच्या डोळ्यांपुढें अंधेरी येऊन आपण कोणत्या वेळीं जागच्या जागीं कोसळून पडूं असें शोभनेला समारंभ चालू असतां एकसारखें वाटत होतें !

आतां अध्यक्षांच्या गळयांत पुष्पाहार घालण्याचा प्रसंग ! फारच बिकट ! शाळेच्या वाढदिवस समारंभाच्या अध्यक्ष–पाहुण्यांना शाळा हार घालून गौरवीत आहे–तेथें प्रसाद व्यक्ति नव्हे ! शहाणी–शोभनाही व्यक्ति नव्हे ! निराळ्या भूमिका ! एकाद्या विख्यात नटीला जो अभिनय वठविणें दुर्घट–त्याहीपेक्षां अवघड अभिनय शोभनेला तेथें करावा लागला ! केला तिनें ! कसा केला असेल तिचें तीच जाणें ! त्यावेळीं आकाशांतून आपल्या मस्तकावर अशनिपात होत आहे कीं काय असेंच तिला झालें ! प्रेक्षकांनीं टाळ्यांचा कडकडाट केला ! शोभनेचे कान बधीर झाले होते. तिनें तो कडकडाट ऐकलाच नाहीं !

आणखी तिचें दुसरें दुर्दैव ! शोभनेनें प्रसादच्या गळयांत हार घातला आणि त्याच्या पाठीशीं बसलेल्या बिजूच्या मनाचा कल्पांत झाला ! एक

यःकश्चित मास्तरीण आणि ती आपल्या नवऱ्याच्या गळ्यांत साऱ्या लोकां-देखत हार घालते म्हणजे काय ? तिला लाज नाहीं. नवऱ्याला लज्जा नाहीं! तिचें मस्तक भडकलें ! त्याक्षणीं तेथून उठून चालते व्हावें—घर गांठावें, असें बिजूला झालें ! तसल्या बेशरम पांणचटपणाबद्दल सडकून टीका करावी—म्हणून बोलण्यासाठीं तोंड उघडून तिनें आजूबाजूस पाहिलें. पण साऱ्यांचेंच लक्ष समोरच्या त्या आनंदप्रसंगांत ! बिजूकडे पहाणार कोण ! तिचा नाइलाज झाला ! ती जागच्याजागींच धुमसत बसली ! बिजूला तें शल्य असह्य झालें !

आणि शोभनेला असंख्य विषारी शल्यांनीं हैराण केलें होतें—तिच्या प्राणावरच तीं उठलीं होतीं ! त्या वेदनांची वाच्यता तिनें कोणाजवळ करावी ? —आणखी एक सर्वांत मोठी आश्चर्याची गोष्ट !—

प्रसादनें आपल्या शहाणीला मुळींच ओळखलें नाहीं ! नांव निराळें !—तिच्यांत बदलही तसाच झालेला ! शिवाय आपली शहाणी असे दिवस काढीत असेल—इथें असेल, अशी सुतराम त्याला कल्पनाही नाहीं ! शोभनेनें त्याला पाहतां क्षणीं ओळखलें ! —बायकांच्या जन्माला ती आली होती ! करून सवरून नामानिराळें व्हावयाचें ! जिच्यांवर प्रेम करावयाचें तिला कालांतरानें अजीबात विसरावयाचें—हा धडा दुष्यंतराजानें, पुढील साऱ्या पिढींतील पुरुषांना घालून दिलेला ! तो धडा प्रसादनें चांगलाच घटविला होता ! सर्व समारंभ यथासांग पार पडला ! प्रसादचें समारोपाचें भाषण झालें ! गुलाबबाईची व तिच्या कर्तबगारीची त्यानें मुक्तकंठानें स्तुति केली ! मुलींना वाखाणलें ! बक्षिसें वाटली ! विद्यालयाला देणार असलेल्या देणगीचा उच्चार करून टाळ्या मिळविल्या ! पण विस्मरणामुळें म्हणा कीं कसेंही समजा ! प्रसादनें शोभनेच्या नांवाचा उल्लेख केला नाहीं. तिच्या कार्याचा गौरव—शाब्दिक कां होईना—प्रसादकडून त्यावेळीं झाला नाहीं !

जगाला मंदिराचा कळस दिसतो. पायाचे दगड कोठें दिसतात ? कळसाला हात जोडावयाचें ! पायाच्या दगडाला कोण पहाणार ? विद्यालयाच्या उत्सव-मूर्ती गुलाबबाई ! त्यांचा गौरव होणें साहजिक ! शोभना शाळेच्या कचेरींत गुप्त ! ती कार्यमंदिराच्या पायांतली दगड ! ती दिसणार कोणाला ? आणि तिचा गौरव व्हावा कसा ?

प्रसादनें आपल्याला ओळखलें नाहीं हें शल्य क्षणमात्र शोभनेला खुपलें असेल किंवा नसेल-पण ओळखलें नाहीं, हें एक परी आपल्या पथ्यावरच पडलें, असेंच तिला थोडा वेळ वाटलें ! पण ओळखलें असतें तर ? शोभनेच्या मनांतलें मन-अगदीं आतल्या आंतलें-तिला सांगत होतें, सांगून दुःखाच्या डागण्या देत होतें-प्रसादनें आपल्याला ओळखायला हवें होतें, आपली विचारपूस करायला हवी होती—

समारंभ संपला ! शोभना घरीं आली ! आपण कित्येक महिन्यांचा अतिशय आजारी आहोंत असेंच तिला वाटलें !-कशीबशी घरीं आली नी तिनें अंथरुणावर आंग टाकलें ! अत्यंत आनंदाच्या प्रसंगांत, अत्यंत दुःखाचे सकारण चटके एकाद्या जिवाला बसतात पण त्याची कोणालाच दाद नसते - ती अशी !



# प्रकरण पंधरावें

आपल्या बंगल्यासमोर किशोरी कुमाराच्या मोटारसायकलवरून उतरली ! कुमार तिचा निरोप घेत होता. पण ती त्याला जाऊं देत नव्हती. बंगल्यांत यायचा तिनें त्याला प्रेमाचा आग्रह चालविला होता ! दोघांच्याही आनंदाची दुनिया त्यावेळीं नुसती आनंदानें फुलून गेली होती ! " नको, कशाला, उशीर झाला आहे. पुन्हां परत येईन लवकर ! पुष्कळ वेळ आपण हिंडलों आहोंत. बोललों आहोंत. आणखी आतांच कशाला पुन्हां यावेळींच आंत यायला हवं ? " असें कुमार तोंडानें किशोरीला नकार देत होता. पण त्याचा पाय मोटार स्टार्ट करायला कां कूं करीत होता ! विसरलाच होता स्वतःला बहुतेक तो !

" मी नाहीं येत आतां ! " कुमाराची मान नकारात्मक हालत होती !

किशोरी मानेनें हातानें आणि डोळ्यांनीं, कुमाराला ' ये रे ! हें काय ? आपण आईला भेटूं नी दोघेही आपला गोड बेत आतांच कळवूं माझ्या आईला ! " असें सांगण्याचा आपला आग्रह सोडीत नव्हती !

" मी तुझ्याशीं लग्न करणार ! "

" मी तुझ्या गळ्यात विवाहमाला घालणार ! "

" लग्नानेंच आपण चिरंतन सुखी होऊं ! "

किशोरीनें लग्नाचें वचन देऊन टाकलें होतें !

कुमारानेंहि लग्नाला पूर्ण संमती दिली होती ! दोघांनींही एकाच सुरांत लग्नानंतरच्या स्थितीचें गोड गायन गायिलें होतें !

" तूंच आपल्या आईला सांगून टाक ! " कुमारानें किशोरीला परवानगी दिली होती !

" तूं पण आपल्या बरोबर आईला कळवायला चल ! " किशोरीनें हा आग्रह धरला होता !

होय ! किशोरी आणि कुमार यांनीं परस्परांस लग्नाकरितां नुकतेंच वचनानें नुकतेंच बांधून घेतलें होतें ! आणि त्याच नितांत आनंदसागरांत दोघेही यावेळीं डुंबत होती ! कुमारानें कबूल केलें ! प्रेमाचा शब्द कोण मोडील ? मोटार सायकलवरून कुमार उतरला ! चल म्हणाला ! किशोरी धांवत सुटली ! तोंडानें गुणगुणत, आपल्याभोंवतीं गिरक्याफिरक्या घेत–किशोरी निघाली ! भरभर पुढें जावें–कुमार मागून येतो आहे कीं नाहीं तें वळून मध्येंच पहावें–तो आपल्या मागें पळतो आहे, हें पाहून आपण विजेच्या वेगानें पुढें जावें, कुमाराच्या हातीं स्वतःला गवसूं देऊं नये, कुमार खांबासारखा, फुरंगटून उभा राहिला कीं, तसेंच परत येऊन त्याचें दोन्ही हात आपल्या हातांत धरून त्याला ओढूं लागावें, त्यानें हंसावें. तिनें खिदळावें. असें चाललें होतें त्यांचें ! अनंत आकाशांत उंच उंच पांखरासारख्या प्रेमाच्या वाऱ्यावर भरमसाट भराऱ्या मारीत होते ते दोन जीव !

आणि त्यांच्या अगोदरच कांहीं वेळ 'शोभना' या नांवाला फेंकून देऊन, अध्यापिकेचा मुखवटा कन्याविद्यालयाच्या आवारांत भिरकावून देऊन, दुखऱ्या हृदयावर दोन्ही हात गच्च धरून प्रसादची पूर्वींची आवडती 'शहाणी' आपल्या अंथरुणावर तळमळत पडली होती. आतांचा काळ विसरण्याची आणि प्रसादच्या बरोबर प्रीतीचे खेळ खेळत असल्या वेळच्या काळांत शिरण्याची शहाणीची धडपड चालू होती !

तरुण प्रसाद–तरुणी शहाणी, यांचीं स्मृतिचित्रें डोळ्यांपुढें आणून मनाला जरा तरी विरंगुळा मिळतो काय, हें ती पहात होती ! त्या वेळच्या शहाणीकडे प्रेमदृष्टीनें पहाणारा– हंसतमुखाचा प्रसाद या वेळच्या शोभनेच्या दृष्टीपुढें येऊं लागला होता. अशाच वेळीं कुमार आणि किशोरी आनंदानें हंसत, धांवत, तिच्या पर्यंत येऊन भिडलीं ! पायांचा दणदणाट आणि खिदळण्याचा खणखणाट कानावर पडला–शोभनेनें डोळे उघडून पाहिलें. तों तिच्यापुढें कुमार आणि किशोरी !

शोभना अजून तंद्रेत होती. कल्पनेनें आपल्या रम्यशा भूतकाळांतील आपल्या प्रेमाच्या जगांत शोभना वावरत होती ! तिला भास झाला, आपल्या पुढं आपणच–प्रसाद आणि शहाणीच आहोंत !

शोभना डोळे ताणून–पापण्या ताठ ठेऊन कुमार किशोरीकडे पहात राहिली ! किती भेसूर–उदास आपली आई दिसली किशोरीला ! जिन्यापासूनच शोभना दृष्टीला पडेपर्यंत, किशोरी आणि तिच्या पाठोपाठ कुमार, घरभर आपल्या आईला, " आई; आई ग ! – ए आई ! कुठं आहेस तूं ? " किशोरी एकसारख्या हांका मारीत इकडे तिकडे. हिंडत होती ! त्या तिच्या किती आनंदाच्या आणि प्रेमाच्या लाडक्या लाडक्या किशोरीच्या मुखांतून बाहेर पडल्या होत्या ! पण आतां !–आपली आई अशा विलक्षण नजरेनें पहात आहे, तिचें तोंड भकास झालें आहे, ती अंथरुणावर आणि तीही अस्ताव्यस्त पडली आहे, असें आईचें दृश्य किशोरीला दिसलें तेव्हां, ती किती घाबरली एकदम ! धांवत तिच्या जाऊन वक्षःस्थलावर डोकें टेकीत आणि आईच्या सर्वांगावरून हात फिरवीत घाबऱ्या घाबऱ्या घोबऱ्या आवाजांत, "आई ! आई ग ! काय झालंय तुला ? आजारी आहेस का ? काय होतय तुला ? " म्हणत असतां तिच्या डोळ्यांत टच्कन् पाणी आलें ! कुमार तटस्थ होऊन समोरचें करुणदृश्य पहात राहिला !

क्षणापूर्वीच्या अत्यानंदाच्या सृष्टीला किशोरी एका क्षणांत पारखी झाली ! आणि भूतकालांतल्या क्षणकालच्या गोड स्वप्नाला शोभनाही क्षणमात्रांत अंतरली ! तिनें पुन्हां डोळे मिटले ! ती कण्हूं लागली ! " माझें तें जग कुठं आहे ? कुशीला वळण्याचा दुबळा चाळा करीत शोभना बडबडली ! किशोरीला आईच्या बडबडीचा अर्थच कळला नाहीं ! मायलेकींचा तशा मनः-स्थितींत किती तरी वेळ निःशब्द अवस्थेंत पण मूक हालचालींत तसाच गेला !

पाणी भरल्या डोळ्यांनीं किशोरीनें कुमाराकडे पाहिलें ! आपला हळूवार हात ती आईच्या आंगावरून फिरवीत होती !

" घाबरूं नकोस किशोरी ! " कुमार हलकेंच जरा पुढें होऊन जवळच्या खुर्चीवर बसत असतां किशोरीला धीर देण्यासाठीं म्हणाला, " कन्याविद्यालयाच्या वाढदिवस समारंभाच्या दगदगीनें भयंकर चेपून– शीण झाला आहे

यांना असं दिसतंय ! लवकर बरं वाटेल ! ” आशेनें किशोरीनें पुन्हां कुमाराकडे पाहिलें. प्रियकर माणसाचे प्रेमळ शब्द केवढा धीर देतात, नाहीं ?

शोभना हळूं हळूं भानावर येत होती. कुमारानें धीर देण्यासाठीं किशोरीला जे शब्द सांगितले ते तिनें ऐकले. समजले ते तिला ! आपली मनःस्थिति लपवून किशोरीची समजूत काढायला, शोभनेला तें दिव्यौषधच सांपडलें. शोभनेनें डोळे उघडले. पुन्हां किशोरीकडे पाहिलें. तीहि तिच्या आंगावरून नी केंसावरून प्रेमळ हात फिरवीत, जरा वेळानें म्हणाली, “ घाबरायला काय झालं बाळ ? शाळेच्या कामानं मी दमलेंय ग ! अन् त्यामुळें आंग मोडून आलं आहे माझं ! दुसरं कांहीं नाहीं ! घाबरूं नकोस ! मला आतां चांगली हुशारी वाटायला लागली आहे ! रडूं नकोस बाई अशी ! तूं रडलेली मला नाहीं खपत नी सोसत पण ! अगोदर हांस पाहूं. तूं हंसलीस म्हणजे मला आणखी लवकर बरें वाटेल ! खरंच ! ”

शोभना बळेंच हंसली ! किशोरीला बरें वाटलें. तीहि हंसूं लागली !

“ आई, किती काम करीत असतेस ग तूं ! तरी मी नेहमीं तुला बजावतें कीं इतकं काम करीत जाऊं नकोस म्हणून ! पण तूं ऐकत नाहींस ! ” किशोरी किंचित् खोटा राग दाखवीत म्हणाली !

“ मायेनें तूं मला विचारायला आहेस म्हणून तर मी काम करतें—” शोभना हंसून उत्तरली. कुमाराकडे यावेळीं तिनें पाहिलें. त्याच्याकडे पाहून तिला काय झालें हेंच कळेना ! इतके लक्षपूर्वक तिनें त्याच्याकडे आजपर्यंत कधींच पाहिलें नव्हतें ! त्याच्याकडे नी किशोरीकडे एकसारखी आळीपाळीनें पुष्कळ वेळपर्यंत यावेळीं पाहातच राहिली शोभना !

“ आई तुला बरं वाटतंय आतां ? ”

“ हो ! ”

“ मग तुला एक गंमत सांगूं ? ऐकल्यावर तुला आणखी बरं वाटेल ! चट्दिशीं उठून बसशील तूं !—”

“ होय ? मग सांग कीं !—काय अशी गंमत आहे तुझी ती ? शोभनेनें किशोरीची गंमत ऐकायला आपली उत्सुकता दर्शविली.

कुमाराकडे तिरपा कटाक्ष फेंकीत, किशोरीनें हलकेंच आपल्या आईच्या कानांजवळ तोंड नेलें.

"कुमारानें नी मी एकमेकांना लग्नाचें वचन दिलें आहे." शोभनेला आनंदाचें वर्तमान असें तिला सांगायचें होतें.

पण तिनें नुसतेंच " आमचं लग्न ! " इतकेच कसेबसे शब्द उच्चारले. आणि, " हुंक्! हुंक् " अशा लज्जेच्या उद्गारांबरोबर चटकन् तिनें आईकडून दूर होऊन आपली मान वेळली !

" असं होय ? " या भावाच्या दृष्टीनें शोभनेनें किशोरीकडे पाहिलें. तिच्या केसावरून हात फिरविला. ती हंसलीशी दिसली तिच्या हालचाल करणाऱ्या ओंठावरून किशोरीला ! पण खरें काय होतें कोणास ठाऊक ! शोभनेला उठावेसें वाटत होतें. हळू हळू उठत होती ती ! शोभनेची गूढ दृष्टी वरचेवर कुमाराकडे फिरकत होती ! कसलें तरी गूढ पडलें होतें तिला !

आपल्याकडे शोभना पहात आहे, हें कुमारानें पाहिलें. त्याचा चेहरा किंचित् हंसरा झाला. मान नम्र झाली ! आपल्या भावी सासूबाईंना बोलून आनंदित करावें, अशी कल्पना त्याला आली. आणि तो म्हणाला, " कन्या-विद्यालयाच्या वाढदिवस समारंभाचे अध्यक्ष माझे वडील होते ना ? त्यांनीं म्हणे विद्यालयाला लायब्ररीरूम बांधून द्यायचें आश्वासन दिलें आहे ! मला कळलं होतं तें ! माझे वडील तसे मनाचे थोर आणि उदार आहेत ! परवा समारंभांत आपण त्यांना पाहिलंत ना ? किशोरीला माहित आहेत ते !" इतकें म्हणून पुढें आपल्या बोलण्याची आपली सांथ किशोरीनें करावी म्हणून कुमारीनें तिच्याकडे पाहिलें !

कुमार ! किशोरी ज्याच्याशीं लग्न करायला सजली आहे, तिनें जी गोड गंमत म्हणून सांगितली—तो कुमार प्रसादचा मुलगा ? प्रसादचा कुमार ?

शोभनेचें गूढ उलगडलें ! एकदम सहज उलगडलें ! तिचें मस्तक सुन्न झालें ! डोळे आपोआप पुन्हां मिटले ! बसण्याकरितां अर्धवट उठली होती ती पुन्हां तशीच एकदम अंथरुणावर कोलमडली ! "अयाई ग !" इतकेंच उद्गारली ती ! कुमाराचें कूळ कळून, त्या माहितीनें हृदयावर वज्राघात व्हावा, एवढेंच काय तें एक शोभनेच्या आयुष्यांत बाकी शिल्लक राहिलें होतें ! तेंही यावेळीं झालें एकदांचें ! अशक्तपणाच्या अतिरेकानें शोभनेला बसविलें नाहीं. तेंच असह्य होऊन तिनें 'अयाई ग !' म्हटलें, असें किशोरीला वाटलें ! आनंदाची ही हकीकत सहन करण्याची शक्ति उरली नाहीं, असें कुमार

समजला ! दोघेही जरा घाबरले ! पण पहिल्याइतके नाहीं ! दोघांनींही शोभनेची शुश्रुषा चालविली !

शोभनेच्या हृदयांतल्या शल्यांची त्यांना किंचित् तरी काय कल्पना असणार ?



आरशापुढें उभी राहून किशोरी स्वतःला न्याहाळीत होती. केशभूषा कशी झाली आहे ? पातळाच्या आणि ब्लॉऊजच्या रंगाची संगती मनासारखी जमली आहे कीं नाहीं ? तोंडाला लावलेली पावडर उगीच राख फासल्या-सारखी दिसते कीं जितकी लागायला हवी तितकी बरोबर लागली आहे, खांद्यावरून घेतलेला पातळाचा पदर उन्नत उरोभाग जितका आणि जसा दृश्यमान व्हायला हवा, त्या बेतानें बसला आहे कीं नाहीं ? नेसणची गोल रचना प्रमाणबद्ध, चरणाचे मागले पुढले भाग कळत नकळत उघडे झाकले दिसायला उपयुक्त अशीच झाली आहे कीं नाहीं ? हें सारें न्याहाळण्यासाठीं, ती वेळ दवडीत होती. लाजरें प्रेम आणि लपंडाव खेळणारा आनंद, किशोरीच्या फुगीर गालांवर नृत्य करीत होता ! ती स्वतःशींच कसलेंं प्रेमगीत अर्धस्फुट आवाजात गुणगणत होती !

किती तरी वेळ हे तिचे चाळे चालले होते. पण तिच्या मनासारखें जमेना आणि तिचें समाधान कांहीं होईना. शेवटीं कंटाळली. किशोरी बाहेर जायला निघाली. तों तिच्या पाटीशी शोभना उभी !

" कुठें चाललीस किशोरी यावेळीं ? "

" कुमाराकडे ! "

" कशाला ? काय काम आहे त्याच्याकडे ? "

" आमचं ठरलंय— "

" काय ठरलंय तुमचं ? "

" फिरायला जाणार आहोंत आम्हीं ! "

" कांहीं नको कुठं कोणाबरोबर जायला तुला ! "

" म्हणजे काय आई ? "

किशोरीनें जरा गोंधळून जाऊन शोभनेला असें उलट विचारलें खरें; पण

आज आई आपल्याला अडथळा कां करते, हें तिला समजेना. शोभना किशोरीच्या डोळ्याला डोळा देत नव्हती. तिच्या आवाजांतही एक प्रकारचा तुटक कडवटपणा होता. तो किशोरीला एकदम जाणवला ! तिला एकाएकीं कसेसेंच झालें !

किशोरीच्या उतावळ्या उत्सुकतेला बारीकसा धक्का बसला ! जागींच ती थबकून उभी राहिली ! " आईनें आपल्याला कधींच नाहीं तें एकाएकी आज असें कां अडवावें ? " या त्रासदायक विचारानें किशोरीच्या हृदयांत ठोके मारायला आरंभ केला !

कुमार हा प्रसादचा--आपल्या शत्रूचा मुलगा आहे, हें कळल्यापासून शोभनेच्या मनाला जबरदस्त धक्का बसला होता ! कुमार चांगला आहे. देखणा आहे. मनमिळाऊ आहे. लाघवी आहे. आपल्या किशोरीवर त्याचें प्रेम आहे. तोही तिचा आवडता आहे. जोडी कशी छान साजून दिसते. हें सारें शोभनेला मान्य होतें. त्यांच्या प्रेमलीलाकडे आजपर्यंत प्रेमळ दृष्टीनें आणि आनंदानें पहातही आली होती ती. तिला समाधानही वाटत असे. कुमारासारखा जांवई तिला व्हावा असेंहि मनापासून वाटत होतें ! पण तिच्या कल्पनेतलें सारे सुंदर मनोरे एका माहितीच्या टिचकीसरशी क्षणांत जमीनदोस्त झाले होते ! त्याचें दुःख तिला झालेंच. पण तिनें तें गिळलें होतें ! कुमारापासून किशोरीला दूर ठेवणें, त्याचा तिचा यापुढें कसलाही संबंध केव्हांही ठेवूं न देणें, हें शोभनेला आतां एक अवश्य कर्तव्यच झालें होतें ! तसें करण्यानें किशोरी खवळेल. तिला अपरिमित दुःख होईल. तिच्या नितांत रमणीय अशा प्रेममंदिराला धरणीकंपाचा धक्का बसून त्याचा चक्काचूर होईल, याची कल्पना शोभनेला नसेल असें कसें होईल ? पण कसाबासारखी कठोर करणी करणें भागच आहे असें वाटत होतें तिला. आपलें आयुष्य प्रसादमुळें वायां गेलें. त्यानेंच आपल्या साऱ्या जन्माचा सत्यानाश केला ! पराकाष्ठेचे कष्ट, जगाकडून उपहास, तिरस्कार, अपमान, अज्ञातवास; हीं — हीं सगळीं सगळीं आपल्या पदरीं पडलीं ! आणि तशांतहून आपण जीवनयात्रा आपल्या किशोरीच्या बाललीलांकडे पाहून, तिचें कोडकौतुक करून, कशी बशी गोड करून घेतली— घेत आलों ! पण आपल्या दुर्दैवाला आपली हीहि स्थिति पहावली नाहीं. आणि आतां आपला

जुलमी तडाखा त्यानें आपल्या किशोरीला द्यायचा घाट घातला ! जगाला, समाजाला, मनोहरला, प्रसादला या सगळ्या सगळ्यांनाच आपण कायमचे विसरण्याचा भगीरथ प्रयत्न केला ! त्यांत यशही मिळवित आणलें; कुठें आहे आपल्याला जग ? जगाशीं आपला काय संबंध उरला आहे ? असें मानून मनाची समजूत घातली. पण पुन्हा दारुण दुर्दैव आपल्या पुढें उभें राहिलेंच कुमाराच्या रूपानें ! शहाजोग समाजांतून उजळमाथ्यानें हिंडण्याची आपल्या दुर्दैवानें आपल्याला कायमची मना केली ! आणि आतां तोच दारुण प्रसंग आपल्या किशोरीवर आणायला तें उतावळें झालें आहे ! माझा बळी घेऊन त्याचें समाधान झालें नाहीं. कुमाराबरोबर किशोरीचें लग्न झालें, तरी तिचा नाश ! त्याची तिची कायमची ताटातुट केली तरी त्यांच्या आयुष्याची— प्रेमाची होळी ! काय बिनतोड पेंचप्रसंग हा ! शोभना अगदीं सुन्न झाली होती ! पण तरी देखील कशाही परिस्थितींत कुमाराचें किशोरीशीं लग्न झालेलें पहायला ती तयार नव्हती ! तें धर्मकृत्य नव्हें ! असें तिचें मन तिला सांगत होतें ! अजूनही, अत्यंत विपरीत परिस्थितींत, आमचा धर्म राखला असेल तर आमच्या महिलांनीं ! आणि तोही अशा बिकट, बिनतोड परिस्थिति स्वतःवर येऊन बेतली तरी !

—मनाला वाईट वाटलें तरी किशोरीनें आईची आज्ञा पाळली ! ती त्यावेळीं कुमाराकडे गेली नाहीं. किशोरीची वाट पाहून शेवटीं कुमार तिच्या घरीं आला. पण तिची भेट करूं न देतां शोभनेनें त्याला कांहींतरी सबब सांगून तसेच बाहेरच्या बाहेर परत लाविलें ! किशोरीनें आपलें ऐकलें, याचे शोभनेला जितकें समाधान झालें, त्यापेक्षां लाखपटीनें दुःख झालें ! आईचेंच तें हृदय !

त्या रात्रीं किशोरी आपल्या अंथरुणावर गाढ झोंपी गेली होती ! शोभना तिच्या उशाशीं अश्रू गाळीत बसली होती ! किशोरी झोंपेंत हंसत होती ! तिचें तोंड वाईटही होत होतें ! स्वप्नांत ती रडत होती, पण प्रत्यक्ष तिच्या डोळ्यांतून पाणी घरंगळलेलें शोभना पहात होती ! तिला भडभडून येत होतें ! "पूर्वजांचीं पापें पुढल्या पिढीला भोगावीं लागतात ! आपलीं पापें किशोरीला छळायला सरसावलीं आहेत !" शोभनेच्या मनांत हे असले विचार सोसाट्याच्या वाऱ्याप्रमाणें वावरत होते !

"कशी प्रशांत झोंप लागली आहे किशोरीला माझ्या ! निर्मळ, निष्पाप,

जीव आहे ! आपल्या कुंवारपणाला अनुचित असें हिच्या हातून निदान या क्षणापर्यंत तरी कांहीं झालेलें नाहीं ! हिचें हें पावित्र्य आपल्याला तसेंच अखंड राखायला नको का ? " किशोरीकडे पाहातांना शोभनेच्या हें मनांत येत होतें ! ती रडली कीं ही रडे ! " कुमार तिच्यापुढें उभा राहिला असेल. आईनें आपल्याकडे जाऊं नको म्हणून सांगितलें, म्हणून आलें नाहीं. रागावूं नकोस." असें त्याला सांगतांना किशोरीला रडूं आवरत नसेल—" हें शोभनेला वाटे ! आणि तें खोटें तरी कसें असेल ?

मध्येंच किशोरी रागावल्यासारखी—दाताखालीं ओंठ दाबून धरीत असल्यासारखी दिसे ! तें पाहून शोभनेच्या पोटांत धस्स होई ! कुमाराशीं आपण तिचें लग्न होऊं देणार नाहीं, हें आपलें मनोगत मनोमन- पोरीला कळलें असेल म्हणून ती आपल्यावर रागावली असेल ! आपल्याला न जुमानतां, किंवा न विचारतांच आपण लग्न उरकून टाकूं ! असें कुमाराला ती निर्धारानें सांगत तर नसेल रागारागानें ? या कल्पनेनें शोभनेचा जीव अगदीं कासावीस होत होता !

नुसत्या साध्या अडथळ्यांनें हैराण झालेली किशोरी स्वप्नांत अनेक प्रकारचे हाल भोगीत होती ! नको असणारे असंख्य देखावे स्वप्नांत तिला दिसत होते !

आणि शोभना तिच्याजवळ बसून जागेपणीं आपल्या हृदयांतली कालवाकालव निमूटपणें होऊं देत होती !

बिचारे दुर्दैवी दोन जीव !

● ● ●
● ● ●

अखेर एकदां किशोरीला जिवावर उदार होऊन शोभनेनें सांगितलें :—

" कुमाराला तुला विसरलं पाहिजे. त्याच्याशीं तुझं लग्न होणार नाहीं ! "

" कां ? कां ? कां पण !—" चिडून, त्रासून, वैतागून, डोळ्यांत पाणी आणून किशोरीनें आपल्या आईला पुन्हां पुन्हां विचारलें !

" असले तरुण पशु असतात ! "

" पण माझा कुमार पशु नाहीं ! "

" तुझ्याशीं लग्न झाल्यावर तो पशु होईल ! "

" आणि मी–माझं काय ?—"

" त्याच्याशीं लग्न केलेंस तर तूं माणूसकीला मुकशील !

" तें काय म्हणून ? असं म्हणायला कुमारानं कोणाचं काय केलं आहे ? मी कुणाचं काय केलें आहे ? "

खरोखरीच कुमारानें नी किशोरीनें कोणाचें काय केलें होतें ? कांहीं केलें नव्हतें !

शोभनेला सत्य उघडें करून सांगतां येणें शक्य नव्हतें ! आणि खरें कळल्याशिवाय किशोरीची समजूत पटणें तितकेंच अशक्य होतें ! आणि खरें कसें सांगावें हीच शोभनेला खरोखरीची पंचाईत पडली होती !

" मोठ्या माणसांचं जरा ऐकावं ग किशोरी ! "

" कां पण ? —"

" मोठ्या माणसांना अनुभव असतो. तो तरुणपणीं तुम्हांला कोणालाच नसतो म्हणून ! "

" मोठ्यांनीं अशा तरुण जिवांच्या मार्गांत आड कां यावं ? कारण नको कां कळायला ? – "

" सारींच कारणें सांगतां येण्यासारखीं नसतात–सांगतां येत नाहींत मोठ्यांना ! "

" मी ऐकणार नाहीं तुझें ! कुमाराशीं मी लग्न करणार ! "

" माझ्या परवानगीशिवाय ? – "

" मग दे परवानगी ! "

" मला किती दुःख होतंय तें तुला कळणार नाहीं किशोरी ! "

" अन् माझा आनंद मरतोय, हें कां पहात नाहींस तूं ! आई, मला तूं कधीं बोलली नाहींस. माझ्यावर रागावली नाहींस. माझे वाटेल ते लाड केलेस ! हवे ते लहानमोठे हट्ट पुरविलेस ! अन् आजच माझ्या या सुखाला तूं अशी मला पारखी कां करतेस ग ?– "

शोभनेच्या डोळ्यांतून अश्रूंचे पूर वाहूं लागले ! शोभनेच्या डोळ्यांतील अपरंपार पाणी पाहून किशोरी हदरली, असहाय्य बनली ! आपल्या तोंडांत हातरुमालाचा बोळा कोंबून तीही रडूं लागली ! शोभनेला किशोरीबद्दल भीति

वाटूं लागली ! आतां ही रडते आहे, पण तिला खरें कळलें नाहीं तर तिचें मन उचल घेईल, कुमाराशीं लग्न केल्याशिवाय ही राहाणार नाहीं.

हताश होऊन शोभना किशोरीसमोर बसली होती. ‘ आपलें जग कुठं आहे, कुठं जाणार आहे ? ” याचा शोध ती घत असेल का ? किशोरी करुण दृष्टीनें आपल्या आईकडे पहात होती ! “ माझं जग कुठं आहे ? मला कोणतें जग पहायला मिळणार आहे ? ” हाच मूक प्रश्न किशोरी आपल्या आईला करीत होती का ?



शोभनेच्या समोर जरा अंतरावर जवळ जवळ खुर्च्या मांडून त्यावर कुमार आणि किशोरी ही जोडी बसली होती !

आईच्या अडथळयाची यत्किंचितही कल्पना किशोरीनें कुमाराला येऊं दिली नव्हती ! किशोरीची भेट घ्यायला तो आला होता. पडलीही त्यांची गांठ ! दोघांनीं मिळून आपला हट्ट सोडला नाहीं, तर आपल्या आईला आपल्या लग्नाला मान्यता द्यावी लागेल अशी किशोरीला अजून आशा होती. ती लाडकें लाडकें बोलत होती; गोड गोड हंसत होती. कुमारही हसून तिला सांथ करीत होता ! आपल्या वागण्यानें शोभनेला खूष करून मजेमजेंत आपला हेतु सिद्धीस न्यायचा हा किशोरीचा बेत दिसत होता !

“ आई, मी लहान असतांना आपल्या कुशींत घेऊन मला झोंप येई-पर्यंत, तूं मला किती गोड गोड—चांगल्या गोष्टी सांगत होतीस नाहीं ग ?—कुमार, आई खरंच किती चांगल्या गोष्टी सांगते म्हणतोस ! तूं ऐकल्या नाहींस कधीं ! आई, सांग ना ग एकादी गोष्ट आज आम्हांला !—”

“ खरंच ! अलीकडच्या कोणाच्याही आणि कसल्याहि कथा, कादंबऱ्या कितीही वाचल्या, तरी त्यांत इतकंस मन रमत नाहीं ! सगळ्यांचा सांचा एक. गोष्ट ठराविक. पात्रें तींच तींच ! आणि प्रसंगही सारखे सारखेंच !—त्या वाचण्यापेक्षां न ऐकलेल्या गोष्टी ऐकायला मिळाल्या तर काय मजा वाटते ! नाहीं का ? ’ असें म्हणून कुमारानें किशोरीला दुजोरा दिला.

किशोरीनें पुन्हां “ आई, सांग ना ग ! ” असा लाडका हट्ट धरला ! शोभनेनें आपलें मन घट्ट केलें होतें. मनाचा पक्का निश्चय ठरविला होता.

बाह्यतः ती शांत—आनंदी दिसत होती ! पण तिच्या अंतःकरणांत असंख्य दुःखांनीं धगधगीत अग्नी पेटविला होता ! कुमाराच्या आणि किशोरीच्या डोळ्यांवरील भ्रमाचें पटल केव्हांना केव्हां तरी एकदां शोभनेला दूर करावयाचेंच होतें ! लेकरांची दिशाभूल होऊं नये. त्यांनीं भलत्या मार्गाला लागूं नये, याकरितां " जग कुठें आहे ! " हें त्यांना तिला समजून द्यावयाचेंच होतें ! मुलांना गोष्ट सांगतें, म्हणून ती म्हणाली, नीट बसली. दोघांकडे एकदां क्षणमात्रच पण शोभनेनें भेदक दृष्टी लावली आणि मग ती कसलीशीं गोष्ट सांगायला लागली.

"तुम्हांला गोष्ट ऐकायची आहे ? सांगतें बापडी ! पण आतां तुम्ही लहान नाहीं. लहानपणीं, भुतांखेतांच्या, अक्काळविक्काळ स्वर्गांतल्या देवादिकांच्या, राक्षसांच्या, काऊचिऊच्या गोष्टींनीं करमणूक होतें. मोठेपणीं तसं कसं असेल? आतां सांगेन ती एकादी जगांतली खरीखुरी, पाहिलेली, एकलेली नाहीं तर अनुभवलेली ! अन् ती पण मनाला आनंद देईल, अशी तरी असेल कीं नाहीं कोण जाणें ! अशी गोष्ट ऐकायची असेल तर ऐका ! " एवढें म्हणून शोभना थांबली. पण त्या दोघांनीं ऐकण्याची आतुरता दाखविली. " बर तर ! नाहीं तरी जगांतल्या अनेक कटु पण सत्यकथा ऐकून घेण्याची तयारीची संवय सगळ्यांना आजकाल हवीच. कुणास ठाऊक कोणाला, केव्हां, तशा सत्यकथा स्वतःच्याच आयुष्यांत घडतांना सहन करण्याचा प्रसंग अनुभवावा लागेल तें " शोभना याही वेळीं थोडी थांबली ! आईची ही प्रस्तावना जरा गंभीर आणि भयसूचकच वाटली किशोरीला नी कुमाराला !

शोभना गोष्ट सांगूं लागली—

" माझ्या परिचयांतली एक मुलगी, तिची गोष्ट आहे. रूपानं बरी होती. बुद्धीही तशी चांगली होती. आपल्या आईबापांच्या जिवावर तिचे दिवस आनंदांत जात होते. जगाची कांहीं कल्पना नाहीं. कॉलेजला जावं, अभ्यास करावा, मित्रमैत्रिणींच्या घोळक्यांत हिंडाफिरावं ! जग हा एक सुंदर—सुवासिक फुलांचा बाग आहे ! त्या बागेंत सारा आनंद आहे ! अन् तो आनंद आपल्याकरितांच आहे. हीच त्या पोरीची अजाण कल्पना ! सगळ्यांनाच आपल्या तारुण्याच्या भरांत असंच नसतं कां वाटत ? ती जितकी

शहाणी तितकीच भोळी होती ! ती शिकत असतां कॉलेजचं एकदां गॅदरिंग झालें. गॅदरिंगकारितां एक नाटक केलं गेलं. त्या मुलीला नाटकांत काम करण्याची भारी हौस ! गॅदरींगच्या नाटकांत काम केलंन् तिनं ! अन् लोकांना पण तिचं नाटकांतलं तें काम भारी भारी आवडलं! नायिकचं काम होतं तिच्याकडे ! अन् नायक जोडीदार ! त्याचं पण काम फारच छान झालं ! अजून मला तें चांगलं आठवतंय ! " नाटकांतल्या नायक–नायिकांची ती जोडी, आपल्या चांगल्या कामानं हुरळली ! एकमेकांकडे आकर्षितही झाली! साऱ्या कॉलेजांत, त्यांच्याबद्दल, "ही जोडी संसारांतही छान शोभेल!" असे उद्गार निघूं लागले ! दोघांना त्या उद्गारांनीं आनंद नी अभिमान वाटायला लागला. मनानं त्यांनीं एकमेकांना वरलं ! लग्नाचीं वचनें त्यांनीं दिली घेतलीं ! पण खरं प्रेम म्हणजे काय असत, हें कुठं माहीत होतं त्यांना ? मात्र या प्रेमाचा काळ, त्यांचा किती नी कसा आनंदांत गेला असेल हें एक त्याचे त्यांना किंवा तसा अनुभव ज्यांना आला असेल, अशांनाच ठाऊक !"

—शोभना मध्यें जरा थांबली !

किशोरीनें नी कुमारानें त्याचवेळीं सहेतुक दृष्टीनें हंसत एकमेकांकडे पाहिलें ! शोभना पुढें सांगूं लागली, " नायिकेच्या आईबापांना ठाऊक झालें नाहीं. नायकाच्याही आईबापांना माहीत झालें नाहीं, कीं आपल्या मुलांचं काय चाललें आहे ? नी मुलें तरी कशाला पाहूं देतात आपल्याकडे कोणाला? त्यांचं लग्न शेवटीं झालं नाहींच. दैवीं नव्हतं त्यांच्या ! पण लग्नानंतर जें झालं असतं नी जें सगळयांच्याच आनंदाचं कारण ठरलं असतं, तें बरीक त्या अल्लड पोरांच्या हातून लग्नाशिवाय होऊन चुकलं ! बिचारी भोळी पोर–नाडली ! पापाचा चिखल उडाला तिच्या अंगांवर !"

—शोभनेचं सर्वांग सांगतांना थरारलें ! किशोरी–कुमाराच्या अंगावर ऐकून शहारे आले !

शोभना आपली गोष्ट इतकी समरस होऊन साभिनय सांगत होती ! मूर्तिमंत नाट्यच चालूं झालं असा त्या दोघांना भास झाला !

—" नायक दृष्टिआड झाला तिच्या ! पुरुष करून सवरून बाजूला होतात. शहाजोग समाजांत धुतल्या तांदुळासारखे खुशाल वावरतात ! पण भोळ्या पोरी नाडतात ! समाज त्यांच्या उण्यावर उठण्यांत आनंद घेतो !

तशीच गत झाली त्या पोरीची ! सन्मान्य समाजांतून ती उठली ! जगाला पारखी झाली ! अंधेरांत तोंड लपवलन् तिनं ! मृत्यूची देखील तिनं कितीदा विनवणी केली असेल ! पण मृत्यू तरी हांकेला हजर राहायला नोकर का आहे कोणाचा ? ती शिकलेली होती. मार्ग दिसला तिला ! मृत्यूलाही कवटाळलं असतं तिनं! पण गोजिरवाणं लेंकरूं दिलं ना ! तिला देवानं त्याच वेळीं! तें तिच्या पोटांत असतांना मृत्यूची भेट घेण्याची तिला भीति वाटली ! लेंकरूं दिसलं, त्याचं गोड रडणं तिला रिझवूं लागलं ! आपल्या जिवाचं आई रान करते, पण आपल्या पोटच्या गोळ्याला प्राणापलीकडे जपते ! ती तशीच आपल्या लेकराला जपूं लागली ! हो, तिला मुलगीच झाली ! किती गोड, गोरी, देखणी नी खेळकर ! तिचे डोळे, गाल, इवलिशी हनुवटी, निरुंद जीवणी, डोक्यावर काळे, भुरुभुरुत केस ! अशा कन्यारत्नाला क्षणभर तरी ती कशी विसरेल ? मुलगी खुदकन् हंसली म्हणजे तेवढ्यानें तिची आई आपलीं सारीं सारीं दु:खं चटकन् विसरायची ! नी तिची मुलगी जरा कुठली रडली, तर आईला रडता भुई थोडी व्हावयाची !

— " दिसामासीं तिच्या जिवाचा कलिजा शुक्लेंदूसारखा वाढत होता. आपल्या गोड गोड बाललीलांनीं आपल्या आईला क्षणोक्षणीं सुखाच्या अत्युच्च शिखरावर चढवीत होता !" हें सांगतांना खरोखर त्या सुखाच्या अत्युच्च शिखरावर यावेळीं आपण स्वतः आहोंत असाच भाव शोभनेच्या तोंडावर प्रकट झाला ! त्या शिखराकडे— त्यावरील मायलेकरांना आपण प्रत्यक्ष पहात आहोंत, असा दिव्य भास किशोरी – कुमाराला ही पण झाला !

" प्रतिष्ठित समाजापासून दूर, एकाकी असूनही ती आपल्या मुलीच्या मधुर सहवासांत—सुखाचे घुटके घेत होती ! पण तिच्या दुर्दैवाला फारा दिवसांनीं तिची आठवण झालीच ! अंधेरांत बाजूला, ती होती, 'या मास्तरणी नटतात काय, मुरडतात काय ? या शीलानं आपल्या अशा तशाच असतात असे कुत्सित उद्गार ऐकवण्याकरितां समाज तिच्या पाठीमागें हात धुवून लागला होता तरी-ती सरळ चालीनें, मुलीकडे पाहून वागत होती-तरीही तिच्या दुर्दैवाला तें बघवलं नाहीं ! आणि तें दुर्दैव एकटं आलं नाहीं. एकटी-करितां आलं नाहीं.' तिला छळायला—तिच्या मुलीच्या—त्या गोड उमलत्या

फुलाचा–चुरगळा करायला, आपल्या बरोबर साथीदारांना घेऊन आलं !"

शोभनेचे डोळे पाण्यानें भरले ! जीभ लुली पडली ! ती थांबलीच ! कुमार–किशोरीला वाटलं, आपल्यावर गोष्टीचा इष्ट परिणाम करण्याकरितां शोभनेचा रडण्याचा हा अभिनय आहे ! पुढची कथा आठवण्याकरितां ती थांबली आहे !

–"तोंड लपविलेला एक वेळचा तिचा नायक, सुस्थितींत, वैभवांत असलेला नायक, सकुटुंब, सपरिवार, तिच्या दुर्दैवानें तिच्याजवळ अनेक वर्षांनीं अचानक आणून उभा केला ! इतकें करून तें थांबलं नाहीं दुर्दैव ! तिच्या नायकाच्या तरुण–देखण्या-उत्साही चिरंजिवाची आणि एकुलत्या एक कन्येची त्यानें भेट करवून दिली. मैत्री घडवून आणली ! त्यांना प्रेमाच्या नाजूक रेशमी धाग्यांनीं गच्च बांधण्याचा चंग बांधला ! आपल्या एक वेळच्या नायकाचा तो चिरंजीव आहे हे जिथं तिला समजलंच नाहीं; तिथं नात्यानं तो भाऊ लागतो, आपण तो एका रक्ता–मांसाचे आहोंत, हें तिच्या अल्लड मुलीला कसं कळणार ? ती त्याला भगिनी प्रेमाचं दान कसं देणार ! त्या दोघांनीं आपल्या प्रेमाला वाढूं दिलं, प्रेमाचा सुंदर गोफ गुंफायला सुरुवात केली. ही गुंफण तीं मुलं करीत नव्हती. त्यांचें, त्या मुलीच्या आईचं दुर्दैव तें करायला त्यांना लावीत होतं !"

हें सांगतांना शोभनेची दीन, केविलवाणी अवस्था झाली होती. प्रत्येक शब्द अंतःकरण पिळवटून बाहेर पडत होता ! आपण कोठें आहोंत, काय ऐकत आहोंत, कोणाबद्दल कसली गोष्ट चालली आहे, याचें किशोरीला किंवा कुमाराला भानच उरलें नव्हतें ! इतकीं तीं ऐकण्यांत गुंग झालीं होतीं !

शोभना पुढें बोलूं लागली––

" नायकाच्या चिरंजीवाची ओढ त्या तिच्या मुलीकडे लागलेली–– "

शोभनेची दृष्टि कुमारावर स्थिरावली. " तिच्या मुलीला पण त्या सुंदर तरुणाचें वेड लागलेलें !" शोभनेनें किशोरीकडे पाहिलें ! "अन् शेवटीं त्या अजाण असणाऱ्या दोघांनीं हट्ट धरला ! मुलीनें आपल्या आईला संकटांत घातलें––

"आमचं लग्न झालंच पाहिजे ! तूं परवानगी दिलीच पाहिजे ! बिचारी आई हतबुद्ध झाली ! तरुण जीवांची समजूत कशी घालावी, तुम्हीं नात्यानें बहिण

भाऊ आहांत— बहिणभाऊ पति—पत्नी होऊं शकत नाहींत, तसलें जग मागें कधीं नव्हतें. आज नाहीं. पुढेंही कधीं होणार नाहीं; तें देवाला आवडत नाहीं. धर्माला सम्मत नाहीं. शास्त्रानें तर निषिद्धच ठरविलें आहे! त्या तशा बहिणभावांच्या लग्नाला ती बिचारी त्या पोरीची आई कशी सम्मति देणार! आणखी कोणत्या नव्या पापाची जोड जोडण्याची इच्छा, आपल्या मुलीचा वेडा हट्ट पुरविण्या करितां धरणार?"

शोभनेचा कंठ दाटून आला! डोळ्यापुढें अंधेरी आली! जीभ लुली पडली! ती कशीबशी उठली! तेथून जायला निघाली. आतां कुमाराकडे किंवा किशोरीकडे पाहण्याची शक्ति शोभनेमध्यें उरली नव्हती! पण त्यांच्याकडे न पाहतां, जातां जातां, "किशोरी, ती माझी परिचित नायिका— माझ्या आजच्या गोष्टीची कथानायिका — ही तुझी दुर्दैवी आईच आहे ग!" शोभनेच्या तोंडचे हे हृदयविदारक शब्द किशोरीनें आणि कुमारानें एकदमच ऐकले!

शोभना मुलांच्या समोरून चालती झाली! आंत अंथरुणावर धाडकन् पडल्याचा आवाज झाला! कुमारानें किशोरीकडे पाहिलें! किशोरीनें कुमाराकडे पाहिलें! दुःखानें कीं आनंदानें कोणास ठाऊक, दोघांनींही खुर्चीच्या मागल्या भागावर आपापल्या माना टाकल्या!



# उपसंहार

शोभना किशोरीकडे पाहून मूक रुदन करीत असते ! तिच्याकडे तिला पहावत नाहीं.

किशोरी कांहीं बोलत नाहीं. आईला बोल लावित नाहीं. दुर्दैवी आईवर रागवत नाहीं. कुमाराला भेटत नाहीं. तो तिच्याकडे क्वचितच येतो. बहिण-भावंडांना भेटायला काय हरकत आहे ? पण अजून दोघांना मोकळ्या मनानें-निर्भयपणानें भेटण्याइतकें सामर्थ्य आलें नाहीं. कुमार भेटला तरी किंवा न भेटला तरी तो किशोरीच्या कानात कवि गोविंदाग्रजांच्या पुढील शब्दांत गुणगुणतांना किशोरीला ऐकायला येतें--

कुमार किशोरीला दुसरें काय ऐकविणार ?—

*पदर आणिलें तुझे कांहीं तूं, माझे आणी मीहि तसा ।*
*हांसत खेळत गोफ गुंफिला, कळलें नाहीं कधीं कसा ॥*
*एकामेकांभंवतीं फिरतां गिरकी जीवांना आली ।*
*चढत चालला खेळ जसा तो, नजरहि धुंद तशी झाली ॥*
*कुणी निंदिलें कुणी वंदिलें, कुणि हंसलें, रडलेंहि कुणी ।*
*नाहिं पाहिलें आम्हीं तिकडे, विश्व बुडालें प्रेमगुणी ॥*
*परि दैवाचा खेळ निराळा—खेळ नकोसा तुज झाला ।*

... .... .... .... .... ... ...

*गोफ गुंफिला उलगडण्याचा कठिण काळ येउनि धडके ।*
*हाय, वदावें काय, जिवलगें, ऊर तेवढा हा धडके !*
*हळू हळूं ओढणें हळूं जरा, ओढायाची कां घाई ।*
*"भलतां" धागा ओढितांचि तूं, जीव जीवलगे, हा जाई ॥*
*थांब उलगडूं गोफ कठिण हा शांतबुद्धिनें सखे असा !*
*कीं न तुटावा पदर एकही, धागा धागा नीट तसा ॥*
*नातरि होईल हानि आपुली आणि जगाचें हंसें तसें !*

... .... .... ... .... ... ...

*कठिण असें तरि उलगडणें हा गोफ असे आतां भाग ।*
*नातरि त्याचा पीळ राहुनी छळील तो जागोजाग ॥*
*मनापासुनी जें केलें, जें मान्य जीवानाही झालें ।*
*विमनस्कपणें परि आज तें निस्तरणें नशिबीं आलें ॥*
*कठिण जोडणें, परीं तोडणें, सुकर वाटतें जनांप्रती ।*
*उलटा अनुभव आला आम्हां गुंग जाहली इथें मती ॥*

केवळ शोभना, किशोरी, कुमार, यांचीच मति जगाच्या विकासाबद्दल विचार करतांना, तें मागें जातें, पुढें चाललें आहे कीं जिथल्या तिथेंच आहे, याबद्दल गुंग झाली, कीं तशी मी–मी म्हणणाऱ्या विचारवंतांचीही होतें, हें कोण सांगूं शकणार ?

——×——

यत् कृतं यत्करिष्यामि तत् सर्वं न मयाकृतम् ।
त्वया कृतं तु फलभूक् त्वमेव मधुसूदन ॥